भिजात सारस्वत ४



# आज्ञापत्र

अर्थात्

## शिवाजी राजांची राजनीति

हस्तलिखित प्रतींवरून तयार केलेली
संशोधित आवृत्ती



सुविचार प्रकाशन मंडळ
नागपूर व पुणे
किंमत ६ रुपये

प्रकाशक :
श्यामकान्त बनहट्टी,
सुविचार प्रकाशन मंडळ,
धनतोली, नागपूर १; आणि
४६१/१४ सदाशिव, टिळक रोड,
पुणे २.



पहिली आवृत्ती
जानेवारी १९६१
दुसरी आवृत्ती
डिसेंबर १९६५

मुद्रक :
श्यामकान्त बनहट्टी,
श्रीनिवास मुद्रणालय,
सुविचार प्रकाशन इमारत,
धनतोली, नागपूर १.

# अनुक्रमणिका

## संक्षेप व सांकेतिक चिन्हे यांचे स्पष्टीकरण

| | |
|---|---|
| अ. व. | अनेकवचन |
| आ. | आवृत्ती |
| इ., इ० | इत्यादि |
| इ. स. | इसवी सन |
| इं. | इंग्रजी |
| उ. | उपोद्घात |
| ए. व. | एकवचन |
| क्रि० वि० | क्रियाविशेषण |
| द. म. | दरमहा |
| धातु० | धातुसाधित |
| नपुं. | नपुंसकलिंग, नपुंसकलिंगी |
| पृ. | पृष्ठ |
| पे. द. | पेशवे दप्तरातील निवडक कागदपत्रे, मुंबई सरकारने प्रकाशित केलेली |
| प्र. | प्रकरण |
| फा. | फारसी |
| म. भा. | महाभारत |
| म. श. को. | महाराष्ट्र शब्दकोश |
| म्ह० | म्हणजे |
| रा. | वि. का. राजवाडे, मराठ्यांच्या इतिहासाची साधने |
| रा. सं. मं. | राजवाडे संशोधन मंदिर अथवा मंडळ, धुळे |
| ले. | लेख, लेखांक |
| वि० | विशेषण |
| वि. ज्ञा. | विविधज्ञानविस्तार मासिक |
| शु. | शुद्ध, शुक्ल |
| सं. | संस्कृत |
| सें. मी. | सेंटिमीटर |
| ह. लि. | हस्तलिखित |
| ... | मजकूर गाळला आहे याची खूण |

श्री. कै. डॉ. प्रा. ता. हे नेहमीचे संक्षेप किंवा संदर्भावरून सहज समजण्या-जोगे संक्षेप दिले नाहीत.

हस्तलिखिते आणि पाठभेद यांच्यासंबंधीच्या सांकेतिक चिन्हांचा खुलासा प्रस्तावना व परिशिष्ट २ यात केला आहे.

ज्यांच्यासंबंधाने दुसरा काही निर्देश नाही, असे आकडे पानांचे आहेत. आज्ञापत्राचे संदर्भ सर्वत्र प्रथमतः पान व नंतर ओळ असे दिले आहेत. पानांचा आकडा कधी जाडया तर कधी साध्या नेहमीच्या टशात व ओळीचा आकडा साध्या ठशात दिला आहे: **४०**.२१ किंवा ४०.२१ म्हणजे ४० व्या पानावरील २१ वी ओळ.

# प्रस्तावना

( पहिल्या आवृत्तीची )

आज्ञापत्राची आवृत्ती काढावी हा फार वर्षांचा संकल्प सिद्धीला जात असल्याचे समाधान आज लाभत आहे. सुमारे वीस वर्षांपूर्वी 'विविधज्ञानविस्तारा'त छापलेल्या दोन्ही वेळच्या संहितांची परस्पर तुलना करून टिपणे करण्यास सुरवात केली होती; पण ते काम तसेच अर्धवट राहिले.

आज्ञापत्राच्या आवृत्त्या आजवर अनेक निघाल्या आहेत. त्यांपैकी बऱ्याचशा मुद्रणावरून मुद्रण अशा स्वरूपाच्या आहेत. या प्रकारात पूर्वकालीन घोटाळे उत्तरोत्तर काली तसेच राहतात किंवा वाढतात; यास्तव शक्य तितके मुळाकडे जावे असा हेतु मनाशी बाळगिला. त्याप्रमाणे यथाशक्य प्रयत्न करून प्रस्तुत आवृत्ती काढली आहे.

हा प्रबंध प्रथम 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' या सदराखाली 'विविधज्ञानविस्तार' मासिकात हप्त्याहप्त्याने प्रसिद्ध झाला. या हप्त्यांच्या प्रसिद्धीचे काळ पुढीलप्रमाणे—

आगस्ट १८७२-प्रास्ताविक ( संपादकांचे ) आणि प्रकरण १ पूर्ण; सप्टेंबर १८७२-प्र. २ पूर्ण; आक्टोबर १८७२-प्र. ३ अपूर्ण; मार्च १८७३-प्र. ३ उरलेला भाग आणि प्र. ४ व ५ पूर्ण; आक्टोबर १८७३-प्र. ६ व ७ पूर्ण; नोवेंबर १८७३-प्र. ८ अपूर्ण; जानेवारी १८७४-प्र. ८ उरलेला भाग आणि प्र. ९ पूर्ण.

याप्रमाणे १८७२-७४ हा प्रथम प्रसिद्धीचा काळ असता अलीकडे निघालेल्या सर्व आवृत्त्यांमध्ये, इ. स. १८७५-७६ साली वि. ज्ञा. वि. मध्ये आज्ञापत्र प्रथम प्रकाशित झाले, असे विधान केलेले आढळते. याचे मूळ वि. ज्ञा. वि. कर्त्यांनी पन्नाशीच्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ प्रकाशिलेल्या पुस्तकमालेत १९२३ साली याची जी आवृत्ती प्रसिद्ध केली तीत आढळते. तीत हे प्रकरण वि. ज्ञा. वि.

मध्ये १८७५-७६ साली व १८९०-९१ साली याप्रमाणे दोनदा प्रसिद्ध झाले असल्याचा उल्लेख करण्यात आला. पुढचे सगळे आवृत्तिकार याच्यावर विसंबले !

अशी मौज दुसऱ्या प्रसिद्धीच्या उल्लेखात आढळत नाही. आज्ञापत्राची दुसऱ्यांदा प्रसिद्धी वि. ज्ञा. वि. मध्ये १८९०–९१ साली झाली. तिचा तपशील असा--

नोवेंबर १८९० – प्र. १ व २; डिसेंबर १८९० - प्र. ३; फेब्रुवारी १८९१– प्र. ४ व ५; एप्रिल १८९१ – प्र. ६ व ७; जून १८९१ – प्र. ८; सप्टेंबर १८९१ – प्र. ९.

द्वितीय मुद्रण प्रथम मुद्रणावरून केले असावे असे दिसत नाही. किंबहुना या वेळच्या संपादकांनी हे प्रकरण पूर्वी एकदा आपल्या मासिकात छापले आहे याची जाणीव असावी, असे दाखविणारी कोणतीही खूण द्वितीय मुद्रणात दिसत नाही. पहिल्या व दुसऱ्या मुद्रणातील पाठ बहुतांशी सारखे आहेत. परंतु ही दोन्ही मुद्रणे दोन भिन्न हस्तलिखितांवरून छापली असावी, असे दाखविणारा पुरावा दोन्ही मुद्रणातील पाठभेदांवरून मिळू शकतो.* ही हस्तलिखिते कोठून मिळाली, त्यांचे स्वरूप कसे होते व त्यांचे पुढे काय झाले, याची माहिती मिळत नाही. इ. स. १८७२–७४ च्या मुद्रणाला एक प्रास्ताविक जोडलेले आहे, पण त्यात यासंबंधीचा काही निर्देश नाही.

वि. ज्ञा. वि. कर्त्यांनी १९२३ साली पुस्तकरूपाने जी आवृत्ती काढली तिचे पुनर्मुद्रण १९२६ साली केले; त्यावरून पुढे अनेकांनी अनेक आवृत्त्या काढल्या. पण ही परंपरित मुद्रणे असल्यामुळे पाठसंशोधनाच्या दृष्टीने त्यांचा विचार करण्याचे कारण नाही. इंदूरचे कै. वा. गो ऊर्ध्वरेषे यांनी १९३९ साली आवृत्ती काढली, त्यापूर्वी त्यांनी तेथील सरकारी दप्तरातील एक हस्तलिखित पाहिले होते. पण "सरकारी दप्तरातून मला मिळालेली मोडी प्रत आणि १८९०–९१ च्या वि. ज्ञा. वि. तील प्रत अक्षरशः सारख्या आहेत. फारच क्वचित् किंचित् फरक सापडतो." असे त्यांनी प्रस्तावनेत लिहून ठेविले असल्यामुळे मूलसंशोधनाच्या दृष्टीने त्याही आवृत्तीचा उपयोग होण्यासारखा नाही.

* उदाहरणार्थ, **परिशिष्ट** २ मध्ये **२.५,६; २.१३; ३.५; २७.२; २८.५** या स्थलांचे पाठभेद पहा.

पुढे या प्रबंधाच्या तीन हस्तलिखितांचा सार्वजनिक स्थली संग्रह झाला : धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंदिरात दोन आणि समर्थ वाग्देवतामंदिरात एक. यापैकी राजवाडे संशोधन मंदिरातल्या ज्या एका प्रतीवर शके १७२२ हा लेखनकाल दिला आहे त्या प्रतीवरून राजवाडे संशोधन मंडळाने १९५५ साली डॉ. व. दी. राव यांची प्रस्तावना जोडून एक आवृत्ती काढली. हिच्या संबंधाने इथे दोन शब्द लिहिले पाहिजेत.

या आवृत्तीच्या प्रस्तावनेच्या ३ ऱ्या पानावर "प्रस्तुतच्या आवृत्तींत हीच प्रत (जिच्यावर शके १७२२ हा लेखनकाल दिला आहे ती) छापली आहे" असे म्हटले आहे. यावर विश्वासून चालू साली ज्या वित्येकांनी नवीन आवृत्त्या काढल्या त्यांनी या आवृत्तीचा आधार घेतला आहे. एका संपादकांनी तर ही आवृत्तीच आवश्यक त्या संस्कारांसह स्वीकारली आहे. पण वस्तुस्थिती अशी आहे की संपादकांच्या निवेदनानुसार रा. सं. मं. आवृत्ती शके १७२२ च्या हस्तलिखिताबरहुकूम छापलेली नसून तिच्यात किती तरी ठिकाणी बदल करण्यात आलेला आहे. हे बदल अनवधानाने अथवा मुद्रणदोषामुळे झालेले नसून ते केलेले आहेत; ते संख्येने चार पाच नसून शेकडो आहेत, आणि न सांगता संहिता वाटेल तशी विच्छिन्न करणे हे जर साहित्यिक संकेतांच्या दृष्टीने भयानक असेल तर हे बदल अति भयानक आहेत.

या बदलांचे परिणाम केवढे आहे याची कल्पना दोन प्रकारच्या मोजमापाने देता येईल. या आवृत्तीच्या दुसऱ्या पानावरील मजकुरात एकूण २० बदल केलेले आहेत. हे गणनात्मक मोजमाप झाले. आकारात्मक मोजमाप पुढे पृ. ६४ वर मूळ पोथीचे जे तीन ठसे छापले आहेत त्यापैकी कोणताही ठसा मुद्रित मजकुराशी तुळिल्यास मिळू शकेल. दुसऱ्या ठशातील पहिल्या २ ओळींचे बाळबोधीत रूपांतर :

पोथी { मअनुचितयाआर्थेतीर्थरूपकैलासवासीमाहाराजसाहेबयवनाश्रये
आसतांत्यापासोनपुणेआदिकरूनस्वल्पस्वास्तास्वतंत्रमागोनघेउन

रा. सं. मं. आवृत्ती { म अनुचित या आर्थे तीर्थस्वरूप कैलासवासी थोरले माहराज
साहेब याणी केला उद्योग सर्वही चित्तात आणिला त्यास तीर्थरूप
राजाराम छत्रपती कैलासवासी माहाराज साहेब यवनाश्रये असत
त्यापासून पुणे आदिकरून स्वल्प स्वास्ता स्वतंत्र मागोन घेऊन

केलेल्या बदलांच्या भयानकपणाची या उदाहरणावरून कल्पना येईल. वास्तविक ही पोथी पाठांच्या दृष्टीने अतिशय मूल्यवान आहे. पण तिची संहिता इतक्या प्रमाणात विच्छिन्न करून छापल्यामुळे तिचे प्रतिबिंब या नात्याने रा. सं. म. आवृत्तीची काही एक किंमत राहिलेली नाही.

मुद्रित आवृत्त्यांच्या संबंधाने एवढा प्रपंच झाला. आता हस्तलिखितांचा परिचय करून घेऊ.

## *अ. राजवाडे संशोधन मंदिर प्रत १*

जुनी गद्य हस्तलिखिते, बखरी जशा लिहिलेल्या असतात तशीच ही प्रत आहे. कागद देशी बिनघोटीव आहे. तो उभा धरलेला असून त्याला बरोबर मध्यावर घडी पाडली आहे. कागदाची लांबीरुंदी ४१ × १७ सेंटिमीटर आहे. लिपि अर्थात मोडी असून अक्षर फार सुंदर वळणदार व सुवाच्य आहे. आरंभी पुढीलप्रमाणे नमन आहे :

श्रीमन्महागणाधिपतयेनमः
श्रीमन्महासरस्वत्यैनमोनमः
श्रीसांबपरब्रह्मणेनमोनमः
श्रीम्हालसाकांतमलारिमार्तंडाय नमः

ही पोथी संपूर्ण असून हिची पाने एकूण ३२ आहेत. पोथीत लेखकाचे वा लिहविणाऱ्याचे नाव अगर इतर कोणतीही माहिती नाही. पानांच्या मथळ्यावर क्रमांक टाकलेले आहेत. मजकूर कागदाच्या एकाच बाजूवर लिहिला आहे. प्रारंभी व शेवटी अक्षर ढोबळ असून मध्ये पुष्कळ बारीक झाले आहे. पोथीच्या पहिल्या पानात १७ ओळी असून प्रत्येक ओळीत सुमारे २० अक्षरे आहेत, तर २४ व्या पानात ३५ ओळी असून ओळीमध्ये साधारणपणे ४० अक्षरे आहेत. यावरून अक्षराच्या लहानमोठेपणाची कल्पना येईल. पोथीच्या शेवटी लेखनकाल पुढीलप्रमाणे दिला आहे :

शके १७२२ रौद्र नाम संवत्सरे पौष वद्य चतुर्थी रविवारी लेखन समाप्त : हा लेखनकाल बिनचूक असून त्याची इंग्रजी तारीख ४ जानेवारी सन १८०१ ही येते.

या प्रतीचा निर्देश यापुढे सर्वत्र *रा१* या सांकेतिक चिन्हाने केला आहे.

## आ. *राजवाडे संशोधन मंदिर प्रत २*

ही मोडीमध्ये कागदाच्या एका बाजूस लिहिलेली आहे. पाने ५५ असून प्रत १ प्रमाणे मध्ये दुमडलेली आहेत. पहिल्या पानाचे पहिले अर्ध गहाळ आहे. शेवटच्या ५५ व्या पानाचाही एकच तुकडा असून त्याच्या अर्ध्यावर 'बळात्कार सर्वथा रयतेरी न करावा' इथपर्यंत मजकूर लिहून अर्धे पान कोरे सोडले आहे. अर्थात 'आज्ञापत्र' पुरे झाले आहे. पुढचा समारोपात्मक मजकूर लिहायचा राहिला की इथेच ग्रंथसमाप्ति झाली हे समजण्यास मार्ग नाही. पोथीच्या कागदाचा आकार ४६ × १४½ सें. मी. आहे. अक्षर वळणदार आहे पण लिहिणे अव्यवस्थित आहे. नकलकाराच्या लेखी मात्रा अनुस्वारांचा काही हिशेब दिसत नाही. या प्रतीचा निर्देश यापुढे सर्वत्र *रा २* या सांकेतिक चिन्हाने केला आहे.

## इ. *समर्थवाग्देवतामंदिर प्रत*

मंदिरातील बाडांक १८०७ चे हे हस्तलिखित आहे. पाठपोट लिहिलेली पाने ४२ म्हणजे पृष्ठ ८४ आहेत. कागदाचा आकार २१×१६ सें. मी. आहे. कागद विलायती असावा. मजकूर बाळबोध लिपीत असून अक्षर वळणदार व सुवाच्य आहे. लोक ऐवजी केला, अलालुची ऐवजी अकळूची अशा मोडी नीट न वाचता आल्यामुळे झालेल्या चुका पुष्कळ आहेत. आरंभी मलपृष्ठ असून त्यावर पुढील मजकूर आहे :

नारायण सारंगपाणी यास बक्षीस मिळाले कंपाडील साहेब यांणीं दिले असे सही हस्ताक्षर तात्या अंबेकर

पोथीच्या आरंभी नमन व वस्तुनिर्देश असा आहे :

श्रीमन्महागणाधिपतये नम : ।।

अथ नीतिशास्त्र प्रारंभ :

शेवटी समाप्तिदर्शक 'समाप्त' हा शब्द असून त्यानंतर पुढील मजकूर आहे :

शालिवान शके १७६५ शोभकृन्नाम संवत्सरे कार्तिक शुद्ध १५ इंदुवासरे संपूर्णम् ही नीति हुजूर लिहविली असे राजशक १६९ सन अर्बा अबैन मया तैन व अलफ माहे शवाल चंद्र १४ प्रहर दुसरा ।।

या कालनिर्देशात किंचित गफलत दिसते. पण ती महत्त्वाची नाही. इंग्रजी तारीख ६ किंवा ७ नोवेंबर सन १८४३ ही येते.

या प्रतीचा निर्देश यापुढे सर्वत्र *स* यां सांकेतिक चिन्हाने केला आहे.

या तीन हस्तलिखितांमध्ये *रा १* हे सर्वात अधिक मूल्यवान आहे. राज्याभिषेक शके ४२ हा जो प्रबंधाच्या आरंभी नमूद केलेला काळ त्यात आणि या प्रतीचा लेखनकाळ यात जरी ८५ वर्षांचे अंतर असले तरी प्रस्तुत प्रतीच्या लेखकाला मूळ प्रत किंवा मुळाला निकटतम असलेली प्रत मिळालेली असावी. शोध घालणें, लिहिलेले खोडणे इत्यादि लेखनविशेषांवरून लेखक स्वतः साक्षेपी दिसतो. सुयोग्य पाठांची काही उदाहरणे येथे देता येतील. युद्ध याचे तद्भव रूप ज्ञानेश्वरीत 'जूझ' असे दिसते व शिवकालापर्यंत ते तसेच होते. त्या सुमारास 'जुंझ' असा बदल होऊ लागून त्याची परिणती पुढे 'झुंज' या रूपात झाली. *रा १* मध्ये सर्वत्र जूझ, जुंझ अशी रूपे आढळतात. हो धातुचे शिवकाली भूतकाळाचे रूप 'जाला' असे होते. पुढे पेशवे काळात 'जाहला' त्यानंतर 'झाला' असे बदल झाले. *रा १* मध्ये बहुतकरून 'जाला' हे रूप आहे. 'जाहला' असे क्वचित येते.

ही कसोटी भाषिक स्वरूपाची झाली. अर्थाच्या दृष्टीने उत्कृष्ट व मूलानुसारी असा ज्यांच्याविषयी अभ्यासकाला हमखास प्रत्यय येतो असे पाठ *रा १* मध्ये हरघडी आढळतात. नमुन्यादाखल पहिल्या ५ पानातच २·८, २·२२, २·२३, २४, ३·५, ४·१४, ५·१ या स्थलींचे पाठ[१] पाहिल्यास *रा १* मधील पाठ सर्वोत्कृष्ट कसे आहेत हे कळून येईल. आणखी एकच उदाहरण इथे विवरून सांगतो. एरत, सामर्थ्य या अर्थी मवसर शब्द जुन्या ऐतिहासिक पत्रव्यवहारात येतो. तोच शब्द प्र. ५ च्या अखेरीस आला असून *रा १*, *रा २* मध्ये मवसर ही अक्षरे स्पष्ट आहेत. पण या शब्दांची ओळख न पटल्यामुळे रा. सं. मं. आवृत्तीसह सर्व आवृत्त्यांच्या संपादकांनी 'मवसर' चे 'अवसर' करून मुळातील अर्थसौंदर्याची शोभा केली आहे! सरेखोर (२१.४), इंदु (२५·६) इत्यादि किती तरी शब्द असेच अजाण विकृतीस बळी पडलेले दाखविता येतील.

अर्थात प्रस्तुत आवृत्तीची संहिता मुख्यतया *रा १* प्रतीच्या आधाराने तयार केली आहे. 'मुख्यतया' म्हणण्याचे कारण असे की *रा १* चे अक्षरन अक्षर इथे उतरिलेले नाही. अर्थाच्या दृष्टीने क्वचित काही ठिकाणी लेखकाच्या चुका झालेल्या उघड दिसतात, तेथे इतर प्रतींमधून सुयोग्य पाठ स्वीकारले आहेत.

---

१ परिशिष्ट २ मध्ये उपर्युक्त स्थले व त्यांवरील विवेचन पाहावे.

अशी स्थळे एकूण ८।९ पेक्षा जास्त नाहीत. पण मुख्य बदल केला आहे तो शब्दरूपांमध्ये. त्या काळी शुद्धलेखनपद्धतीच्या जाणिवेचा असलेला अभाव, मोडी लिपीमुळे आलेला अनियमितपणा, तत्कालीन गद्याची रूपविकृतीची प्रवृत्ती आणि खुद्द नकलकाराच्या लकबा, यामुळे पुष्कळ लेखनविकृती निर्माण होत. पण या गोष्टींना तितकेसे भाषाशास्त्रीय महत्त्व नाही. उलट यांच्या योगाने तत्कालीन भाषेचे खरे रूप काही अंशी झाकोळून जाते व भाषिक अभ्यासात अडचण निर्माण होते. तेव्हा वरील गोष्टींमुळे आलेली लेखनविकृती दूर करून संहिता तयार करण्याचा येथे प्रयत्न केला आहे.

वर वर्णिलेल्या ३ हस्तलिखितांखेरीज ‘वि. ज्ञा. वि.’ मध्ये दोनदा प्रसिद्ध झालेल्या संहिता साक्षात हस्तलिखितांवरून छापल्या असल्यामुळे त्यांना स्वतंत्र लिखितांचा मान देणे योग्य वाटले. १८७२–७४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या संहितेला *वि१* व १८९०–९१ साली प्रसिद्ध झालेल्या संहितेला *वि२* अशा सांकेतिक संज्ञा दिल्या आहेत. या दोन्ही संहिता भाषेचे सरास आधुनिकीकरण करून छापलेल्या दिसतात. तथापि अर्थदृष्ट्या यातून कित्येक स्वतंत्र पाठ मिळू शकतात.

याप्रमाणे *रा१ रा२ स वि१ वि२* अशा पाच प्रतींवरून प्रस्तुत आवृत्ती तयार केली आहे. ऊर्ध्वरेषे यांच्या आवृत्तीत याव्यतिरिक्त स्वतंत्र असे पाठ नाहीत. तेव्हा तिचाही विचार या पाचात येऊन जातो. प्रामादिक स्थलांचे अत्यंत तुरळक अपवाद वजा करता आज्ञापत्राची येथील संहिता *रा१* वरूनच तयार केली असल्याचें मागे सांगितलेच आहे. इतर प्रतींतील पाठ ( व *रा१* मधील वर्जित पाठ ) परिशिष्ट २ मध्ये दिले आहेत. त्यासोबत महत्त्वाच्या पाठांची युक्तायुक्त चर्चाही केली आहे. हस्तलिखितांतील प्रकरणव्यवस्थेचा तपशील तेथेच दिला आहे.

*रा१* प्रत खूप समाधानकारक आहे. पण तिच्यापेक्षाही मुळाच्या अधिक समीप जाणारी प्रत मिळाली तर समाधान दुणावेल. भाग्ययोगाने मूळ प्रत जर उपलब्ध झाली तर आभाळातील चांद हाती आल्याचा आनंद होईल. पण सध्या आहे या परिस्थितीत इथे सादर केलेली संहिता प्रमाण ठरावी.

आज्ञापत्रातील विषयांचे समालोचन, तत्संबंधी उपस्थित झालेल्या मुद्यांचे विवेचन आणि या प्रबंधाच्या सामर्थ्याचे दिग्दर्शन उपोद्घातात केले आहे. शब्दांचे आणि जरूर त्या मजकुराचे स्पष्टीकरण आणि मर्मदर्शन करण्यासाठी

टीपा दिल्या आहेत. त्यानंतर परिशिष्टे. प्रस्तुत लेखकाने भारतीय इतिहास परिषदेमध्ये १९३९ साली 'शिवाजीच्या राज्यतंत्राचे राजकीय व सामाजिक महत्त्व' या विषयावर इंग्रजीत निबंध वाचला होता त्याचा संक्षिप्त तर्जुमा परिशिष्ट १ मध्ये दिला आहे. परिशिष्ट २ पाठभेद आणि त्यांची चर्चा यांना वाहिले आहे. परिशिष्ट ३ मध्ये आज्ञापत्राच्या यंदा प्रसिद्ध झालेल्या ज्या आवृत्त्या प्रस्तुत लेखकाच्या पाहण्यात आल्या त्यांच्या संपादकांनी व्यक्त केलेल्या विचारांचा थोडक्यात परामर्श घेतला आहे. परिशिष्ट ४ मध्ये आज्ञापत्राची भाषिक पाहणी केली आहे.

जुन्या लेखनात विरामचिन्हे असत नाहीत, परिच्छेद तोडलेले असत नाहीत. आधुनिक प्रगतीने या सोयी उपलब्ध करून दिल्या असता त्यांचा उपयोग न करणे हा जीर्णरक्षणाच्या वृत्तीचा अतिरेक होईल. या सोयींच्या वापरामुळे अर्थ समजण्यास मदत होते, सौरस्य वाढते. यास्तव प्रस्तुत संहितेत विरामचिन्हे उपयोजिली आहेत व विषयविभागानुसार परिच्छेद पाडले आहेत. परिच्छेदांना मथळे देणे याची गोष्ट थोडी निराळी आहे. असे केल्याने आपली लापनिका, आपली समजूत मूळ मजकुरावर लादल्याप्रमाणे होते. आज्ञापत्राची जी महत्ता आणि पवित्रता आपल्या मनाला भासमान होते ती निष्टंक, निर्बाध राखावी, या भावनेने पोटमथळे वगैरे देण्याचा उपक्रम केला नाही. मात्र प्रत्येक प्रकरणाचा परिच्छेदवार सारांश प्रकरणाच्या प्रारंभी निराळ्या ठशांमध्ये दिला आहे. परिच्छेदाचा सारांश संपला की त्याच्या पुढे आडवी रेघ ( डॅश ) दिली आहे. त्यामुळे विषयाच्या आकलनास आणि पद्धतशीर अभ्यासास मदत होईल.

समर्थवाग्देवतामंदिराचे कार्यवाह श्री. शिदोरे आणि तेथील अधीक्षक कै. नानासाहेब देवांचे चिरंजीव बापूसाहेब यांनी मंदिरातील आज्ञापत्राची प्रत पाहण्यास व पाठभेदांच्या नोंदी करण्यास दिली. राजवाडे संशोधन मंडळाचे चिटणीस श्री. श्री. भा. भट यांनी रा. सं. मंदिरातील दोन प्रती पाहण्यास दिल्या आणि नंतर त्यांचा उपयोग करण्याकरिता भांडारकर प्राच्य संशोधन संस्थेमार्फत इथे पाठवून दिल्या. दोन्ही संस्थांच्या या कृपेबद्दल प्रस्तुत लेखक त्यांचा फार आभारी आहे. हस्तलिखिते आस्थापूर्वक मागवून दिल्याबद्दल भांडारकर प्रा. सं. संस्थेचे क्यूरेटर डॉ. प. कृ. गोडे यांचेही उपकार आहेत. परिशिष्ट १ मध्ये दिलेले मूळ इंग्रजी निबंधाचे मराठी भाषांतर चि. राजेंद्र याने

केले. छपाईसंबंधात मौज प्रिंटिंग ब्यूरोचे श्री. वि. पु. भागवत बहुत धन्यवादास पात्र आहेत. त्यांनी छापखान्याच्या कीर्तीला साजेशी सुबक छपाई केली आणि विलंबाबाबत सहनशीलता दाखविली. सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक मित्र श्री. शंकरराव जोशी आणि ग. ह. खरे यांनी उपयुक्त माहिती दिली. त्यांचेही ऋणस्मरण करितो. प्रा. रा. श्री. जोग यांच्या कृपेने वाडिया ग्रंथालयाचा उपयोग करता आला. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय हे तर अभ्यासकांचे मायपोट. त्याच्या चालकांचे व कर्मचाऱ्यांचे आभार अवश्य मानिले पाहिजेत.

हस्तलिखित पोथ्यांवरून पाठ उतरून घेणे हे काम स्वभावत: किचकट. ते एका हाती व्हायचे म्हणजे वेळ लागायचाच. संस्थेमार्फत पोथ्या मागवून त्या यायच्या हेही काम कालगतीचे. या सर्व अपरिहार्य विलंबामध्ये प्रस्तुत लेखकाच्या आजारामुळे खूप भर पडली. या आवृत्तीचे काम आटपावे या बुद्धीने जुलैमध्ये मुंबईस गेलो असता काविळीच्या चमत्कारिक चिकट आजाराने ग्रासले. नंतर इतर अनेक निकडीच्या कामांनी आपला कर कालव्ययाच्या रूपाने वसूल केला. अशा स्थितीत हे काम आता पुरे होत आहे ही ईश्वरी कृपा !

अतिशय खेदजनक अशी आणखी एक गोष्ट. या आवृत्तीतील मुख्य प्रबंधाची छपाई चालू असता आजाराचा हल्ला झाला. त्यामुळे मुद्रिते तपासताना काही चुका व अनुद्दिष्ट पाठ राहून गेले. मुद्राराक्षसानेही काही प्रभाव गाजविला. मुख्य संहिता कसोशीने तपासून जी अशुद्धे नजरेस आली ती दुरुस्त करणारे शुद्धिपत्र या पानाच्या मागे छापले आहे. ते पाहून प्रबंधाची संहिता प्रथम दुरुस्त करून घ्यावी अशी अगत्याची विनंती आहे.[१]

प्रस्तुत आवृत्तीतील अपुरेपणाची संपादकास भरपूर जाणीव आहे. प्रमाद कित्येक झाले असतील. विचक्षण वाचकांनी ते लक्षात आणून दिल्यास प्रस्तुत लेखक त्यांचा आभारी होईल. सत्याच्या जवळ जाण्याचा नम्र यत्न करावा हाच हेतु सर्व लेखन करण्यामध्ये आहे. तो तत्त्वजिज्ञासु इतिहासप्रेमी वाचकांस मान्य होईल अशी आशा आहे.

पुणे,
कार्तिक वद्य १३ शके १८८२

**श्री. ना. बनहट्टी**

---

१. शुद्धिपत्रानुसार मूळ संहिता दुरुस्त केल्यामुळे या आवृत्तीत हे शुद्धिपत्र गाळले आहे.

# दुसऱ्या आवृत्तीसंबंधी

'आज्ञापत्रा'ची प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी संपादित केलेली ही आवृत्ती प्रसिद्ध झाल्यानंतर या महान प्रबंधाशी संबंधित अशा अनेक गोष्टींवर फार लाभदायक प्रकाश पडला असे उद्गार अनेक अभ्यासकांनी काढले. 'आज्ञापत्रा'च्या कर्तृत्वासंबंधी या आवृत्तीच्या उपोद्घातात जे प्रमेय मांडले आहे त्याची साधकबाधक चर्चा अनेक विद्वानांनी केली व त्या अनुषंगाने छत्रपति श्री शिवाजी महाराज यांच्या जीवितकार्याचा महिमा अधिकच उजळून निघाला. सर्व उपलब्ध हस्तलिखित पोथ्या आणि मुद्रित प्रती तपासून तयार केलेली 'आज्ञापत्रा'ची प्रमाणभूत संहिता फक्त याच आवृत्तीत प्रथमतः प्रकाशित झाली आहे, ही गोष्ट आता सर्वमान्य झालेली आहे. प्रस्तुत आवृत्तीचे हे जे स्वागत झाले त्याबद्दल इतिहासप्रेमी वाचक व विद्यापीठे यांचे आम्ही आभारी आहो.

पहिल्या आवृत्तीचे हे पुनर्मुद्रण करताना मजकुरात कोणताही बदल केलेला नाही. 'आज्ञापत्रा'ची मूळ संहिता व तिच्यातील उद्धरणे ही पहिल्या आवृत्तीप्रमाणेच (अशुद्धे शुद्ध करून) छापली असून इतर सर्व मजकूर मराठी साहित्य महामंडळपुरस्कृत नव्या लेखननियमानुसार छापला आहे.

डिसेंबर १९६५ प्रकाशक

---



# उपोद्घात

## संकल्प

आज्ञापत्र उर्फ शिवाजी राजांची राजनीती हा मराठी वाङ्मयाचा अमूल्य आणि अपूर्व अलंकार समजला जातो. भरीव आणि कल्याणकारक अशी विचारसंपदा व हृदयंगम आणि समर्थ भाषाशैली ही जी श्रेष्ठ वाङ्मयाची दोन लक्षणे ती या लहानशा प्रबंधात परिपूर्ण स्वरूपात आपल्याला आढळतात. श्रीशिवप्रभूने जे मराठ्यांचे स्वराज्य स्थापिले त्याच्या बुडाशी असलेल्या राजनीतीची विशिष्ट तत्त्वे विशद करून सांगणारा असा हाच एक ग्रंथ मराठीत आहे. तेव्हा हा अमूल्य आहे आणि अपूर्व आहे.

या प्रबंधाचे स्वरूपनिरीक्षण आपण प्रथम करू, त्यात प्रतिबिंबित झालेली राजनीती हीच शककर्त्या शिवप्रभूची विशिष्ट राजनीती होय, या प्रमेयाचा विचार करून त्या राजनीतीचे वैशिष्ट्य व मौलिकत्व दाखविण्याचा यत्न करू. त्याच्याच अनुरोधाने 'या आज्ञापत्राचा कर्ता कोण असावा', या वादग्रस्त बनलेल्या प्रश्नाची साधकबाधक चर्चा नंतर करू.

विषयाच्या दृष्टीने निरीक्षण झाल्यावर एक वाङ्मयकृती या नात्याने या प्रबंधाचे परीक्षण करण्याचा विचार आहे. त्याचे वाङ्मयसौंदर्य आणि भाषासामर्थ्य नीटपणे न्याहाळून आशय आणि अभिव्यक्ती यांचा सुसंवाद येथे कसा झाला आहे याची जाणीव करून घेण्याचा यत्न करू.

## १

## प्रास्ताविक भाग—आदि अंत

कोणाही वाचकाला हे दिसून येईल की या छोट्याशा प्रबंधाचे स्वभावतः दोन

भाग पडतात. प्रकरण १ व २ मिळून एक भाग आणि प्रकरण ३ ते ९ हा दुसरा भाग. पहिला भाग प्रास्ताविक स्वरूपाचा आहे. त्यात ही राजनीती केव्हा, कोणी व कोणत्या निमित्ताने सांगितली, हे निरूपण केले आहे. राजनीती सांगण्याचा प्रसंग कसा उद्‌भवला हे स्पष्ट करताना काहीशा बादरायण संबंधाने मराठेशाहीचा पूर्ववृत्तान्त निवेदन केला असून त्याचे सूत्र ही राजनीती सांगणारा म्हणून जो शंभु छत्रपती पुढे केला आहे, त्याच्याशी आणून भिडविले आहे.

हा प्रास्ताविक भाग, म्हणजे प्रकरण १ व २, याचे आदि अंत थोडक्यात असे आहेत :— **आदि :** "स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४२...क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी यांणी...रामचंद्र पंडित अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली यैशी जे" (१.१-५). **अंत :** "तुम्ही कृतकर्मे सेवक... तुम्हास राजकार्यें नीतिमर्यादा अवगतच आहेत. तथापि चिरंजीव राजकुमार या राजकार्यी सुशिक्षित व्हावेत...यास्तव स्वामींनी यथाशास्त्र राजनीति या आज्ञापत्रारूढ केली आहे..." (१२.४-११).[1]

याप्रमाणे हे आदि अंत शाब्दिक रीत्या जुळले खरे; पण वस्तुस्थितीशी मेळ घालण्याच्या दृष्टीने पाहिल्यास इथेच अडचणींना सुरवात होते. राज्याभिषेक शके ४२ म्हणजे इ. स. १७१५ या साली राज्यावर असणारा शंभु छत्रपती म्हणजे शककर्ते शिवाजी महाराज यांचा दुसरा मुलगा राजाराम याला राजसबाई नावाच्या पत्नीपासून झालेला मुलगा संभाजी हाच असू शकतो. याचा जन्म सन १६९८ मध्ये झाला[2] आणि आपला सावत्र भाऊ ताराबाईचा मुलगा शिवाजी याला दूर करून हा ता. ११-७-१७१४ आणि १४-१०-१७१४ या तीन महिन्यात केव्हा तरी करवीर राज्याच्या गादीवर बसला.[3] आज्ञापत्राच्या आरंभी नमूद केलेल्या साली (सन १७१५) हा सतरा वर्षांचा होता, त्याला एकही पुत्र झालेला नव्हता (तो अखेर निपुत्रिक वारला), त्याला राज्यावर येऊन फक्त एक वर्ष झाले होते आणि ज्याला तो आज्ञारूपाने राजनीती सांगतो आहे तो रामचंद्र पंडित अमात्य वयाने आणि अनुभवाने त्याला आजोबा शोभेल इतका वडील होता !

---

१ जरुरीपुरती अवतरणे घेतली आहेत.

२ सरदेसाईकृत 'स्थिरबुद्धि राजाराम' पृ. ५६.

३ 'पंत आमात्य बावडा दप्तर, भाग १ ला', लेखांक ९१, ९२.

तेव्हा ही राजनीती करवीरकर छत्रपती संभाजी याने रचिली नसून ज्याचा उल्लेख आरंभी आला आहे त्या रामचंद्र पंडिताने लिहिली असावी असा समज रूढ झाला. शिवाजीमहाराजांच्या राजकारणाचा साक्षात अनुभव असलेला करवीरकरांच्या दरबारी ज्येष्ठ व श्रेष्ठ मुत्सद्दी त्या काळी तोच होता. राजांच्या आश्रयास असलेल्या कवींनी किंवा पंडितांनी स्वतः काव्य किंवा ग्रंथ लिहून आपल्या आश्रयदात्यांच्या नावाने त्याची प्रसिद्धी करण्याची रीत इतिहासात सर्वत्र दिसून येते. भारताच्या इतिहासात स्वतः विद्वत्ता संपादन करून ग्रंथलेखन करणारे राजे झाले नाहीत असे अर्थातच नाही. खुद्द भोसल्यांच्या कुळात पहिला संभाजी छत्रपती आणि तंजावरचे अनेक राजे यांनी काव्य-नाटकादि ग्रंथ लिहिले, हे इतिहासात प्रसिद्ध आहे. पण प्रस्तुत संभाजीच्या बाबतीत ही शक्यता दिसत नाही. त्याचे पुढील चरित्र लक्षात घेता १७ वर्षांच्या वयात इतका भरीव, विचारघन प्रबंध लिहिण्याचे सामर्थ्य त्याच्या अंगी आले असण्याची शक्यता वाटत नाही. स्वतःला मुलगे असल्याची लटकी गोष्ट त्याने स्वतः लिहिणे हेही अशक्य. त्याने राजनीतीचे धडे घेतले असल्यास ते ज्याच्यापासून घेतलेले असणार, त्या रामचंद्र पंडितालाच राजनीती सांगू पाहण्याइतका अप्रयोजकपणा तो करील हेही संभवनीय वाटत नाही. तेव्हा ही राजनीती रामचंद्रपंताने लिहून आपला आश्रयदाता जो शंभुछत्रपती ( करवीरकर संभाजी ) त्याच्या नावे प्रसिद्ध केली अशी समजूत मोठमोठ्या इतिहासज्ञांचीही झाली.

पण शंभु छत्रपतीकडे राजनीतीचे कर्तृत्व जात नाही असे ठरल्याबरोबर, ती रामचंद्रपंत अमात्यानेच रचली असली पाहिजे असे अनुमान निघते असे समजण्याचे कारण नाही. ही राजनीती रामचंद्रपंताला उद्देशून आज्ञापत्राच्या स्वरूपात लिहिली आहे. ज्याला उद्देशून आज्ञापत्र काढलेले असते तोच त्याचा लेखक असतो असे नाही. राज्यकारभाराच्या बाबतींसंबंधाची नेहमीची आज्ञापत्रे त्या त्या खात्याचे अधिकारी किंवा कारकून लिहीत असत व ती राजाच्या नावाने निर्दिष्ट केली जात. प्रस्तुत आज्ञापत्राचे ( त्याच्या मुख्य भागाचे ) विशिष्ट स्वरूप लक्षात घेता त्याचा लेखक कोणी तरी राजकारणाचा अनुभवी प्रतिभावंत पुरुष असला पाहिजे एवढे मानता येईल. रामचंद्रपंताने रामचंद्रपंतालाच उद्देशून लिहिणे हे अशक्य नसले तरी जरासे असंभाव्य वाटते. या प्रश्नाची विस्तृत

चर्चा आपण पुढे करणार आहो. उद्दिष्ट पुरुष म्हणून आज्ञापत्रात रामचंद्रपंताचे नाव गोवलेले असणे हे त्याचे कर्तृत्व रामचंद्रपंताकडे असल्याचे प्रमाण होऊ शकत नाही, एवढे इथे नमूद करून ठेवणे बस आहे.

## प्रास्ताविक भाग—अंतरंग

प्रास्ताविक भागाचे आदि अंत पाहिल्यावर त्याच्या अंतरंगात डोकावून त्याचे एकंदर स्वरूप लक्षात घेण्याचा प्रयत्न करू. प्रथमारंभी राज्याचा 'विज्वर प्रसंग' (संकटाचा काळ) वर्णिला असून त्यातून स्वामींनी 'सर्वांचीं समाधानें' करून राज्यसत्तेला निष्कंटक व सुप्रतिष्ठित कसे केले हे सांगितले आहे. हा 'विज्वर' प्रसंग राज्यावर केव्हा गुदरला याचा स्पष्ट निर्देश केलेला नाही. पण तेच सूत्र पुढे चालवून औरंगजेबाच्या स्वारीचा उल्लेख केला आहे, तिच्यामुळे गुदरलेल्या महा अनर्थांचे प्रौढ व परिणामकारक भाषेत वर्णन केले आहे, आणि एवढ्या भयंकर अनर्थांपासून राष्ट्राला बचावून त्याचे ऊर्जित करण्याचे कर्तृत्व स्वामीच्या अंगी कसे आले, तर 'या राज्याची अभिवृद्धि व्हावी ही ईश्वरी इच्छा बलवत्तर,' तदनुरूप 'स्वामी'ला 'या संभावित वंशी' जन्म प्राप्त झाला यामुळे, असे सुचविले आहे.

हा वंश एवढा 'संभावित' कसा, हे सांगण्याच्या निमित्ताने लेखकाने पुढे 'तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामी यांणी हें राज्य कोणे साहसें व कोणे प्रतापें निर्माण केलें' याचे मोठे उज्ज्वल रोमहर्षन वर्णन केले आहे. 'केवळ नूतन सृष्टि निर्माण केली' असा त्यांच्या कर्तृत्वाचा सारभूत निष्कर्ष निवेदन करून त्यानंतर औरंगजेबाला 'स्वप्रतापसागरीं निमग्न' केल्याचा उल्लेख केला आहे. इथे पहिले प्रकरण संपते.

या प्रकरणात जिथे जिथे नुसता 'स्वामी' म्हणून उल्लेख केला आहे तिथे तिथे संदर्भानुसार त्याचा अर्थ शंभुछत्रपती असा होतो. (पहा—१·५, १५; २·१, ७; ३·५, १३, १५.)

पण या अर्थाचा वस्तुस्थितीशी मेळ बसणे कठीण पडते. राष्ट्रावर महासंकट गुदरले ते (थोरल्या) संभाजी राजारामांच्या काळात, या शंभुछत्रपतीच्या कारकीर्दीत नव्हे. अर्थात या संकटाचे निवारण करून राज्य सुस्थिर केले राजारामाने, ताराबाईने आणि त्यांच्या सोबतीने आपल्या शौर्यसाहसाची शिकस्त

करणाऱ्या वीरमुत्सद्यांनी. शंभु छत्रपती फक्त एक वर्ष आणि २।३ महिने अगोदर राज्यावर आला होता. त्याच्या कारकीर्दीत काहीच विशेष घडले नव्हते. तेव्हा वर्णनाच्या संदर्भाने 'स्वामी' शब्दाचा संकेत ज्याच्यावर जातो त्या शंभुछत्रपतीशी ऐतिहासिक वस्तुस्थितीचा मेळ बसत नाही, अशी आपत्ती इथे येते.

दुसऱ्या प्रकरणात हा घोटाळा वाढलेला आपणास दिसतो. त्यात पाठभेदामुळे आणखी संशय निर्माण होत आहे. (शककर्ते साहेबांमागे) 'तीर्थरूप श्रीमन्महाराज स्वामी कैलासवासी' असा जो पाठ आहे तो राजारामास अनुलक्षून आहे हे उघड आहे 'औरंगजेब चालोन आला असतां...राज्याचा विज्वर प्रसंग होऊन ...राज्य यैसें नांव मात्र सावशेष उरलें' (६.२-१०) अशा अनर्थप्रसंगात 'स्वामींनी असाधारण श्रमसाहस करून शत्रूस हतदर्प करून त्याला नामशेष केलें आणि सालेरी अहिवंतापासून चंजी कावेरीतीरापर्यंत गतराज्य संपूर्ण आक्रमिलें,' असे जे भरदार आणि ओजस्वी वर्णन आहे, ते स्थूलमानाने राजारामास लागू पडते. त्यात कित्येक चुकीची विधाने आहेत त्यांचा निर्देश पुढे योग्य संदर्भात करू. पुढे हुजरात सजवून गडकोटांची जय्यत तयारी केली या अर्थाचे जे वर्णन आहे ते खरोखर म्हटले असता कोणासच लागू पडत नाही. राज्याचा फौजफाटा इतक्या उत्कृष्ट रीतीने सजविण्यास आणि किल्लेकोटांचा सर्व सामग्रीनिशी असा कडेकोट बंदोबस्त करण्यास राजारामाला आपल्या कारकीर्दीत अवकाशच सापडला नव्हता. तेव्हा हे भरघोस वर्णन म्हणजे वाणीच्या पोकळ विलासाचा एक प्रकार दिसतो. अशीच भ्रामक, पोकळ आणि अतिशयोक्तिपूर्ण विधाने या वर्णनात कितीएक आढळतात. पुढे स्वामी हिंदुस्थानात स्वारी करण्याचा विचार करतात व सुमुहूर्तें नर्मदापार होतात इत्यादि जो भाग आहे त्यात तर लेखकाची पोकळ गौरवाचा मजकूर लिहिण्याची जी प्रवृत्ती आहे तिचा कळस झाला आहे. वास्तविक प्रकरणाच्या प्रारंभापासून स्वामी म्हणजे तीर्थरूप कैलासवासी राजाराम छत्रपती हा संदर्भ चालत आला आहे, तो कुठेच तुटलेला नाही. पण नर्मदापार होऊन दिल्ली, आग्रा इ० संपूर्ण देशदुर्ग हस्तगत करण्यासंबंधीचे जे वर्णन आहे ते वर्तमानकाळी असल्यामुळे ते राजारामास लागू पडत नाही. राजाराम कधी नर्मदापार स्वारी करून गेला होता असं दिसत नाही; त्याचा मुलगा शंभुछत्रपती तर नाहीच नाही. पुढे 'दक्षिणप्रांतसंरक्षणार्थ श्रीमत्सकलतीर्थैकतीर्थ श्रीमन्मातुश्री राहिली (११.१८) आहेत' इथपासून जे वर्णन आहे ते तर एक गौडबंगालच आहे. ते

शंभुछत्रपतीला अनुलक्षून आहे असे म्हणावे तर 'प्रियतम राजश्री राजकुमारां'चा उल्लेख खोटा ठरतो. राजाराम उद्दिष्ट मानावा तर त्याला मातुःश्री नव्हती. शिवाय त्याचा 'तीर्थरूप राजश्री कैलासवासी स्वामी कर्नाटक प्रांतीं गेले तेव्हां...' (१२.४) अशा शब्दात निराळा स्पष्ट उल्लेख शेवटी आहेच !

प्रकरण २ च्या आरंभी 'राजश्री थोरले कैलासवासी साहेबांमागे स्वामी यांणी...' (६.१) असा जर पाठ घेतला तर 'स्वामी' याचा अर्थ संदर्भाने शंभुछत्रपती असा होतो. पण त्यापक्षी राजारामाचा उल्लेख अजीबात लुप्त होतो आणि औरंगजेबाच्या स्वारीचे राजारामाच्या कारकीर्दीस लागू पडणारे वर्णन शंभुछत्रपतीला जोडले जाऊन अनवस्था प्रसंग उद्भवतो !

## प्रास्ताविक भाग—विवेचनाचा फलितार्थ

पहिल्या दोन प्रकरणांचे एकंदर स्वरूप याप्रमाणे आहे. त्यात राज्याची संकटग्रस्त अवस्था झाल्याचे आणि 'स्वामीं'नी संकट पूर्ण निवारण करून राज्याचा उत्तम बंदोबस्त करून राज्य आबादान केल्याचे वर्णन दोन्ही प्रकरणांच्या पूर्वार्धात आहे. पहिल्या प्रकरणातील वर्णनाचा संबंध संदर्भानुसार शंभुछत्रपतीकडे लागतो. तो अनैतिहासिक आहे. दुसऱ्या प्रकरणातील वर्णनाचा संबंध राजारामाकडे जबरदस्तीने लावायचा. 'स्वामी' या शब्दाची योजना घोटाळ्याची झाल्यामुळे कोणते वर्णन राजारामाला उद्देशून आणि कोणते शंभुछत्रपतीला उद्देशून याचा नीट उलगडा होत नाही. शेवटचे स्वारीचे वर्णन कोणासच लागू पडणारे नाही. राज्याचा बंदोबस्त केल्याचे वर्णन स्थूलमानाने राजारामास लागू पडणारे आहे. पण त्यात पोकळ काल्पनिकतेचा फुलोराच विशेष असून तथ्य थोडे आहे. अनैतिहासिक, चुकीची विधाने इतस्ततः विखुरली आहेत. राजाराम आणि त्याचा मुलगा शिवाजी या दोघा छत्रपतींच्या कारकीर्दीत झालेले कर्तृत्व एकाच 'स्वामी'च्या कपाळी चिकटविले आहे. इ. स. १७०० ते १७१४ पर्यंत छत्रपतिपदावर असलेल्या दुसऱ्या शिवाजीचे अप्रत्यक्ष किंवा ध्वन्यर्थानेसुद्धा सूचन या सर्व वर्णनात कोठे केलेले दिसत नाही. शिवाजी हा विरुद्ध पक्षातला, त्याला पदच्युत करून संभाजी गादीवर आला; तेव्हा शंभुछत्रपतीला ज्यात गौरविले आहे अशा या प्रशस्तीत शिवाजीचा संबंध आणणे लेखकाने टाळले असावे हे सहज समजण्याजोगे आहे. शंभुछत्रपतीचे गौरव–खुशामत–ज्याला करावीशी

वाटते, अशा कोणा तरी इसमाने या दोन प्रकरणांचे लेखन किंवा संस्करण केले असावे.

शैलीच्या दृष्टीने उज्ज्वल आणि विषयाच्या दृष्टीने यथातथ्य असा एकच भाग या दोन प्रकरणात आहे. पहिल्या प्रकरणाच्या उत्तरार्धात आलेले शककर्ते शिवाजी महाराजांचे वर्णन हा तो भाग होय. यात चूक असेल तर ती एखाद-दुसरीच. बहुतेक अंश इतिहासदृष्ट्या योग्य व यथातथ्य असा वाटतो. शिवप्रभूच्या राजनीतीचे मर्म यात विशद केले नसले तरी 'जे आजपर्यंत कोणीहि केले नाहीत व पुढे कोणाच्याने मनेंहि कल्पवेना' असे त्यांचे अमानुष पराक्रम, त्यांनी अतुल बुद्धिवैभवाने साधिलेली राजकारणे, केलेला धर्मोद्धार आणि निर्मिलेले 'एकरूप अव्याहत शासन' यांचे वेचक रीतीने ओजस्वी शैलीत लेखकाने वर्णन केले आहे. शिवाजी महाराजांच्या कार्याचे इतके थोडक्यात इतके सुंदर वर्णन मराठीत इतरत्र क्वचितच असेल.

## २

## मुख्य भाग—राजधर्म प्रकरण

प्र. ३ ते ९ हा मुख्य भाग. यात अनुक्रमे राजधर्म, प्रधानसंयोजन, साहुकारांचे महत्त्व आणि त्यांचे मनोधारण, वतनदारांचे दायादत्व आणि त्यांचे नियंत्रण, वृत्ति-इनाम देण्यास प्रतिकूलत्व, गडकोटांचा बंदोबस्त, आरमाराचे महत्त्व आणि त्याची व्यवस्था—असे विषय आले आहेत. प्रत्येक प्रकरणाचा परिच्छेदवार सारांश त्या त्या प्रकरणाच्या आरंभी दिला आहे. इथे त्यातील मर्म आकलन करण्याचा प्रयत्न करू.

राजधर्माच्या आरंभी गाढ ईश्वरनिष्ठा आणि ईश्वरशरणता व्यक्त केली आहे, ती उच्च आध्यात्मिक पातळीवरची आहे. ईश्वरी कृपेची आणि प्रजाहितकर्तव्याची सखोल जाणीव इथे प्रकट झाली आहे. 'अंतरंगें पराधीन न होतां' (१४.१२) —किती सूचक आणि गंभीरार्थक शब्द ! गीतेने सांगितलेली आत्मवशता इथे ध्वनित झाली आहे. पुढील परिच्छेदात धर्माच्या बाबतीत उदारता आणि अनाग्रह व्यक्त झाला आहे. पुढे देवस्थाने आणि खरे धर्मनिष्ठ पुरुष यांचा परामर्श घेण्यास सांगितल्यावर 'अंध पंगु आतुर......चालवीत जावें' हे जे

वाक्य आले आहे त्याकडे लक्ष वेधणे अवश्य वाटते. आधुनिक परिभाषेतील कल्याणकारी राज्याची कल्पना इथे गर्भित दिसते. जनतेपैकी राज्यशासनाच्या मदतीला जे पात्र असतात, तेवढयांचाच नेमका उल्लेख येथे केला आहे. त्यात काही कमी अथवा जास्त करण्याजोगे नाही. अनुत्पन्न या शब्दाने बेकारांना काम देणे किंवा त्यांचे पोषण करणे हे जे आधुनिक राज्यशास्त्राने शासनसत्तेचे कर्तव्य मानिले आहे, त्याचा बोध होतो. नानाप्रकारची अनाथालये स्थापून अनाथ परित्यक्त अवहेलित स्त्रिया व बालके यांचे संरक्षण करण्याचा जो उद्योग सध्या चाललेला दिसतो त्याचा अंतर्भाव वरील वाक्यातील ‘ अनाथ ’ या शब्दामध्ये होतो. अशा व्यक्तींपैकी कोणी काही गडबड करू लागला तर मात्र त्याला मदत देऊ नये, हे ‘ निवांत असिजे तों ’ या शब्दांनी सुचविले आहे. असे किती सांगावे ! या राजनीतीतील एकेक वाक्य म्हणजे पैलू पाडलेली हिरकणी आहे, तिच्या प्रत्येक पैलूतून अनेक अर्थच्छटा निःसृत होतात, हे अशा वाक्यांवरून आपणास पटते.

राज्यकारभारात आणि फौजेत ( हुजरातीत ) लोक नेमावयाचे ते नानाप्रकारे पारखून अत्यंत विश्वासू गुणी असे नेमावे, हे परोपरीने आवर्जून या प्रकरणात सांगितले आहे, हे साहजिकच आहे. खजिना पूर्ण भरलेला आणि हुजरात ( राजाच्या खास हुकमतीखालील फौज ) अत्यंत उत्कृष्ट अवस्थेत राखावी. सेवक लोकांनी विशेष कार्य केल्यास त्यांना जादा बक्षीस द्यावे, पण त्यांच्या जागेच्या वेतनात वाढ करू नये ! याला कारणे दिली आहेत ती फार मार्मिक आहेत.

राजे लोकांनी पूर्ण निर्व्यसनी, मितभाषी, आपल्या शहाणपणाची रीझ न चालविता इतर बुद्धिमंतांचे ऐकणारे, सर्व हुन्नर, विशेषेकरून रणविद्या, यात अभ्यस्त, मनुष्यसंग्रहशील, सहनशील, म्हणजे जवळजवळ सर्वगुणसंपन्न असावे. हे सर्व वाचीत असता महाराजांची मूर्ती आपल्या मनश्चक्षूसमोर येऊन उभी राहते ! आपल्या स्वतःच्या गुणसंपदेचा आणि वर्तनक्रमाचा नकाशा तर या प्रकरणामध्ये महाराजांनी रेखाटला नसेल !

या प्रकरणाच्या मननाने एक तत्त्वार्थ चित्तात उभा राहतो. येथे चित्र रेखाटले आहे, ते एकतंत्री राजसत्तेचेच आहे, हे खरे. पण ती अनियंत्रित हुकूमशाही मात्र नाही. हा राजा विलायती राजनीतीत वर्णिलेला benevolent

despot नाही. तो benevolent आहे, पण despot ( निरंकुश सत्ताधीश ) मात्र नाही. त्याच्यावर धर्माचा अंकुश आहे. तो ईश्वरास शरण आहे, आत्मवश आहे. अगदी प्रारंभीच हे निरूपण करून राजसत्तेचे धर्माधिष्ठितत्व लेखकाने सूचित केले आहे.

## मुख्य भाग—(अ) प्रधानसंयोजन प्रकरण

दुसरे प्रकरण प्रधान उर्फ सरकारकून याविषयी आहे. राजाचेच कार्य संपन्न करण्याकरिता प्रधान नेमावयाचे असल्यामुळे ते उत्तमगुणसंपन्न असावे हे ओघानेच आले. या गुणांची यादी मार्मिक व व्यापक आहे. या प्रकरणासंबंधात एका मुद्याचा इथे विचार करणे इष्ट होईल. 'प्रधान म्हणजे राज्यलक्षणगृहाचे...परलोकीची दीपिका' ( २८.१८-२४ ) हे जे ओजस्वी कल्पनाशाली वर्णन आहे त्यावरून पंतप्रधान निळो मोरेश्वर पिंगळे या राजनीतीचा कर्ता असावा असे अनुमान डॉ. कोलते यांनी केले आहे. या संबंधात काही गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत. या प्रकरणात 'प्रधान' म्हणजे पंतप्रधान किंवा पेशवा असा अर्थ नाही. राज्याचे कोणतेही खाते किंवा 'राज्यांग' याचा तो मुख्य अधिकारी अशी सर्वसाधारण कल्पना दिसते. पूर्वीपासून 'सरकारकून' हा शब्द प्रचलित होता, त्याबद्दल 'प्रधान' हा संस्कृत शब्द वापरण्याचा प्रयत्न इथे दिसतो. पण हे प्रकरण लिहिले त्या वेळी 'सरकारकून' हाच रूढ होता. म्हणून प्रधान म्हणजे सरकारकून अशी 'प्रधान' शब्दाची व्याख्या द्यावी लागली आणि त्यानंतर सर्वत्र 'सरकारकून' हाच वापरणे इष्ट वाटले. सरकारकून अनेक असावेत अशी कल्पना दिसते. पण ते किती असावेत याची निश्चिती नाही. प्रधान अथवा सरकारकून आठ असायचे आणि त्यापैकी एक मुख्य असायचा, अशी कल्पना लेखकाच्या मनात असावी, असे मानण्यास या प्रकरणात काही आधार नाही. यावरून असा बोध होतो की अष्टप्रधान पद्धती निश्चित होण्याच्या पूर्वी, सरकारकून हा शब्द सर्वत्र रूढ असताना, या प्रकरणाची रचना झाली असावी. अष्टप्रधानांची स्थापना झाल्यानंतर (शिवराज्याभिषेकानंतर) जर या प्रकरणाची रचना झाली असती तर त्यात अष्टसंख्येचा उल्लेख आल्याखेरीज राहिला नसता.

हे प्रकरण प्रधानाविषयी असले तरी गंमत ही की ते सगळे राजाला उद्देशून आहे. राजाने प्रधान का करावे, ते कसे व कोणते गुण पाहून निवडावे, राजाने

त्याची अवगणना न करता त्याची भीड कशी वागवावी, राजाने त्याच्याकडे संपूर्ण अखत्यार द्यावा—इत्यादि सगळे राजाला सांगितले आहे. प्रधानाला उद्देशून, त्याने कसे वागावे, राज्यकारभार कसा चालवावा, इत्यादि काहीच सांगितले नाही. राजाच्या भूमिकेशी जो समरस झाला आहे अशा विचारवंताने हे लिहिलेले दिसते.

आणखी एक लक्षणीय मुद्दा. 'याकरितां...त्या अधीन करावे.' (३१.२१-२३) या वाक्याकडे ध्यान द्यावे. यात राज्यशास्त्राचे एक महत्त्वाचे तत्त्व सूचित झाले आहे. राज्यशासनाचे मुलकी आणि लष्करी असे दोन मुख्य विभाग असतात. यात वरपगडा कोणाचा, हा मुद्याचा प्रश्न असतो. सुधारलेल्या आणि लोकेच्छानुसारी राज्यशासनाचे हे एक महत्त्वाचे तत्त्व समजले जाते की लष्करी सत्ता ही मुलकी सत्तेच्या आधीन असावी. पण हे अलीकडच्या काळात. पूर्वीच्या काळी हाच प्रकार उलटा असे. राजे लोक सत्तालालसेच्या पायी लष्कर हेच शासनाचे मुख्य केंद्र समजून त्याच्या संवर्धनासाठी आणि युद्ध चालविण्यासाठी प्रजेला नाडीत असत. आज्ञापत्रकर्त्याच्या लोकहितकारी प्रतिभेचा हा मोठाच गौरव होय, की त्याला हे महत्त्वाचे तत्त्व प्रतीत झाले !

**मुख्य भाग—(आ १) शिवाजीची विशिष्ट राजनीती (प्र. ५,६,७,९)**

यानंतरची तीन प्रकरणे म्हणजे या राजनीतीचे खरेखुरे वैशिष्ट्य होय. हिला शिवाजीमहाराजांची राजनीती का म्हणायचे, याचे मुख्य कारण या प्रकरणांमध्ये आपल्याला गवसते. महाराजांच्या नजरेची झेप फार पुढे होती आणि स्वराष्ट्राला सामाजिक विकासाच्या वरच्या पायरीवर नेऊन सामर्थ्यसंपन्न बनवण्याचा त्यांचा प्रयत्न होता हे या प्रकरणांवरून आपल्याला समजते.

पाचवे प्रकरण साहुकारांचे. 'साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा' (३३. १). सावकारांचे गौरव आणि त्यांचे सर्व प्रकारे मनोधारण करण्याचे धोरण या राजनीतीत इतके स्पष्ट आहे की त्याविषयी कुतूहल वाटल्याखेरीज राहत नाही. या प्रकरणातच केवळ नव्हे, तर आरमाराच्या प्रकरणातही विशेष कारण नसता सावकारांचा उल्लेख करून त्यांची मेहमानी करण्याबद्दल आवर्जून सुचविले आहे (५९. १४ पासून पुढे). गनिमाकडील सावकारांची गलबते आली तरी त्यांना दिलासा द्यावा व त्यांना पाहिजे त्या वस्तु (अर्थात विकत) देऊन त्यांचे समाधान करावे ! कशासाठी हा कमालीचा अगत्यवाद ?

साहुकार म्हणजे व्यापारी आणि भांडवलदार. यांच्यामुळे राज्यात व्यापार वाढतो, राज्य श्रीमंत होते आणि संकटप्रसंगी पाहिजे ते कर्जवाम मिळते, हे या प्रकरणात पुढे स्पष्ट सांगितलेच आहे. पण यातील रहस्य काय? पूर्वीच्या काळी राजे झाले व त्यांची भरभराटलेली राज्येही झाली. त्यांच्या राज्यात काय व्यापार चालत नव्हता? जरूर तेव्हा राजांना पैसा मिळत नव्हता?

यातील रहस्य हेच की मराठी समाजाला सरंजामी युगातून काढून त्यापुढील अधिक प्रगत अशा द्रव्यप्रधान व्यापारी युगात नेण्याचा महाराजांचा प्रयत्न होता. मानवी समाजांचा विकासक्रम इतरत्र जो दिसून आला आहे त्यावरून असे म्हणता येते की कृषकावस्था पूर्ण प्रस्थापित झाली म्हणजे त्यातून सरंजामशाहीचा उद्भव होतो. जमीन लागवडीस आणून कुळांचे संरक्षण करणारे लोक वतनदार बनतात व पुढे शक्तिसंपन्नतेची एकेक पायरी चढत ते जमीनदार, सरंजामदार, संस्थानिक बनत जातात. मुख्य उत्पादनसाधन जी जमीन तिच्यावर कबजा यांचा असल्यामुळे राजा किंवा सम्राट झाला तरी त्याला यांच्याच ओंजळीने पाणी प्यावे लागते. महाराष्ट्रात वाडीचे सावंत किंवा जावळीचे चंद्रराव यांसारखे सरंजामदार किंवा संस्थानिक यांच्या सदरात घालता येतील असे बडे वतनदार थोडे होते. (खुद्द भोसले हे असेच एक बडे वतनदार होते.) बहुतेक मुलूख देशमुख, देशकुलकर्णी यांच्या हातात असलेल्या छोट्या तरफांमध्ये वाटलेला होता. या वतनदारांचा स्वभाव आणि वर्तनक्रम प्रकरण ६ मध्ये अतिशय वेचक शब्दात यथातथ्य रीतीने वर्णिला आहे (३६. १ ते ३९. ८). 'मुख्य राजसत्तेला न जुमानणें, एकमेकांशीं तंटेबखेडे करणें आणि परसत्तेला वतनलोभास्तव फितूर होणें हा यांचा सहज हव्यास,' हे या प्रतिपादनाचे तात्पर्य आहे.

शिवप्रभु हे, 'दिक्कालांतुनि आरपार अमुची दृष्टी पहाया शके।' अशा कोटीतले प्रतिभावंत पुरुष होते. त्यांना मराठ्यांचे सुसंपन्न बलिष्ठ राष्ट्र निर्माण करायचे होते. ते निर्माण करण्याच्या कामात मुख्य अडथळा वतनदारांचा होता. दावे दरवडे पुंडावा हा ज्यांचा सहजस्वभाव अशा वतनदारांची सद्दी जोपर्यंत आहे तोपर्यंत समाजाचे एकसंध राष्ट्र बनणे अशक्य. शेकडो वर्षे बद्धमूल होऊन बसलेल्या वतनदारांचे एकदम उच्चाटन करणे तर शक्य नाही. पण त्यांना वाढू न देता शक्य तितके खच्ची करायचे आणि रयतेवर त्यांना सत्ता गाजवू द्यायची

नाही! असे हे सगळे अनेकसूत्रसंकुल धोरण 'या लोकांचे संरक्षण परम युक्तिजन्य आहे' (३७. ८) या अर्थभरित वाक्याने सूचित केले आहे.

जुन्या वतनदारांना वाढू देऊ नये, तसेच नवीन वतनदार, हक्कदार, इनामदार निर्माण करू नयेत हेही त्याबरोबर आलेच. याकरिता "यवोदरप्रमाण भूमि तेहि इनाम देऊं नये" (५१. १५) असे बजावून सांगणारे सातवे प्रकरण लिहिले गेले.

पण एवढ्याने भागण्याजोगे नव्हते. असलेल्या वतनदारांना वाढू नये, हा निषेधात्मक उपाय झाला, नव्याने कोणाला जमीन देऊ नये, हा अकरणात्मक उपाय झाला. प्रत्यक्ष करणात्मक उपाय योजल्याखेरीज समाजाची उत्क्रांती होणार कशी? महाराजांनी तोही उपाय योजिला. त्यांनी साहुकार, म्हणजे भांडवलदार व्यापारी, यांना हाताशी धरण्याचे योजिले. देशात व्यापार वाढवावा, भांडवलदार वर्गाला सवलती देऊन त्याला आपल्या राज्यात आकृष्ट करावे आणि त्यांच्या द्वारा समाजाला समृद्ध बनवावे अशी राजांची कल्पना होती. त्यात भांडवलदार वर्गाचा वतनदार वर्गाला शह द्यावा असाही आणखी अवांतर हेतु राजांनी मनात धरिला असेल. व्यापारी भांडवलदार वर्ग राजसत्तेच्या आश्रयाने असला म्हणजे तो संपत्तीची तर वाढ करतोच, शिवाय समाजाला दृढ, एकसंध बनविण्यासही कारणीभूत होतो.

तिकडे पश्चिमेस पाच हजार मैलांवर इंग्लंडमध्ये समाजाच्या उत्क्रांतीची अशीच प्रक्रिया घडून येऊन इंग्लंड हे एक बलिष्ठ राष्ट्र बनलं होते. राजा सातवा हेनरी याने सरंजामदारांचे निर्मूलन केले. आठव्या हेनरीने राजसत्तेला निरंकुश आणि सर्वंकष बनविले. त्यानंतर एलिझाबेथने व्यापारी दर्यावर्दी लोकांच्या धाडसाला उत्तेजन देऊन इंग्लंडला 'सकलार्थें समृद्धिमंत' राष्ट्र बनविले. ही सर्व प्रक्रिया महाराजांच्या अगोदर तीनचार पिढ्या घडून आली होती. इंग्लंडचा हा इतिहास महाराजांनी साक्षात अभ्यासिला होता की नाही, हे समजण्यास (सध्या तरी) मार्ग नाही. इंग्रजांशी महाराजांचा तसा संबंध पुष्कळच आला होता. जंजिऱ्याचा सिद्दी हा मराठ्यांचा कट्टा शत्रु. त्याच्याशी चालू असलेल्या कटकटीत इंग्रज गुप्तपणे वा उघड सिद्याला मदत करीत, तेव्हा राजांना मुंबईच्या इंग्रेजांना ताकीद द्यावी लागे. इ. स. १६६१ साली राजापूर येथील इंग्रजांची वखार

राजांनी लुटून नेस्तनाबूद केली, तेव्हा इंग्रज कंपनीच्या दूतांची राजांकडे येजा सुरू झाली. असा नानापरींनी इंग्रजांशी संबंध आला असल्यामुळे राजांसारख्या विचक्षण पुरुषाने त्या राष्ट्राच्या स्थितिगतीची चांगली माहिती करून घेतली असणं यात असंभवनीय काही नाही. पण तसे जरी नसले तरी आपल्या समाजाचे एक समृद्ध आणि समर्थ राष्ट्र बनविण्यासाठी काय केले पाहिजे याची तात्त्विक जाणीव त्यांना झालेली होती यात शंका नाही. या आज्ञापत्राखेरीज इतर आधारांवरूनही हे सिद्ध होते. स्वतंत्रपणे ही जाणीव होण्याइतके द्रष्टेपण त्यांच्या अंगी होते याविषयी कोण संशय घेऊ शकेल ?

## (आ २) राजांची विशिष्ट राजनीती—सूत्रबद्ध निष्कर्ष

या तात्त्विक जाणिवेचा फलितार्थ आपल्याला आज्ञापत्राच्या ५, ६, ७ आणि ९ या प्रकरणांमध्ये दिसतो. आधुनिक अर्थाने राष्ट्र निर्माण करण्यासाठी राजांनी जे धोरण अवलंबिण्याचे ठरविले होते त्या एकाच धोरणाची ही चार अंगे आहेत. या धोरणाच्या काही शाखा उपशाखा इतर प्रकरणांमधूनही शिरलेल्या दिसतात. त्यांचे संकलन करून सगळ्यांचा एकत्र विचार करता येईल. त्याचा सूत्रबद्ध निष्कर्ष सांगायचा झाल्यास—

१ वतनदार हे राज्याचे दायाद होत हे बरे समजोन त्यांचे पूर्वीपासून चालत आले आहे तेवढेच चालवावे व युक्तिप्रयुक्तीने त्यांची सत्ता कमी करीत जावी.

२ नवीन वृत्ती व इनाम कोणालाही देऊ नये. याला अपवाद फक्त शास्त्रतः पूर्ण विचार करून व पारखून दिलेल्या धर्मार्थ भूमिदानाचा.

३ कोणालाही सहसा रयतेवर (म्हणजे जमिनीवर) हक्क किंवा दिवाण महसुलात मिराशी नेमणूक (४०.८–१५) करून देऊ नये.

(अ) वरील तिन्ही उपायांमुळे राजसत्ता एकमुखी, एकतंत्री सर्वातिशायी बनेल.

४ राज्यकारभारासाठी जे नोकर नेमायचे, फौजेत व आरमारात जे सैनिक व खलाशी ठेवायचे त्या सर्वांना रोख वेतने करून देऊन ती वेळचे वेळी बिलाकुसूर पाववावी. (१९.१५; १८.१३) अशाने हे सर्व नोकर मुख्य राज्यसत्तेशी एकनिष्ठ राहून पूर्णपणे अंकित राहतात.

५ भांडवलदार व्यापारी यांना आश्रय व उत्तेजन द्यावे. आपल्या राज्यात व्यापार व उद्योग वाढवावा. दर्यावर्दी व्यापाराला विशेष उत्तेजन द्यावे.

(आ) वरील उपायांमुळे राज्यातील सर्व देवघेवीचे व्यवहार पैशाच्या किंवा रोख रकमांच्या द्वारा होऊ लागतील. त्यामुळे माणसामाणसांतील संबंध सुधारून ते अधिक मोकळे व कारारस्वरूपी होतील. राज्यातील संपत्ती वाढेल.

६ हुजरात, म्हणजे राजाच्या खास हुकमाखालील फौज, शूर विश्वासू सैनिक आणि सर्वोत्कृष्ट हत्यारे दारूगोळा यांची भरती करून सदोदित बळकट व सज्ज राखावी.

७ दर्यावर्दी व्यापाराच्या रक्षणासाठी समुद्रावर स्वामित्व प्रस्थापित करणे अगत्याचे. ते करण्यासाठी बळकट आरमार बांधून तयार करावे.

(इ) वरील उपायांमुळे राज्यसत्ता बलाढ्य, सर्वंकष बनेल.

८ रयत म्हणजे प्रत्यक्ष शेत कसणारा शेतकरी याला वतनदार, फौजी किंवा आरमारी लोक यांच्याकडून मुळीसुद्धा उपद्रव किंवा तोशीस पोचू देऊ नये. (३७.१९; ४०.१२; ४१.२२; ५९.१; ६२.८)

(ई) रयतेला त्रास देणारे मध्यंतरीचे लोक नाहीसे झाले म्हणजे तिचा सरकारशी साक्षात संबंध प्रस्थापित होईल. समाजाच्या प्रगतीचे हे मोटेच लक्षण होय. असे झाले म्हणजे मराठी समाजाचे एक बलाढ्य राष्ट्र बनेल.

याप्रमाणे शिवाजी राजांची बलशाली राष्ट्र–निर्मितीची चतुष्पादात्मक प्रक्रिया होती. ही आज्ञापत्रात आलेली राजनीतीची तत्त्वे खुद्द शिवाजीराजांचीच होती हे सिद्ध करण्यास तत्कालीन पत्रांचा बराच पुरावा उपलब्ध आहे. पण त्यांचा उल्लेख करून त्यावरून निघणाऱ्या अनुमानांचे निवेदन करीत बसण्यास येथे अवकाश नाही. सर्वांत प्रशस्त उपोद्बलक आधार सभासद बखरीचा व काही अंशी चिटणिशी बखरीचा आहे. सर्व ग्रंथगत आधारांचा संकलित विचार करून प्रस्तुत लेखकाने "The Social and Political Significance of the State-craft of Shivaji" असा निबंध कलकत्ता येथे इ. स. १९३९ च्या अखेरीस भरलेल्या 'इंडियन हिस्टरी कॉंग्रेस'करिता लिहिला होता. तो त्या कॉंग्रेसच्या अधिवेशनात लेखकाने वाचून दाखविला व पुढे तो त्या कॉंग्रेसच्या अहवालात प्रसिद्धही झाला. त्यातील अनवश्यक भाग वगळून बाकीच्या भागाचे भाषांतर पुढे परिशिष्ट १ मध्ये दिले आहे.

प्रकरण ८ गडकिल्ले यांविषयी आहे. त्यात दिलेला अत्यंत बारीकसारीक तपशील सखोल दृष्टीच्या पुरुषाने आत्मप्रत्ययाने लिहिलेला दिसतो. शिवाजी राजांच्या युद्धव्यवस्थेचे गडकिल्ले हे अत्यंत महत्त्वाचे अंग होते हे स्पष्ट आहे.

३

## आज्ञापत्राचा कर्ता : वादाचा विषय

शककर्ते शिवाजीमहाराज यांची राजनीती खऱ्याखुऱ्या स्वरूपात ‘आज्ञापत्र’त प्रकट झाली आहे, ही खूणगाठ पटल्यानंतर ‘आज्ञापत्रा’चा कर्ता कोण असावा, या प्रश्नाला तितकेसे महत्त्व राहत नाही. प्रकरण ३ ते ९ यांचा खरा कर्ता, म्हणजे त्यातील विचार, तत्त्वे व धोरणे, यांचा जनक श्रीशिवप्रभु हाच, हे ठरल्यावर तो मजकूर प्रत्यक्ष कोणाच्या वाणीतून उतरला, हा मुद्दा गौण ठरतो. तथापि हा विषय वादाचा बनला आहे, तेव्हा त्याचे विवेचन येथे करणे प्राप्त आहे. बहुमान्य मत असे चालत आले आहे की ‘आज्ञापत्रा’त स्थूल मानाने शिवाजी-महाराजांची राजनीती आलेली आहे हे खरे; तथापि महाराजांच्या राजनीतीचे प्रत्यक्ष ज्ञान असलेला आणि त्यांच्या तालमीत तयार झालेला रामचंद्रपंत अमात्य हा एकच मातबर मुत्सद्दी ‘आज्ञापत्रा’त निर्दिष्ट केलेल्या काळी हयात होता. तेव्हा त्या राजनीतितत्त्वांचे निरूपण करण्यासाठी आपल्या आयुष्याच्या अखेरीस त्याने हा प्रबंध रचला आणि आपला तत्कालीन स्वामी शंभुछत्रपती याच्या नावे प्रकट केला.

## प्रास्ताविक व मुख्य भाग यांचा संबंध

प्रस्तुत प्रबंधाचे त्यातील आशयाच्या दृष्टीने प्रकरणे १–२ आणि प्रकरणे ३-९ असे दोन भाग पडतात हे आपण पाहिले आहे. ज्याने दुसरा, म्हणजे मुख्य भाग रचला त्यानेच पहिला, म्हणजे प्रास्ताविक भाग लिहिला असे मानणे भाग पडेल असा कोणताही बळकट आधार उपलब्ध नाही. पहिल्या भागाचा दुसऱ्या भागाशी संबंध ज्यांच्या योगाने जुळतो अशी दोन स्थळे दुसऱ्या भागात दिसतात. प्रकरण ८ च्या आरंभी ‘हे राज्य तरी तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामींनी...... अवशिष्ट तरी राज्य राहिले,’ (४५.६–१४) असा जो मजकूर आहे तो पहिल्या दोन प्रकरणातील मजकुराशी अनुसंधान ठेवणारा दिसतो. त्यात ‘थोरले कैलासवासी

स्वामी' यांनी निर्मिलेले राज्य आणि 'औरंगजेबासारखा महाशत्रु' याने आणिलेले संकट या प्रकरण १, २ मधील मुख्य विषयांचा उल्लेख आहे. दुसरे स्थळ म्हणजे प्रकरण ९ च्या अखेरचा, 'याप्रमाणे हुजरात......यथान्याये करून दिले जातील' हा समारोपाचा परिच्छेद. यात प्रकरण २ च्या अखेरीस ही राजनीती सांगण्यास कारणीभूत झालेला प्रसंग, म्हणजे 'स्वामी'ची तथाकथित 'नर्मदापार' स्वारी हिच्याशी अनुसंधान राखले असून एकंदर प्रबंधाचा समारोप केला आहे.

या दोन ठिकाणांचा मजकूर दोन भागांचा संबंध जुळविणारा आहे हे खरे आहे. पण प्रकरण ८ मधील मजकूर एखाद्या पुनःसंस्करण करणाऱ्या लेखकाने तिथे घातला असणे सहज शक्य आहे. शिवाजीमहाराजांनी 'हें राज्य...गडांवरूनच निर्माण केलें' आणि 'राज्यांत किल्ले होते म्हणून' औरंगजेबाच्या स्वारीतून 'अवशिष्ट तरी राज्य राहिलें' या गोष्टी इतक्या ढोबळ, सहज सुचण्यासारख्या आहेत की त्या कोणत्याही लेखकाने इथे मागाहून घुसविल्या असणे अशक्य नाही. 'सालेरी अहिवंतापासून कावेरी तीरपर्यंत निष्कंटक राज्य संपादिले', 'औरंगजेबासारखा महाशत्रु चालोन येऊन (त्याने) अतिश्रम केला' ही प्रास्ताविक प्रकरणांमध्ये अनेकवार आलेली विधाने येथील लहानशा मजकुरात पुन्हा आली आहेत. यावरून त्या प्रकरणांच्या लेखकाने हा मजकूर येथे घातला असून त्याची आवडती विधाने इथे पुनरुक्त झाली असावी असे अनुमान होते. नवव्या प्रकरणाच्या अखेरीचा समारोपाचा मजकूर दुसऱ्या प्रकरणाच्या अखेरीच्या मजकुराशी अनुसंधान राखणारा आहे, यात काही विशेष नाही. मात्र त्यात एक नवलाची गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. त्यात 'मातुःश्रीसाहेबां'चा उल्लेख आहे, पण 'राजकुमारां'चा उल्लेख (कोणत्याही प्रतीत) नाही! प्रकरण २ च्या अखेरीस 'जीविताधिक प्रियतम' असे ज्यांना म्हटले आणि जे 'राजकार्यी सुशिक्षित व्हावे' असा राजनीती सांगण्याचा पहिला मुख्य उद्देश म्हणून निवेदन केला त्या राजकुमारांना समारोपात 'अनुल्लेखाने मारलें' आहे! प्रास्ताविकाच्या अनुसंधानाने 'मातुःश्रीसाहेबांचे सेवेसी कोणेहि अर्थें अंतर न पडे' याच्यापुढे 'चिरंजीव राजश्री राजकुमार राजकार्यी सुशिक्षित होत' अशा अर्थाचा काही तरी मजकूर अवश्य असावयास पाहिजे होता, पण तसा कोणत्याही प्रतीत नाही. हे फार विलक्षण वाटते. यावरून असा एक संभव मनात येतो की समारोपाचा मजकूर हाच या प्रबंधाच्या मूळ रचनेस अनुसरून

यथातथ्य असावा आणि प्रास्ताविक मजकुरात काहीतरी बनावटपणा घडला असावा.

राजनीतीचा मुख्य भाग आणि प्रास्ताविक भाग यात एक मोठा फरक आपणास ज.णवतो. प्रास्ताविक भागाची भाषाशैली काही कमी दर्जाची नाही. पण ती मुख्य भागाच्या भाषाशैलीहून भिन्न आहे. शिवशाहीपासून पुढे राष्ट्राच्या वाढत्या जोमास आणि स्वत्वभावनेस अनुसरून जी जोमदार, प्रौढ, संस्कृतप्रचुर आणि आत्मप्रत्ययाने रसरसलेली गद्य शैली अस्तित्वात येऊ लागली होती, तिचा हा प्रास्ताविक भाग एक चांगला नमुना आहे. पण आशयाच्या दृष्टीने पाहिले असता या मजकुराची योग्यता फार कमी ठरते. प्रत्यक्ष प्रमाद आणि अनैतिहासिक विधाने जरी सोडून दिली तरी एकंदर वर्णनात अतिशयोक्ती, पोकळ बडेजाव, अवास्तविकता यांचा आढळ फार होतो. 'अशेष यावनी सेना शलभन्यायें विदग्ध होऊन पराजय पावली,' 'तत्प्रांतींचे संपूर्ण मांडलिक नयेंभयें हाताखाली घालून तमाम देशोदेशींच्या फौजा एकत्र करून'- असली भडक, अतिशयोक्तिपूर्ण, अतएव पोकळ व निरर्थक विधाने करण्यात तो आपली शब्दसंपत्ती खर्च करतो. याच्या उलट प्रकरणे २ ते ९ या मुख्य भागाची स्थिती आहे. त्यातील प्रत्येक वाक्य विषयाच्या दृष्टीने जरुरीचे आणि वाक्यातील प्रत्येक शब्द मुद्याचा, साभिप्राय असा भासतो. याची काही उदाहरणे पूर्वी दिली आहेत; काही पुढे निर्देशिण्यात येतील.

ह्या मोठ्या फरकामुळे प्रास्ताविक भागाचा लेखक मुख्य भागाच्या कर्त्याहून भिन्न असावा हा आपला संशय दुणावतो.

## वादाचा इतिहास

हे आज्ञापत्र रामचंद्रपंत अमात्याने लिहिले असावे अशी समजूत का रूढ झाली असावी, याचे कारण मागे निर्दिष्ट केलेच आहे. 'वि. ज्ञा. वि.'मध्ये हे दोन वेळा प्रसिद्ध झाले; त्या दोन्ही वेळच्या संपादकांनी याचा कर्ता रामचंद्रपंत होय किंवा असावा असे कोठे म्हटलेले नाही. प्रस्तुत लेखकाला या प्रबंधाचा अभ्यास करण्याचा प्रसंग प्राप्त झाला, तेव्हा या आज्ञापत्र उर्फ राजनीतीचा कर्ता रामचंद्रपंत असणे संभवत नाही असा त्याचा ग्रह झाला. यासंबंधाचे मुद्दे जुळवून त्याने त्या काळातल्या 'मध्यप्रांत संशोधन मंडळा'पुढे भाषणाच्या द्वारा मांडले.

मुद्यांची जी टिपणे केलेली होती ती मात्र गमावली. पुढे डॉ. वि. भि. कोलते यांचेही मत अभ्यासाअंती असेच झाले व त्यांनी ते 'राजनीति अमात्यांची कशी?'[१] या आपल्या निबंधाच्या द्वारा व्यक्त केले. या मताचा प्रतिवाद अर्थात झालाच. प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर यांनी डॉ. कोलते यांना उत्तर देण्याचा प्रयत्न केला. प्रा. डॉ. व. दी. राव यांनी मौज साप्ताहिकाच्या १९४५ च्या दिवाळी अंकात 'आज्ञापत्राचा कर्ता कोण?' हा लेख लिहून "जोपर्यंत ह्या ग्रंथाच्या कर्तृत्वाबद्दल नक्की पुरावा उपलब्ध नाही तोपर्यंत अंतर्गत पुराव्यावरून हा ग्रंथ रामचंद्रपंतांचाच होय, असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही,"[२] असे मत व्यक्त केले. या मताला कै. गो. स. सरदेसाई, क. श्री. त्र्यं. पुणतांबेकर आणि म. म. द. वा. पोतदार या इतिहासज्ञांचा पाठिंबा मिळाला.[३]

या प्रश्नासंबंधी प्रस्तुत लेखकाचे बावीस वर्षांपूर्वी जे मत झाले तेच आज कायम आहे. अलीकडे झालेल्या मननव्यासंगाने ते अधिक दृढ झाले आहे. रामचंद्रपंताचे व्यक्तित्व आणि मराठी राज्यातील त्याचे स्थान या दोन्ही गोष्टी लक्षात घेता हे आज्ञापत्र रामचंद्रपंताचे नसले पाहिजे. अगदी अलीकडे श्री. वा. सी. बेंद्रे यांचा 'छत्रपती संभाजी महाराज यांचे चरित्र' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्यात रामचंद्रपंत अमात्याचे चित्र आजपर्यंतच्या समजुतीहून फार निराळ्या रंगांनी रंगविलेले दिसते. त्या व्यापक विषयात शिरणे येथे अप्रस्तुत होईल. आज्ञापत्र उर्फ राजनीती हा प्रबंध रामचंद्रपंत अमात्याच्या हातून उतरला असणे संभवनीय आहे की नाही या प्रश्नाचा विचार करण्यापुरते त्याचे व्यक्तित्व अजमावून पाहणे इथे बस होईल.

## रामचंद्र नीलकंठ— त्रोटक चरित्र व कामगिरी

राजश्री रामचंद्र नीलकंठ उपनाम भादाणेकर गोत्र भारद्वाज सूत्र आश्वलायन[४]

---

१ हा निबंध सरदेसाई स्मारक ग्रंथ, पृ. ६६–७९ (१९३८) यात व नागपूरच्या वीणा प्रकाशनाने प्रसिद्ध केलेल्या 'आज्ञापत्रा'च्या आवृत्तीत (१९३९) प्रसिद्ध झाला आहे.

२ 'आज्ञापत्र' (राजवाडे संशोधन मंडळ ग्रंथमाला, ग्रंथ २७ वा), प्रस्तावना पृ. ७, व पुढे १५ पर्यंत.

३ सदर, प्रस्तावना, पृ. ६; शिवाय आरंभीचे पान.

४ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ५२.

हे तर्फ सोनवले प्रांत भिवंडी येथील वतनदार देशमुख. सोनवले तर्फेचे देशमुखीचे वतन रामचंद्र निळकंठ याचा सहावा पूर्वज निळो नारायण याने शके १४४५ मध्ये खरेदी केले होते.[1] या मोठ्या वतनात भादाणे हे गाव त्यांना इनाम होते. म्हणून यांचे उपनाम भादाणेकर. रामचंद्र निळकंठ याची जन्मतारीख उपलब्ध नाही. त्याचा जन्म इ. स. १६५० चा असावा असा सरदेसाई अंदाज करितात.[2] शके १४४५ पासून पिढ्यांची स्थूल वर्षगणना करिता त्याचा जन्म सन १६५० च्या पूर्वी झाला असणे संभवनीय वाटते. म्हणजे आज्ञापत्रावर जी मिती आहे त्या वेळी त्याचे वय सत्तराच्या आत बाहेर असावे रामचंद्राचा बाप निळो सोनदेव हा मोरोपंत पिंगळ्याप्रमाणे शिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यात मदतनीस होता. मोरोपंताकडे स्वारी करून गडकोट, मुलूख घेणे हे काम होते, तर निळोपंताकडे कदीम वतनाचा कारभार करण्याचे काम सोपवले होते.[3] साहजिकच स्वराज्यातील मुजुमदारीचा (महसूल मंत्र्याचा) हुद्दा त्याच्याकडे चालत आला. निळोपंताचा मृत्यु इ. स. १६७२ मध्ये झाल्यानंतर त्याचे पुत्र नारो निळकंठ व रामचंद्र निळकंठ हे मुजुमदारीच अधिकारी झाले. राज्याभिषेकसमयी हे अष्टप्रधानांपैकी पंत अमात्य (मुजुमदार) पदावर सुप्रतिष्ठित झाले. दोघा बंधूंमध्ये रामचंद्रपंत हेच कर्तबगार असल्यामुळे लवकरच अमात्यपद त्यांनी एकट्यांनीच संभाळले आणि ते इतका दीर्घकाळ उपभोगिले[4] की मराठेशाहीच्या इतिहासात अमात्य म्हणजे रामचंद्रपंत हे समीकरण कायमचे विख्यात होऊन गेले.

थोरल्या संभाजीचे आणि रामचंद्रपंताचे संबंध कसेही असोत, औरंगजेबाच्या स्वारीचे जे भयंकर संकट मराठेशाहीवर कोसळले त्या संकटाच्या काळात स्वराज्याचे रक्षण करण्याची कामगिरी बहुत श्रमसाहस करून मोठ्या निष्ठेने रामचंद्रपंताने पार पाडली याविषयी शंका घेण्यास जागा नाही. यासंबंधी तत्कालीन पत्रव्यवहारातील उद्गारांचा पुरेसा पुरावा उपलब्ध आहे. राजारामाच्या

१ राजवाडे, खंड ८, ले. ३७.

२ गो. स. सरदेसाई, ‘स्थिरबुद्धि राजाराम,’ पृ. १५७.

३ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १, ले. ३.

४ मध्यंतरी काही काळ हणमंत्यांकडे अमात्यपद होते, संभाजीच्या कारकीर्दीत रामचंद्रपंताकडे सचिवपद होते, इत्यादि तपशील इथे न दिला तरी चालेल.

जिंजीहून निघालेल्या अनेक आज्ञापत्रांमध्ये पुढीलप्रमाणे मजकूर आढळतो.— "राजश्री रामचंद्र नीलकंठ अमात्य याणी स्वामीची सेवा बहुत येकनिष्ठपणें केली आहे व या राजकारणे बहुत श्रम करून राज्याची अभिवृद्धिता पावविली आहे."[१] राजारामाचा ताराबाईपासून झालेला मुलगा शिवाजी (शिवछत्रपती दुसरा) याच्या कारकीर्दीत (मार्च १७०४) रामचंद्रपंताने तावत्कालपर्यंत संपादिलेली वतने व इनामे कायम करून देण्याकरिता जे एक संकलनात्मक आज्ञापत्र निघाले त्यात रामचंद्रपंताने बजाविलेल्या कामगिरीचे विस्तृत वर्णन आहे.— "थोरले कैलासवासी स्वामीस कैलासवास जाहलियाउपरी राजश्री संभाजीराजकाका याणी तुम्हास सुरनिसीचा हुद्दा सांगोन कुडालापासोन नरगुंद तुंगभद्रापर्यंत देश तुमचे स्वाधीन करून रवाना केलें ते समई तुम्ही समसाहास करून कितेक देशदुर्गादि संपादन केले......ह्या उपरी तीर्थरूप रा. कै. स्वामी (राजाराम) सिंहासनारूढ जाले असतां......राज्यभार तुम्हांवरि टाकून कै. स्वामी स्वार होऊन कर्नाटक प्रांते चंजीस गेले मागे तुम्ही सेनासंभार मेळऊन ताम्राच्या फौजा मारून चालविल्या कितेक देशदुर्गें ताम्राक्रांत जाली होती ती पुनः हस्तगत करून गेलें राज्य संपादून बरचेवरी संतोषवार्ता चंजीस पाठवीत गेलेस... तुम्हीही निष्ठापूर्वक वर्तोन स्वामीचें राज्य ताम्राक्रांत होते ते संपूर्ण यथापूर्व हस्तगत केले चंजीस कै. स्वामी असतां तिकडे ताम्राची रज होऊन चंजीस परिघ पडला ते समई तुम्ही या प्रांतीहून कर्नाटकांत सेनासंभार पावऊन कै. स्वामीचें संकट निरशन केलें..." इ. इ.

हे आज्ञापत्र निघाले त्या समयास रामचंद्रपंत सरकारस्वारीजवळ असल्यामुळे त्याचा मसुदा त्यानेच केला असल्याचा दाट संभव आहे; तरीदेखील राजमाता ताराबाई हिने तो पाहून संमत केला असला पाहिजे, यात शंका नाही. ताराबाई मोठी कर्तबगार आणि राज्याची धोरणे हाती बागविणारी स्त्री होती. मोठमोठ्या राजकारणांविषयी तिने स्वतः केलेला पत्रव्यवहार उपलब्ध आहे. तेव्हा छत्रपतीच्या नावे निघालेल्या वरील आज्ञापत्रातील मजकूर तिने संमत केलेला असला पाहिजे आणि तिला संमत असलेला म्हणजेच तो वस्तुस्थितीचा निदर्शक असला पाहिजे.

मोगलांच्या कैदेतून सुटून शाहू परत आल्यानंतर त्याच्याविरुद्ध ताराबाईने

---

१ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. २९, ३०, ३१, ३२, ३३, ४४ इ. इ.

राजकारण चालविले त्यातदेखील रामचंद्रपंताने तिला निष्ठापूर्वक साहाय्य दिले. ताराबाईचा पंतावर पूर्ण विश्वास होता व त्याला ती आपला मुख्य आधारस्तंभ मानीत होती, असे दर्शविणारा पत्रव्यवहार उपलब्ध आहे.[१]

## पंतांची धर्मश्रद्धा

रामचंद्रपंत धार्मिक वृत्तीचा होता. त्याने समर्थ रामदासांचा अनुग्रह घेतला होता; आणि रामदासांच्या शिष्यांशी, महंतांशी त्याची निकटची मैत्री होती. रामदासांचे शिष्य कल्याणस्वामी आणि त्यांचे बंधु दत्तात्रेय गोसावी रामचंद्रपंतांना 'गुरुभाऊ' मानीत असत.[२] समर्थांची मुख्य देवस्थाने चाफळ आणि सज्जनगड, तसेच त्यांनी निरनिराळ्या ठिकाणी स्थापिलेले मठ, यांना इनामे, उत्पन्ने मिळवून देण्यात रामचंद्रपंतांचा पुढाकार होता.[3] हे महाराष्ट्र राज्य म्हणजे धर्मराज्य आहे, देवाब्राह्मणांचे राज्य आहे, अशी रामचंद्रपंताची श्रद्धा यासंबंधीच्या पत्रव्यवहारात व्यक्त झाली आहे. प्रांत कराडमधील चाफळ गाव रामदास स्वामींच्या देवस्थानास इनाम करून देताना पंत म्हणतात—"हें धर्मराज्य श्रीचे कृपेकरून वृधीतें पावलें...हें महाराष्ट्र राज्य म्हणजे देवाब्राह्मणांचें आहे, श्रीचा समारंभ उत्तरोत्तर विशेषात्कारें चालवणें स्वामीस अगत्य आहे..."[४] असेच उद्गार राजाराम छत्रपतींनेही आपल्या अनेक आज्ञापत्रातून काढले आहेत. धर्मभावनेच्या बाबतीत अमात्य आणि राजाराम छत्रपती यांची एकरूपता दिसते.[५] त्या काळातल्या इतर राजपुरुषांची व कारभाऱ्यांची भावनादेखील साधारणपणे अशीच होती; पण ही धर्मसंबंधी श्रद्धा व आस्था पंतांच्या ठायी अधिक गाढ स्वरूपात दिसते आणि या बाबतीत राजाराम छत्रपतीची पंतांशी समरसता झालेली आढळते, असे पत्रव्यवहारातील उद्गारांवरून आपण म्हणू शकतो.

मात्र ही धर्मश्रद्धा परंपरागत स्वरूपाची होती. समाजधारक आणि

---

१ राजवाडे, खंड ८, ले. ६८

२ श्रीसंप्रदायाची कागदपत्रे, द्वितीय खंड, ले. ४९२

३ श्रीसंप्रदायाची कागदपत्रे, खंड पहिला, ले. ७६-७८, ८१ इ., सदर, द्वितिय खंड, ले. ४९२ इ.

४ श्रीसंप्रदायाची कागदपत्रे, खंड १ ला, ले. ८६.

५ सदर, ले. ८०, ८१, ८२, ८५ इ.

आत्मोन्नतिकारक शाश्वत तत्त्वांवर आधारलेला जो व्यापक स्वरूपाचा धर्म त्याची प्रतीती या मंडळीला झाली असल्याच्या खुणा दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. शिवाजी-महाराज देवस्थाने, तीर्थे, धर्मक्षेत्रे आणि सत्पुरुष यांच्या दर्शनाला जात असत आणि रामचंद्रपंत किंवा राजाराम हे तर जात असतीलच. पण त्यातून शिवाजी-महाराज "या प्रजेचे करुणेस्तव ईश्वरें संपूर्ण कृपानुग्रहें आपणास राज्य दिलें आहे. या ईश्वराज्ञेस अन्यथा केल्याने ईश्वराचा क्षोभ होईल हें पूर्ण भय चित्तांत आणून राज्यमदारूढ न होतां सर्वकाल अप्रमत्त होऊन प्रजेच्या हितकार्यी सादर असावें...सर्वकाल ईश्वरास शरण असून अंतरंगें पराधीन न होतां...सेवक लोकांचें मनोधारण करून वर्तावें." (१४.६-१४)—अशा उदात्त भावनेची स्वतःच्या ठायी जोपासना करीत होते. त्यांचा धर्म हा शाश्वत मानवधर्म होता. देवतांची पूजाअर्चा, महोत्सव, ब्राह्मणभोजने इत्यादि परंपरागत श्रद्धेस अनुसरून असलेली धार्मिक कृत्ये ते चालवीत असतील; पण धर्माबाबत तेवढीच संकुचित दृष्टी त्यांची नव्हती.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।

'नेणत्या कर्मनिष्ठांचा बुद्धिभेद करूं नये' या न्यायाने हे सर्व जरी चालविले असले तरी त्यांची अंतर्गत दृष्टी लोकोद्धारक शाश्वत धर्मावर खिळलेली होती हे 'आज्ञापत्रा'तील उद्‌गारांवरून दिसून येते.

## शिवाजी राजांची ध्येयदृष्टी त्यांच्यापाशीच राहिली

जी स्थिती धर्माची तीच राजकारणाची. शिवाजीमहाराजांच्या प्रगतिसाधक वैशिष्ट्यपूर्ण राजनीतीची तत्त्वे 'आज्ञापत्रा'त कशी प्रकट झाली आहेत हे आपण पाहिले आहे. नूतन राज्याच्या उभारणीच्या कामात या तत्त्वांचा शक्य तितका अवलंब केला जावा याविषयी त्यांचा कटाक्ष होता. पण त्यांना फार अकाली मृत्यु आला. त्यांच्या क्रांतदर्शी प्रतिभेची झेप त्यांच्या काळाच्या फार पुढे होती. त्यामुळे समकालीनांना त्यांच्या राजनीतीचे रहस्य आकलन झाले नाही. मराठ्यांचे राज्य टिकविणे आणि वाढविणे, मुसलमानी अमदानीत स्वधर्माला जी तोशीस पोचत होती ती नाहीशी करून देवाब्राह्मणांचे ठीक चालविणे, एवढीच दृष्टी शिवाजीमहाराजांच्या नंतर आलेल्या राज्यकर्त्यांची व मुत्सद्द्यांची राहिली. समाजधारणेची आणि राज्यशासनाची प्रगतिकारक अभिनव तत्त्वे

अमलात आणून द्रव्याधिष्ठित समाजव्यवस्थेच्या आधारावर एकमुखी बलिष्ठ राष्ट्र निर्माण करायचे ही जी शिवाजीमहाराजांची ध्येयदृष्टी ती त्यांच्यापाशीच राहिली. क्रांतदर्शी प्रतिभावान पुरुषाच्या कल्पनांचे पुष्कळ वेळा असेच होते. त्यांच्या अनुयायांना त्याच्या कल्पनांचे रहस्य, त्यातील गाभा आकलन होत नाही. ते बाह्य कवचाला कवटाळून बसतात. परिणामी मानवजातीच्या प्रगतीचा ओघ खंडित किंवा गढूळ होऊन जातो.

महाराजांच्या नंतर आलेल्या राजपुरुषांची दृष्टी ज्या प्रकारची होती म्हणून वर सांगितले तिचा रामचंद्रपंत अमात्य हा एक उत्कृष्ट नमुना म्हणून मानता येईल. त्याने राज्यरक्षणासाठी निष्ठावंतपणे कष्ट केले, रामदासासारख्या धर्मसंस्थापक साधुपुरुषाचा अनुग्रह घेऊन धार्मिक वृत्तीची जोपासना केली, देवब्राह्मणांना स्वास्थ्य करून दिले, हे सर्व आपणास तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसते. पण शिवरायाच्या राजनीतीची जी तत्त्वे 'आज्ञापत्रा'त व्यक्त झालेली दिसतात ती त्याच्या अंगी मुरलेली होती–किंबहुना त्यांचे त्याला आकलन झालेले होते–असे काही चिन्ह दिसत नाही.

उलट आपणाला जे आढळते ते असे की प्रत्येक महत्त्वाच्या बाबतीत 'आज्ञापत्रा'तील तत्त्वांच्या विरुद्ध वागणूक रामचंद्रपंताकडून होत होती. पंताने लिहिलेला अ णि त्याला उद्देशून इतरांनी लिहिलेला बराच पत्रव्यवहार राजवाडे, खंड ८, १५, १६, १७, पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, श्रीसंप्रदायाची कागदपत्रे भाग १ व २, पेशवा दप्तर, भाग ३१ इत्यादि साधनग्रंथात आढळतो. त्यावरून रामचंद्रपंताच्या व्यक्तित्वाचे आणखी काही पैलू आपल्या नजरेस येतात. रामचंद्रपंत छत्रपती आणि स्वराज्य यांच्याविषयी निष्ठावंत खरा, पण त्या निष्ठेचे मोल वसूल करण्यात चांगलाच दक्ष होता. वतनांचे आकर्षण त्याला फार होते आणि सरंजामी वृत्ती त्याच्या ठायी मुरलेली होती. शिवाजी महाराजांचा वतनदारांवर फार कटाक्ष होता. त्यांनी काही वतने रद्द करून दिवाणात सामील केली आणि इतर वतनदारांना जरबेत धरले. पण महाराजांच्या नंतर मराठ्यांची वतनलोभी वृत्ती उफाळून आली आणि नंतरचे छत्रपती महाराजांच्या राजनीतीचे मर्म ज्यांना आकलन झाले नव्हते असे असल्यामुळे वतने, इनामे यांची दाने छत्रपतींच्या दरबारातून भराभर सुटू लागली. राजारामाच्या आणि दुसऱ्या शिवाजीच्या कारकीर्दीत बहुतेक सगळे सरदार, कारभारी व अधिकारी

वंशपरंपरागत वतने, इनामे संपादन करण्याच्या मागे लागले. वतनांचे आकर्षण याप्रमाणे सार्वत्रिक होते, तरी त्यातही रामचंद्रपंताचा वतनांविषयीचा हव्यास काही विशेषच होता. 'राजनीति' ही अमात्यांचीच, या मताचे समर्थन करिताना असे प्रतिपादन करण्यात आले आहे की 'प्रत्यक्ष वागणुकीत तत्त्वच्युती दिसत असली तर त्यामुळे ते तत्त्व सांगणाऱ्या मनुष्याचा नैतिक कमकुवतपणा सिद्ध होईल; परंतु त्याने ते तत्त्व सांगितले हे नाशाबीत होऊं शकणार नाही.'[१] हा युक्तिवाद काहीएक मर्यादेपर्यंत खरा ठरू शकेल. पण रामचंद्रपंताच्या इनाम-वतनांचा लोभ या मर्यादेपलीकडे गेला होता. ही नैतिक कमकुवतपणामुळे झालेली तत्त्वच्युती नव्हती. 'आज्ञापत्रा' तल्या राजनीतितत्त्वांची त्याला जाणीवच नव्हती किंवा त्या तत्त्वांचे आकलन त्याला झालेले नव्हते. संधि साधेल तिथे आपल्या नावे वतने करून घेण्याचा उपक्रम राजाराम जिंजीस पोचतो न पोचतो तोच पंताने सुरू केला असे दिसते.[२]

पंतांच्या वतनसंपादनाचे संपूर्ण इतिवृत्त इथे देण्याचे कारण नाही. वतन-लोभाच्या काविऱ्याने त्यांना कसे पछाडले होते हे दर्शविण्यापुरते काही नमुने सादर करणे बस होईल. पंताने बजाविलेल्या कामगिरीबद्दल राजाराम छत्रपतीने कृपाळू होऊन जी कदीम वतने पुन्हा चालू केली व जी नवीन वतने दिली त्या सर्वांबद्दल पंताने छत्रपती शिवाजीकडून एक नवीन संकलनात्मक आज्ञापत्र करून घेतले. त्यात तो म्हणतो—"स्वामीने आपला मजमूचा हुदा जीर्णोद्धार करून आपणास सांगितला परंतु हुदा म्हणजे बारगीर वस्तू आहे याकरितां स्वामींनी आपलीं पहिलीं वतनें व इनामती......व नूतनही इनामती व वतनें अजरामऱ्हामत करून वंषपरंपरेस चालेत ऐसी आज्ञा केली पाहिजे......"[३] शिवरायासारख्या पुण्यपुरुषाने निर्मिलेले महापराक्रमी मोरोपंताच्या खालोखालचे म्हणजे सर्व राज्यात योग्यतेच्या क्रमांकाने दुसरे असे जे अमात्यपद त्याला वतनलोभाच्या आहारी जाऊन जो बारगीर वस्तु म्हणून तुच्छ लेखतो, त्याची वेगळी तारीफ काय करावी! 'बारगीर' शब्द पंत तुच्छतादर्शक म्हणून वापरतो, पण आज्ञापत्रकर्ता

१ श्री. त्र्यं. शं. शेजवलकर : Is Ajnapatra of Ramchandrapant Amatya spurious ?

२ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. २२ (याची ता. ४-१२-१६८९ आहे).

३ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ५२.

तट सरनोबताच्या खालोखाल बारगिराचा उल्लेख करून त्याच्याविषयीची आस्था प्रकट करतो.[१] तरी रामचंद्रपंत हाच आज्ञापत्रकर्ता असे प्रतिपादिले जाते !

साधेल तेथे स्वतःकरिता वतने व इनामे संपादून रामचंद्रपंताचे समाधान झालेले नाही. आपली पत्नी सौ. जानकीबाई हिच्या नावाने तो मौजे बुरबाड हे वंशपरंपरा इनाम करून घेतो. म्हातारपणीदेखील त्याची ही आसक्ती कमी झालेली नाही, हे ता. ३०-५-१७१४ रोजी हातकलंगडे हा आणखी एक गाव तिच्या नावे इनाम करून घेतला आहे यावरून दिसून येते.[२] पत्नीनंतर मुले ! त्यांच्या नावाने इनामे करून घेणे पंतास सुचणार नाही हे कसे शक्य आहे ? पंताची मुलगी ठकूबाई हिला 'दूधभातानिमित्त' संगमेश्वर तर्फातील मौजे कडवई हा गाव इनाम करून दिला आहे.[३] मुलीची व्यवस्था झाली तर मुलगा तसाच कसा राहील ? मौजे सेलोली तर्फ खानापूर हा गाव भगवंतराव रामचंद्र यास 'दूधभातानिमित्त' इनाम करून देण्यात आला.[४]

कोणाचे वतन खालसा झाले, घे आपल्या नावे करून; कोणाचा भोगवटा तुटला, घे आपल्या नावे करून; असा प्रकार रामचंद्रपंताने सरास चालविलेला दिसतो.[५] पण याहिपेक्षा चमत्कारिक उदाहरणे येथे नमूद केल्यास पंताचा वतनलोभ कोणत्या कोटीपर्यंत पोचलेला होता याची कल्पना येऊ शकेल. खटाव परगण्यातील १८ गावांची गावकुलकर्णे व ज्योतिषे आणि परगण्याचे देशकुलकर्ण मूळ कृष्णाजी बुलगो इत्यादि असामींची असून ती दुसऱ्यांनी जबरदस्तीने बळकावली होती. हे लोक न्याय मागण्याकरिता रामचंद्रपंताकडे आले. तेव्हा तंट्याच्या इनसाफाकरिता राजमंडळाची सभा भरली व त्यात चौकशीअंती कृष्णाजी बुलगो इ० असामी खरे ठरले. तेव्हा अखेर या तंट्याचा निकाल काय करण्यात आला म्हणाल, तर वतनाचा अर्धा भाग कृष्णाजी बुलगो प्रभृतींनी उपभोगावा आणि बाकीचा अर्धा भाग रामचंद्रपंताने घ्यावा ![६] सबब काय, तर मूळ वतनदारांचे संरक्षण व्हावे ! हा

---

१ ४७.१२

२ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला; ले. ८५, ८६, ८७.

३ सदर, ले. २९, ३०.

४ सदर, ले. ६१.

५ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. २४, ३९, ५९ इ. इ.

६ राजवाडे खंड ८, ले. ४२.

न्यायाचा प्रकार कोणासही विस्मित करील. वृत्तिलोभाचे आणखी एक गमतीदार उदाहरण सज्जनगडावरचे आहे. समर्थांच्या प्रयाणानंतर सज्जनगड व चाफळ येथील देवाची पूजाअर्चा, महोत्सव इत्यादि यथास्थित चालावे म्हणून देवस्थानाचे अधिकारी समर्थशिष्य वेदमूर्ति दिवाकर भटजी यांना अनेक गावे इनाम करून देण्यात आली. रामचंद्रपंत हाही समर्थांचा शिष्य. इनामे मिळवून देण्यात त्याचा पुढाकार अर्थातच होता. पण याकरिता काही बक्षिशी न घेईल तर तो रामचंद्रपंत कसला ! त्याने सज्जनगडावरील लेखनाची वृत्ती दरमहा ५ होनप्रमाणे आपल्या नावे करून घेतली आणि लेखनाचे काम करण्याकरिता तेथे आपला मुतालीक नेमला ! इथपर्यंतही आपण समजू शकू. पण पंताचा बारकावा याच्यापलीकडे गेला होता. पाच होनांपैकी फक्त २ होन त्या मुतालिकाला लेखनाच्या कामाबद्दल देणे आणि 'त्याच्या भोजनाची श्रीच्या भंडारीयांत अनकूलता करून देणें' असे तो लिहितो ![1] श्रीच्या उत्पन्नात द. म. ५ होनांची वृत्ती स्वतःसाठी करून घ्यायची आणि त्यातले मुतालिकाला २ देऊन, श्रीच्या रमण्यात त्याची भोजनाची सोय करून उरलेले ३ होन स्वतःच्या कनवटीस लावावयाचे !

रामचंद्रपंताची प्रवृत्ती ही अशा प्रकारची होती. स्वतः मराठी राज्याचा अमात्य असून मोगलांच्या ताब्यात असलेली वतने सोडविण्याकरिता त्यांची मनधरणी करण्यात त्याला काही कमीपणा वाटत नव्हता.[2] तिकडे आज्ञापत्रात वतने, इनामे वगैरेविषयी काय अभिप्राय प्रकट केला आहे हे आपणास माहीत आहेच. तेव्हा ज्या गृहस्थाने साधेल त्या मार्गाने जन्मभर वतने इनामे संपादन करण्याचा उद्योग केला, जो या बाबतीत इतका लोभी की न्याय मागण्यास आलेल्या इसमांचे अर्धे वतन आपल्या मालकीचे करून घेण्यास ज्याने कमी केले नाही, आपल्याला गुरुस्थानी असलेल्या श्रीच्या इनामातदेखील स्वतःला वृत्ती करून घेण्याची ज्याला दिक्कत वाटली नाही, वतनासाठी राज्याच्या शत्रूचीही मनधरणी करण्यास अखेरच्या वयातदेखील जो मागेपुढे पाहत नाही, असा मनुष्य "हे (वतनदार) लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत." (३६.५); "जो राजा होत्साता राज्याचा शत्रु असेल त्याणे भूमीवर उदार व्हावें...याकरितां जो राजा राज्य

१ श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रे, भाग १ ला, ले. १६५, १६६.

२ राजवाडे, खंड ८, ले. ७५; पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ९४.

करणार...त्याणे सर्वथैव मोह न पावता यवोदरप्रमाण भूमि तेहि इनाम देऊं नये." (४१.९–१६) अशी वाक्ये कधी तरी लिहील काय ? पंताचा वतनलोभ काही सामान्य नव्हता. तसेच वतने आणि इनामे यांच्याविषयी 'आज्ञापत्रा'त जी प्रतिकूलता व्यक्त झाली आहे, ती मामुली नाही. ती अति कडक आहे. ते या राजनीतीतले फार महत्त्वाचे तत्त्व आहे. या तत्त्वाची, त्याच्या महत्त्वाची जाणीवच रामचंद्रपंताला नव्हती, असे पंचवीस वर्षे चाललेल्या इनाम-वतन संपादनाच्या त्याच्या उद्योगावरून दिसून येते. पंत आणि 'राजनीति'कार यांच्यातला हा दक्षिण उत्तर ध्रुवाइतका विरोध 'राजनीति पंताने लिहिली' या समजुतीच्या किंवा प्रमेयाच्या संपूर्णपणे विरुद्ध जातो.

## नाशावितीचे आणखी अनेक मुद्दे

आणखीही काही शंकास्थाने वरील प्रमेयाच्या नाशावितीस सहायभूत होतात. प्रकरण ३ ते ९ हा मुख्य राजनीतिविषयक भाग. यात अष्टप्रधान पद्धतीचा कुठेच उल्लेख नाही. जर रामचंद्रपंत या भागाचा लेखक असता तर तो अष्टप्रधानांचा उल्लेख केल्याखेरीज राहता काय ? अष्टप्रधानांपैकी दुसऱ्या क्रमांकाचे जे अमात्यपद ते ज्याने सुमारे पंचवीस वर्षे वहिवाटले त्याने त्या पदाचा आणि ते पद जिचे उपांग होते त्या अष्टप्रधान पद्धतीचा नुसता उल्लेखसुद्धा या राजनीती प्रबंधात करू नये, हे कशाचे द्योतक असू शकेल ? मल्हार रामराव चिटणिसांच्या नावावर जी राजनीती प्रसिद्ध आहे तिच्यात अष्टप्रधानांचे विवरण आहे. शिवचरित्रावर ज्या बखरी आहेत, त्यात तर हा विषय प्रामुख्याने वर्णिला आहेच. प्रस्तुत राजनीतीचे चवथे प्रकरण प्रधान उर्फ सरकारकून याच्या विवरणास वाहिलेले आहे. रामचंद्रपंत जर या राजनीतीचा लेखक असता तर अष्टप्रधान पद्धतीचे विवरण या प्रकरणात केल्याशिवाय राहिला नसता. या प्रकरणातली परिस्थिती अशी दिसते की 'प्रधान' शब्ददेखील तेव्हा प्रचलित नव्हता.[1] प्रधान आठ असावेत असा उल्लेख अथवा ध्वनी या प्रकरणात कोठेच नाही. या प्रकरणाचे हे स्वरूप लक्षात घेतले म्हणजे ते रामचंद्रपंताने रचले नसले पाहिजे असे सहजच अनुमान होते.

---

१ मागे **उ. १७** पहा. शिवाय श्री. शं. ना. जोशी 'अर्वाचीन महाराष्ट्रेतिहासातील राज्यकारभाराचा अभ्यास' प्रकरण १, विशेषेकरून पृ. १८–२८ पहा.

आणखी एक मुद्दा शिलेदारांसंबंधीचा आहे. हुजरातीत शिलेदार ठेवायचे नाहीत असे शिवाजी महाराजांचे धोरण होते, असे चिटणीस आपल्या बखरीत म्हणतो, सभासदाचा मतलब तसाच आहे आणि आज्ञापत्राचा कर्ताही 'हुजरातीत शिलेदार एकंदर न ठेविता लिहिलेप्रमाणे हुजरात सजवावी' (२२.२२) असे स्पष्ट लिहितो. पण राजारामाच्या कारकीर्दीत जिकडे तिकडे शिलेदारीचाच विस्तार झाला आणि तो रामचंद्रपंताच्या पुरस्काराने झाला. शिवाजी महाराजांच्या राजनीतीचे हे महत्त्वाचे तत्त्व मागे पडले, कारण त्याची जाणीव कोणास नव्हती. काही थोडीशी जाणीव संताजी घोरपडे सेनापती यास होती, असे दिसते. पण त्याची शिस्त रामचंद्रपंत प्रभृती राजमंडळास मानवली नसावी. पंत व संताजी यांचे सूत नसावे असे मानण्यास तत्कालीन पत्रात आधार सापडतो.[१] संताजी सेनापतिपदावरून खाली ओढला गेला आणि लवकरच मारला गेला. हा सर्व विचार लक्षात घेता या मुद्द्यावरून आज्ञापत्राच्या कर्तृत्वाविषयी अनुमान काढायचे झाल्यास ते रामचंद्रपंताविरुद्ध जाते.

## आरमारी ज्ञानासंबंधीचा युक्तिवाद

आज्ञापत्राचे शेवटचे नववे प्रकरण आरमाराविषयी आहे. यासंबंधाने प्रा. व. दी. राव यांनी असा मुद्दा मांडला आहे की रामचंद्रपंताने सिंधुदुर्गावर सबनिशीचे काम केले असल्यामुळे आरमारविषयक बाबतीत तो एक तज्ज्ञ असावा; सन १७१५ साली हयात असलेल्या दुसऱ्या कोणत्याही शिवकालीन मुत्सद्द्यास आरमाराचा अनुभव नव्हता; तेव्हा आज्ञापत्रातील आरमाराचे प्रकरण रामचंद्रपंताशिवाय दुसऱ्या कोणत्याही मुत्सद्द्याच्या हातून लिहिले गेले असणे शक्य नाही.[२]

प्रा. राव यांनी असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे की मुळात रामचंद्र-पंताचा बाप निळो सोनदेव याच्यापासून हा आरमाराशी संबंध चालत आला होता.[३] पण बावडा दप्तराच्या ज्या लेखांकाच्या आधारे ते असे अनुमान काढतात त्यातील मजकुरातून 'निळो सोनदेव अमात्य ह्यांनी शिवाजीला बार्सिलोर (बसनूर)च्या आरमारी मोहिमेत साहाय्य केले' असा अर्थ निघत नाही.

१ पंत आमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ३४. (राजवाडे खंड ८, ले. ४७).
२ राजवाडे संशोधनमंडळ प्रकाशित 'आज्ञापत्र,' प्रस्तावना पृ. १४, १५.
३ सदर, प्रस्तावना, पृ. ११.

'बसनूरचे स्वारीचे प्रसंगीं सिंधुदुर्ग नूतन बसविला' एवढेच त्यात म्हटले आहे. स्वामी कृपाळू केव्हा झाले त्या काळाचा फक्त यात उल्लेख आहे.[१] खुद्द रामचंद्रपंताच्या बाबतीतही असाच प्रकार आहे. स्वामींनी कृपाळू होऊन सिंधुदुर्गाची सबनिशी रामचंद्रपंताला दिली खरी, पण त्या वतनाचे काम तेथे आपला मुतालीक पाठवून त्याच्या हाती तो करणार होता. असा उल्लेख खुद्द त्या वतनाच्या नेमणूकपत्रातच आहे. "मशारनिले (रामचंद्रपंत) आपला मुतालीक जंजिरे मजकुरास (सिंधुदुर्गास) पाठवितील त्याचे हातीं सबनीसीचा कारभार घेत जाणें"[२] रामचंद्रपंत सिंधुदुर्गास गेला नाही असेच उलट अनुमान लेखावरून होते. रामचंद्रपंताचा (त्याला व त्याने लिहिलेला) एवढा पत्रव्यवहार आज उपलब्ध आहे, त्यात आरमाराविषयी त्याला विशेष माहिती होती किंवा त्याच्या महत्त्वाची जाणीव होती असे दर्शविणारा मजकूर कोठे आढळात येत नाही. तेव्हा आरमाराच्या प्रकरणावरून 'आज्ञापत्र' रामचंद्रपंताने लिहिले असावे, असे अनुमान काढणे युक्तिसिद्ध ठरत नाही.

## निष्कर्ष

वरील विवेचनाचा निष्कर्ष असा. शिवोत्तरकालीन इतिहास व विशेषतः पत्रव्यवहार आज जो उपलब्ध आहे त्यातून रामचंद्रपंताचे जे चरित्र व व्यक्तित्व प्रतीत होते त्यावरून 'आज्ञापत्रा'तील राजनीतीचा भाग प्रकरणे ३ ते ९ रामचंद्रपंताने लिहिलेला असणे अशक्य वाटते. इथे तत्त्वच्युतीचा प्रश्न नसून तत्त्वांच्या जाणिवेचा व स्वीकृतीचा मूलभूत प्रश्न आहे.

डॉ. वि. भि. कोलते यांनी 'राजनीति अमात्यांची कशी ?' या आपल्या लेखात असा तर्क प्रकट केला आहे की या राजनीतीचा लेखक रामचंद्रपंत नसून त्या वेळचा पंतप्रधान नीलकंठ मोरेश्वर पिंगळे हा असावा. हा त्यांचा तर्क संपूर्ण 'आज्ञापत्रा'स अनुलक्षून आहे आणि त्यांनी जे आधार दिले आहेत ते बहुतेक प्रास्ताविक भागातले आहेत. त्या भागाच्या कर्तृत्वासंबंधाने आपण पुढे विचार करणार आहो. प्रस्तुत राजनीती विभागाविषयी विचार करावयाचा म्हटल्यास

---

१ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ९५.

२ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ६.

रामचंद्रपंताचे कर्तृत्व नाशाबीत करण्यास जी कारणे दिसतात तीच बहुतांशी नीलकंठ मोरेश्वराच्या बाबतीत लागू पडतात असे वाटते. निळो मोरेश्वर कदाचित पंताइतका कर्तबगार नसावा. पण राजनीतीच्या बाबतीत राजारामकाळापासून मराठेशाहीत जी तत्त्वे व धोरणे चालू झाली, त्यासंबंधात निळो मोरेश्वराचा काही निराळा विचार होता असे म्हणण्यास आधार सापडत नाही. संताजी घोरपड्याचे दृश्य ज्याप्रमाणे काहीसे निराळे भासमान होते तसे निळो मोरेश्वराच्या बाबतीत काही दिसत नाही. राजकीय धोरणाचे त्या काळातील प्रचलित सूत्रच चालविणारा तो एक मंत्री असावा. 'राजनीती'सारख्या क्रांतिकारी विचारांनी भरलेल्या प्रबंधाचा तो कर्ता असण्याचा संभव दूरापास्त वाटतो.

## ४

## प्रास्ताविक भागाचे तपशीलवार निरीक्षण

'आज्ञापत्रा'च्या प्रास्ताविक भागाच्या कर्तृत्वाविषयी आता विचार करू. या भागाचे स्वरूपावलोकन आपण पूर्वी केले आहे. त्यात 'छत्रपति' 'स्वामी' 'कैलासवासी' या शब्दांच्या अव्यवस्थित योजनेमुळे कसा घोटाळा झाला आहे व दोन्ही प्रकरणातील वर्णने कशी गैरलागू व भ्रामक झाली आहेत याचे विवेचन पूर्वी केलेच आहे. जबाबदार माणसाने केलेले ऐतिहासिक निवेदन कसे स्वच्छ, निःसंदेह आणि मुद्देसूद असते याचे नमुने आपणाला तत्कालीन पत्रव्यवहारात आढळतात. बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ५२ आणि राजवाडे, खंड ८, ले. ९९ यात रामचंद्रपंताच्या कर्तबगारीचा इतिहास थोडक्यात निवेदन केला आहे तो वरील विशेषणास कसा पात्र आहे हे सहज दिसून येण्याजोगे आहे. प्रस्तुत 'आज्ञापत्र' रामचंद्रपंताचेच, असा बळकट ग्रह मध्यंतरीच्या काळात काही काही मोठ्या इतिहासज्ञांचा होऊन बसल्यामुळे प्रास्ताविक प्रकरणातील मजकुराची चिकित्सक दृष्टीने पाहणी फारशी झाली नाही. पंताच्या कर्तृत्वावर आक्षेप घेण्यात येऊ लागल्यानंतर येनकेन प्रकारेण समर्थन करण्याची वृत्ती काम करू लागली. स्वच्छ नजरेने पाहून जे दिसेल ते सरळपणाने निराग्रह वृत्तीने सांगण्याने सत्याच्या जवळ आपण जाऊ शकू. तसे करण्याचा नम्र प्रयत्न येथे केला आहे.

१. आरंभीच्या कालनिर्देशातच घोटाळा दिसतो. राज्याभिषेक शके ४२ मन्मथनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी या तिथीला शनिवार येतो, गुरुवार येत नाही. वार मुख्य मानल्यास द्वितीया येईल.

२. 'त्यास सकलहि लहानथोर सेवक राज्याचे विज्वर प्रसंगामुळें...स्वामिकार्यास सादर जाले' (१·७ ते २·११) हा मजकूर कोणत्या संकटप्रसंगास अनुलक्षून आहे याचा नीट बोध होत नाही. वास्तविक हे वर्णन औरंगजेबाच्या स्वारीमुळे मराठेशाहीवर जो अनर्थ कोसळला त्याला लागू पडते. परंतु तसा अर्थ लावण्यात दोन अडचणी येतात. एक तर औरंगजेबाचा उल्लेख यापुढे केला असून त्याच्या आक्रमणामुळे जी दुरवस्था झाली तिचे वर्णन पुढे आले आहे. दुसरे असे की येथील 'स्वामी' याचा अर्थ संदर्भाने 'शंभु छत्रपति' असा होतो आणि तो राज्यावर येण्यापूर्वीच 'विज्वर प्रसंग' निवारण झाला होता. ताराबाईचा मुलगा शिवाजी याला पदच्युत करून संभाजी गादीवर आला या राज्यक्रांतीस अनुलक्षून हे वर्णन आहे असे म्हणावे तर त्यावेळी असा कोणताही बिकट प्रसंग राज्यावर गुदरला असल्याचे आढळत नाही.

तात्पर्य, या मजकुराचा अर्थ आणि संदर्भ यांच्यात परस्पर विरोध दिसतो. दोहोंपैकी एकाकडे दुर्लक्ष केल्याखेरीज सुसंगत अर्थनिष्पत्ती होऊ शकत नाही.

३. 'ज्या राज्यावर अवरंगजबासारिखा...येकेक प्रसंग अनर्थाचेंच कारण' (२·१२ ते ३·१२) या मजकुराबाबतही अडचण संदर्भाचीच. या मजकुरात स्वामी म्हणजे औरंगजेबी आक्रमण काळात निरनिराळ्या वेळी जे छत्रपती होते ते (संभाजी, राजाराम व शिवाजी) असा अर्थ जबरदस्तीने लादावयाचा.

४. 'तीर्थरूप कैलासवासी महाराजसाहेब...दिगंतविख्यात कीर्ति संपादिली ! तें हें राज्य' (३·२० ते ५·१६) हे शिवाजी महाराजांच्या अद्भुत कर्तृत्वाचे निष्कर्षरूप वर्णन बहुतांशी यथातथ्य आहे. यात एकच ठळक चूक आहे. शिवाजीच्या कार्यकालात निजामशाहीचा उल्लेख बाकीच्या दोन शाह्यांबरोबर केला आहे, तो बरोबर नाही. वास्तविक निजामशाही पूर्वीच म्हणजे इ. स. १६३६ साली नष्ट झाली होती. 'मोगल एकएक सुभा लक्षलक्ष स्वारांचा', 'साल्हेरी अहिवंतापासून चंदी कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य...संपादिले' इत्यादि अतिशयोक्त विधाने आहेत पण ती शिवप्रभूच्या अद्भुत चरित्रवर्णनात क्षम्य आहेत.

प्रकरण २ मध्ये सुरवातीपासून 'स्वामीचें राज्य निःकंटक जाहलें' (१०·२०) एथपर्यंतचा मजकूर राजारामाने आपल्या कारकीर्दीत केलेल्या पराक्रमांचे वर्णन म्हणून लेखकाने लिहिला आहे. पण हा मजकूर खरे म्हटले असता राजाराम आणि त्याचा पुत्र दुसरा शिवाजी या दोहोंच्या कारकीर्दींना लागू पडणारा आहे. त्यात अतिशयोक्ती, पोकळ गौरव आणि प्रत्यक्ष चुका यांची इतकी गर्दी झाली आहे की त्यातून सत्य निवडून काढण्याचा प्रयत्न वाऱ्याची मोट बांधण्याप्रमणे ठरण्याजोगा आहे.

५. 'शहाजादे आदिकरून मुक्त केले' (६·४) राजाराम आणि दुसरा शिवाजी यांच्या कारकीर्दीत कोणी शहाजादा म्हणजे औरंगजेबाचा पुत्र मराठ्यांच्या ताब्यात आला होता असे दिसत नाही. तेव्हा त्यांना मुक्त करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही.

६. 'शामलाचे जाहगिरीचा देश नंदुरबार आदिकरून दळवटून फन्ना केला' (९·१४). शामल म्हणजे जंजिऱ्याचा शिद्दी. याच्यासंबंधाने या प्रकरणात जो बराच विस्तृत मजकूर लिहिला आहे तो भरमसाट अतिशयोक्तीचे नमुनेदार उदाहरण आहे. नंदुरबार येथे शामलाची जहागीर असल्याचा कोठेच दाखला मिळत नाही. तेवढ्यापुरते हे विधान चुकीचे समजले पाहिजे. पण सन १६९७ मध्ये मराठ्यांचा सरदार नेमाजी शिंदे याने खानदेशावर स्वारी करून नंदुरबार व थाळनेर ही शहरे लुटल्याचा पुरावा इतिहासात आढळतो.[1] अर्धवट ऐकीव माहितीवरून वडाची साल पिंपळाला लावून आपला मजकूर सजविणारा असा कोणी तरी असामी या भागाचा लेखक असावा असे या प्रकारावरून वाटते.

७. 'ताम्राचा त्याचा विरोध घालोन' (९·१५) याचा अर्थ असा की शामल म्हणजे शिद्दी आणि ताम्र म्हणजे मोंगल हे जे नेहमी एकमेकांचे साह्यकारी असायचे त्या दोघांमध्ये राजारामाने (मराठ्यांनी) शत्रुत्व उत्पन्न

---

1 "In 1697, Niba Sindia and other officers of Ram Raja, entering Khandesh from the west...defeated the Mussalman commander...and extorted Rs. 1,80,000 from Thalner...and Rs. 1,40,000 from Nandurbar."

*Khandesh Distt. Gazetteer p.* 251, *foot–note* 3.

शिवाय सरदेसाई, 'स्थिरबुद्धि राजाराम' पृ. ८९ पहा.

केले. पण प्रत्यक्षात असे घडल्याचा वृत्तांत किंवा निदान खूण कोठे उपलब्ध होत नाही. तस्मात् हे विधान अनैतिहासिक दिसते.

८ 'त्यावर चालोन घेतले......शामलाचें निर्नाम केलें.' (९.१९) सत्य, असत्य यांचे अतिशयोक्तीच्या मसाल्याने भरलेले त्रासदायक मिश्रण या विधानात दिसून येते. निर्नाम केले म्हणजे समूळ नाश केला, हे म्हणणे तर सर्वथैव चुकीचे; जंजिऱ्याच्या सिद्दीचे संस्थान सन १९४७ पर्यंत अस्तित्वात होते. राजारामाच्या कारकीर्दीत सिद्दीशी मराठ्यांचे प्रत्यक्ष युद्धप्रसंग झाले असल्याचा दाखला मिळत नाही. पण पुढे दुसऱ्या शिवाजीच्या कारकीर्दीत ताराबाईने सिद्दीला नतीजा पावविण्यासाठी उठाव केला होता असे दिसते.[१] हा 'चौतर्फा एलगार' नसून 'फक्त खुष्कीने लष्कर घालून' केलेला हल्ला होता. परंतु त्यामुळे शामल वठणीवर आला असे दिसत नाही. इ० स० १७०८ पर्यंत तो जोरावर होता व त्याच्याशी कटकटी चालूच होत्या असे दिसते.[२]

९. 'अनुपदें सावंतादि जे राज्यास संकटभूत जाहले होते त्यांचा निःपात केला' (९.२०). सावंताच्या वाडीवर स्वारी करून वाडी घेतल्याचा उल्लेख तत्कालीन पत्रात आढळतो.[३] ही स्वारी इ. स. १७१० मध्ये १४ ऑक्टोबरच्या अगोदर झाली. पण वाडी घेतली तरी सावंताचा निःपात केला अशातली गोष्ट नाही. त्याला जरब बसवून त्याचे संस्थान कायम ठेवले. ते सन १९४७ पर्यंत अस्तित्वात होते.

१०. 'पूर्व पश्चिम दक्षिण......मारून काढिले.' (१०.२-४) हे विधान अगदी मोघम व पोकळ गौरवाचे आहे. इ. स. १७०० ते १७०४ पर्यंत यवनांनी मराठ्यांचे अनेक किल्ले काबीज केले होते ते मराठ्यांनी परत जिंकून घेतले, या गोष्टीस अनुलक्षून हे विधान केले असेल तर नकळे.

---

१ सरदेसाई 'स्थिरबुद्धि राजाराम' पृ. १२३.

२ राजवाडे, खंड ८, ले. ६० हे प्रतिनिधीने पंताला लिहिलेले पत्र आहे. त्यात प्रतिनिधी लिहितो, "शामळासी सख्य कोणे रीतीने करावें म्हणून लिहिलें तरी शामळ सलियास तूर्त येतो हें तो दिसत नाही. कदाचित् आलाच तरी चौथाई देऊं करावी आणि तह करावा..." या पत्रावर मिती नाही. राजवाड्यांनी १७०८ हे त्याचे साल अंदाजाने दिलेले दिसते.

३ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ७८.

११. 'सालेरी अहिवंतापासून......नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत स्वामीचें राज्य निष्कंटक जाहलें' (१०.४–२०). उत्तरोत्तर चढत्या अतिशयोक्तीने भरलेला हा मजकूर म्हणजे लेखकाचे अनिर्बंध कल्पनाविलसित होय. 'गतराज्य संपूर्ण आक्रमिलें' हे पहिल्या वाक्यातील विधान म्हणजेच मोठी अतिशयोक्ती होय. राजाराम जिंजीहून परत आल्यानंतर जिंजी व कर्नाटकातील मुलूख मोगलांनी जिंकला तो परत मराठ्यांऱ्याकडे आल्याचे इतिहासावरून दिसत नाही. उत्तरेकडे सालेरी अहिवंतापर्यंत राजाराम किंवा दुसरा शिवाजी यांच्या काळात मराठ्यांचे राज्य स्थिर झाले होते असे दिसत नाही. विजापूर आणि भागानगर यांच्यावर राजाराम किंवा ताराबाई या खाशांनी कधी स्वारी केली होती असे दिसत नाही. तीच गोष्ट औरंगाबाद व बुऱ्हाणपूर यांची. या स्वाऱ्या आणि तिकडील 'तुंबळ युद्धप्रसंग' हे सर्व लेखकाने स्वामिगौरवास्तव उभविलेले कल्पनाविलसित आहे. राजारामकाली आणि ताराबाईच्या अमदानीत कदाचित काही सरदारांच्या ('स्वामी'च्या नव्हेत) स्वाऱ्या नर्मदेपर्यंत गेल्या असाव्यात.[१] पण त्या लुटीकरिता व शत्रूस धाक बसविण्याकरिता. अंमल बसविण्याच्या दृष्टीने त्यांचा काही उपयोग नव्हता. 'नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत स्वामीचें राज्य निःकंटक जाहलें,' हे विधान तर अतिशयोक्तीतही शोभण्याजोगे नाही.

१२. 'मुख्य शत्रु अवाई खावोन...शत्रूचा पराभव करावा' (११.२–१२). इथे लेखकाने मांडलिक, द्विधाभाव इत्यादि परंपरागत प्राचीन राजनीतीतले शब्द वापरून प्रौढ वर्णनाचा आव आणला आहे. पण हा सर्व मालकाला खूश करण्याकरिता लेखकाने उभारलेला कल्पनेचा डोलारा होय. इ. स. १७०७ साली मोगलांच्या छावणीतून शाहू सुटून आल्यानंतर त्याच्या विरोधात राज्य संभाळण्यात दिवसानुदिवस ताराबाईंची तारांबळ उडत होती. संभाजी राज्यावर आला तरी त्याचीही अवस्था तीच होती. तेव्हा उत्तर हिंदुस्थानात स्वारी करण्याचे असले अगडबंब बेत तो कसे काय करणार ?

१३. 'स्वामी सुमुहूर्ते नर्मदापार जहाले......श्री विश्वेश्वरस्थापना करीत' (११.१४ ते १७). संपूर्ण आज्ञापत्र रामचंद्रपंताचे मानून त्याच्याकडे आदरप्रेरित सढळ दृष्टीने पाहणाऱ्या विवेचकांनाही या मजकुराने गुंगविले आहे. प्रा. व.

---

१ सरदेसाई, 'स्थिरबुद्धि राजाराम', पृ. ८९, १२५.

दी. राव यांनी राजारामाने इ. स. १६९१ साली हणमंतराव घोरपडे यास लिहिलेल्या एका पत्राचा आधार देऊन मराठ्यांची दिल्लीवर चाल करून जाण्याची विजिगीषु वृत्ती या मजकुरात प्रकट झाली आहे अशा अर्थाचे समर्थन केले आहे ! म्हणजे या मजकुराचा जो कोणी लेखक असेल त्याने त्या काळच्या मराठ्यांच्या मनात वसत असलेला उत्तरदिग्विजय करण्याचा मनोरथ व्यक्त करण्यासाठी तो दिग्विजय प्रत्यक्ष घडत आहे असे दडपून खोटे लिहिले ! यापेक्षा या समर्थनाचा अधिक अर्थ काय ? आणि हा लेखक रामचंद्रपंत !

१४. 'दक्षिणप्रांतसंरक्षणार्थ......संतोष पावेत तें करणें' (११.१८ ते १२.३) या मजकुराने तर सर्वांस अधिकच बुचकळ्यात पाडले आहे. ज्यांच्याविषयी निरतिशय पूज्यभाव इथे प्रकट केला आहे अशा ह्या मातुश्री कोण ? जीविताधिक प्रियतम राजकुमार कोण ? या कूट प्रश्नाचा मागे उल्लेख केलाच आहे. (उ. १३, १४) प्रा. राव यांनी हे वाक्य राजाराम रायगड सोडून निघाला तेव्हा लिहिले असावे आणि मातोश्री म्हणजे संभाजीची पत्नी येसूबाई आणि प्रियतम राजकुमार म्हणजे तिचा पुत्र शाहू हा असावा असा तर्क केला आहे.[1] काही-जणांनी मातुश्री म्हणजे ताराबाई आणि राजकुमार म्हणजे तिचा पुत्र शिवाजी असा तर्क केला आहे[2] तो उघड उघड चुकीचा आहे. शिवाजी संभाजीपेक्षा वयाने मोठा होता आणि ताराबाईला तर त्याने बंदीत ठेवले होते. प्रा. रावांचा तर्कही पटत नाही. राजारामाला येसूबाईविषयी कितीही आदर असला तरी येथील मजकुरात जो परमावधीचा पूज्यभाव परोपरीने दर्शविला आहे तो जन्मदात्या मातेशिवाय दुसऱ्या कुणाविषयी दाखवणे पूर्णपणे असंभाव्य वाटते. बहुवचनावरून राजकुमार कदाचित अनेक अभिप्रेत असावेत.

या मजकुराच्या संबंधाने एक गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे, ती मागे सांगितलीच आहे. या मजकुराला जाब देणारा असा जो मजकूर ९ व्या प्रकरणाच्या अखेरीस आहे, त्यात राजकुमारांचा उल्लेख— तिथे अवश्य पाहिजे असूनही—नाही. यावरून २ ऱ्या प्रकरणाच्या अखेरीस असलेला राजकुमारांचा उल्लेख प्रक्षिप्त असावा की काय असा संशय उत्पन्न होतो. इथे उल्लेखिलेल्या

---

१ राजवाडे संशोधन मंडळ प्रकाशित 'आज्ञापत्र', प्रस्तावना, पृ. २०.

२ वीणा प्रकाशनने प्रकाशित केलेले 'आज्ञापत्र', प्रस्तावना, पृ. ७, ८.

श्रीमन्मातुश्री कोण व त्यांचा उल्लेख इथे का झाला, याविषयी आमची जी समजूत झाली आहे ती आम्ही लवकरच निवेदन करू. त्यावेळी या प्रश्नाचा काहीसा उलगडा होईल.

## पूर्वग्रह बाजूला ठेवून विचार

प्रास्ताविक भागा-(प्रकरणे १, २) चे काहीसे तपशीलवार निरीक्षण एथवर केले आता सगळे पूर्वग्रह बाजूला ठेवून विचार असा करायचा की अशा तऱ्हेचा हा मजकूर प्रत्यक्ष राज्यकारभार पाहणाऱ्या कोणा जबाबदार मुत्सद्याने लिहिला असणे शक्य आहे काय ? असा मनुष्य तिथि-वार यांची चूक कशी करील ? अष्ट-प्रधानांपैकी एक प्रधान शामळाशी कटकटी चालू असलेल्या प्रत्यक्ष पाहत असता काय शामळाचे निर्नाम केले म्हणून लिहील ? वीस वर्षे सारखी झुंज देऊनही औरंगजेबाचा सेनासागर राज्यातून हटला नाही हा नुकताच घडलेला ढळढळीत इतिहास डोळ्यांसमोर असता पंत अमात्य 'अशेष यावनी सेना शलभन्यायें विदग्ध होऊन पराजय पावली' असे लिहील ? कल्याण भिवंडी प्रांतातील आपली वतने सोडवून घेण्यासाठी ज्याला मुसलमान सुभेदाराची अजीजी करावी लागत होती[1] तो रामचंद्रपंत काय त्याच वेळी 'सालेरी अहिवंतापासून चंजी कावेरी तीरपर्यंत गतराज्य संपूर्ण आक्रमिलें' असा धादांत पोकळ मजकूर लिहील ? विजापूर भागानगरादि स्थळे आणि औरंगाबाद बुऱ्हाणपुरादि यवनेशांची गुल्मे यांच्या वाटेसही खासा स्वामी गेले नसता ती स्थळे हस्तगत केल्याचे कोणी जबाबदार कारभारी कधी तरी लिहील काय ? स्वगौरव स्वामिगौरव यांच्याकरिता जाणता व जबाबदार मनुष्यदेखील अतिशयोक्ती करील. पण ती किती ? प्रस्तुत वर्णनात लेखकाने कोणतीच मर्यादा राखलेली दिसत नाही.

दुसरा एक विचार असा की प्रास्ताविक भागाच्या लेखकाने 'स्वामी' हा शब्द अनिश्चित अर्थी वापरल्यामुळे या दोन भागांमध्ये जो घोटाळा उडाला आहे, तो कोणी जबाबदार व निश्चित माहितीच्या लेखकाने हा भाग लिहिला असता तर

१ पंत अमात्य बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ९४. हा लेख ता. ९-४-१७१५ चा, म्हणजे आज्ञापत्रावर जो काळ दिला आहे त्याच सालातला आहे.

उडाला नसता. प्रत्येक छत्रपतीच्या काळात घडलेल्या घटनांचा स्थूलमानाने परंतु निःसंदिग्ध उल्लेख करण्यास हरकत काहीच नव्हती. रामचंद्रपंत हा शंभु छत्रपतीला आजोबा शोभण्याजोगा होता. पोकळ गौरवाचा अवडंबरमय मजकूर लिहिण्यापेक्षा मोकळ्या मनाने सर्व छत्रपतींचा उल्लेख करून स्थूल हकीकत लिहिणे हेच त्याला शोभले असते. दुसऱ्या शिवाजीपासून सर्व वतनांचे संकलित आज्ञापत्र त्याने घेतले, (ज्याचा मसुदा बहुधा त्यानेच केला असावा,) त्यात सर्व छत्रपतींचा क्रमाने उल्लेख असून त्यांच्या कारकीर्दीत पंताने काय कामे केली याचे त्रोटक परंतु वेचक वर्णन आहे.[१] आज्ञापत्राची प्रास्ताविक प्रकरणे पंताने, नीलकंठ मोरेश्वराने किंवा कोणा जबाबदार व माहितगार अधिकाऱ्याने लिहिली असती तर वस्तुस्थितीची बूज राखून तारतम्याने लिहिली गेली असती. अशा लेखकाने सर्व छत्रपतींचा उल्लेख अवश्य केला असता.

तेव्हा निष्कर्ष असा की प्रास्ताविक भागाचा जो मजकूर आपल्या दृष्टीस पडतो तो अष्टप्रधानासारख्या कोणा जबाबदार अधिकाऱ्याने लिहिला नसून तो फारशी माहिती नसलेल्या परंतु प्रौढ भाषा लिहिण्याची हौस असलेल्या अशा एखाद्या खालच्या दर्जाच्या कारकुनाने किंवा छत्रपतीच्या आश्रिताने लिहिला असावा. त्याने अगदी आरंभीचा मजकूर घालून या एकंदर प्रबंधाला शंभु-छत्रपतीने काढलल्या आज्ञापत्राचे रूप दिले. त्यात त्याचा हेतु आपला स्वामी जो शंभुछत्रपती त्याचा अधिकात अधिक गौरव करून त्याची मर्जी संपादन करावी, हा दिसतो. म्हणूनच त्याने 'स्वामी' या शब्दाचा या दोन प्रकरणात असा गोलमाल व संदिग्ध प्रयोग केला आहे की थोरल्या शिवाजीमहाराजांचे वर्णन वगळल्यास बाकीचे स्तुतिपर वर्णन शंभुछत्रपतीला येऊन चिकटावे. पहिला संभाजी आणि दुसरा शिवाजी यांचा उल्लेख टाळला आहे याचेही कारण हेच. संभाजी आणि राजाराम यांच्यात विरोध, अशी लेखकाची स्वाभाविक कल्पना; ताराबाईचा मुलगा दुसरा शिवाजी याच्याशी शंभुछत्रपतीचा विरोध तर या लेखकाच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष घडलेला असणार. तेव्हा आपल्या लेखनात या दोघांचा पर्यायानेदेखील संबंध येऊ नये अशी रचना त्याने करावी हे क्रमप्राप्त होते. रामचंद्रपंत अमात्य यांचा उल्लेख त्याने आरंभी केला याचे कारणदेखील

---

१ बावडा दप्तर, भाग १ ला, ले. ५२.

आपण समजू शकतो. त्या वेळी करवीर राज्यात वयाने योग्यतेने आणि पदवीने सर्वश्रेष्ठ असा मनुष्य रामचंद्रपंत हाच होता. छत्रपतीबरोबर त्याचीही मर्जी आपण प्रसन्न करून घ्यावी असे कोणाही आश्रितास वाटणे स्वाभाविक होते.

हा प्रास्ताविक भागाचा लेखक चांगले संस्कृत जाणणारा, प्रौढ अर्थगौरवात्मक शैलीमध्ये लेखन करू शकणारा असा मनुष्य असला पाहिजे. राजकीय घडामोडी आणि वृत्तांत यांच्याशी त्याचा घनिष्ठ संबंध नसावा. प्रत्यक्ष।प्रत्यक्ष कानी पडलेल्या अर्धवट हकीकतींच्या आधारावर सामान्य विधाने आणि पोकळ भरमसाट प्रशंसा यांनी भरलेली काव्यात्म रचना त्याने केली, तोच हा आज्ञापत्राचा प्रास्ताविक भाग.

## ५

## आज्ञापत्राचा खरा कर्ता कोण ?

प्रास्ताविक भाग सध्या ज्या स्वरूपात आहे त्या स्वरूपात तो पंताने किंवा नीलकंठ मोरेश्वराने लिहिला असणे शक्य वाटत नाही. तसेच 'आज्ञापत्रा'चा राजनीतिविषयक भाग (प्रकरणे ३–९) प्रास्ताविक भागाच्या लेखकाने लिहिलेला असणे संभवनीय वाटत नाही. या मुद्याचा पूर्वी उल्लेख केलाच आहे. राजनीतिविषयक भागामध्ये प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांची राजनीती प्रतिबिंबित झाली आहे याविषयी सर्व अभ्यासकांचे एकमत दिसते. या राजनीतीची जी जी म्हणून विशिष्ट तत्त्वे होती त्यांपैकी बहुतेक सर्व तत्त्वे राजारामाच्या व त्याच्यानंतरच्या काळात बाजूला सारली गेली आणि तद्विरुद्ध व्यवहार सुरू झाला. ही कलाटणी देण्यात रामचंद्रपंत प्रमुख होता. हे सर्व तो स्वतःच्या आवडीने आणि प्रेरणेने करीत होता; आज्ञापत्रावर जो काळ आहे त्या काळापर्यंत त्याचा उद्योग अशाच तऱ्हेने चालला होता. तेव्हा "शिवाजीच्या वेळची राजकारणपद्धति आमूलाग्र बदललेली पाहून त्या वृद्ध मुत्सद्याला वाईट वाटणें साहजिकच आहे. ही परिस्थिति बदलून मराठेशाहीला योग्य वळण लावावें ह्या हेतूनें १७१५ सालीं हें आज्ञापत्र शंभुछत्रपतीच्या नांवाने त्याने प्रसिद्ध केलें असावें"[१] असे जे म्हणणे आहे त्याला काही आधार नसल्यामुळे आणि त्याच्याविरुद्ध पुरावा उपलब्ध असल्यामुळे ते मान्य करिता येत नाही.

---

१ प्रा. व. दी. राव, राजवाडे संशोधन मंडळ प्रकाशित 'आज्ञापत्र', प्रस्तावना, पृ. १६.

उच्चतम प्रतिभेचे एक लक्षण असे आढळते की अत्यंत व्यापक महान तत्त्वांपासून तो सूक्ष्मतम तपशिलापर्यंत सर्व गोष्टींचा प्रत्ययपूर्वक निर्णय घेण्याचे सामर्थ्य अशा प्रतिभावंताच्या ठायी काम करीत असते. सत्य अहिंसा या जीवनाधारभूत तत्त्वांच्या चिंतनात मग्न असलेली गांधीजींची बुद्धी गुरांच्या शेणाचा काय उपयोग करावा आणि आंब्याच्या कोयीचा अन्न म्हणून कसा वापर करता येईल याचा विचार तितक्याच तन्मयतेने करीत असे. आज्ञापत्राचा कर्ता राजाने सदोदित ईश्वरशरण व आत्मवश असावे या महान तत्त्वाचे प्रतिपादन एकीकडे करतो, तोच किल्ल्यावरील केरकसपट सर्व जाळून त्याची राख परसात टाकून त्यावर भाजीपाला करावा, हा बारकावादेखील पाहू शकतो (५३·२०). अशा तऱ्हेच्या सर्वतोगामी प्रतिभेचा प्रत्यय ज्या 'आज्ञापत्रा'च्या पानापानामधून येतो त्याच्या कर्तृत्वाचे श्रेय काही आधार नसताना रामचंद्रपंतास देण्याच्या प्रवृत्तीमुळे या संबंधातले स्वाभाविक असे जे अनुमान आहे ते झाकोळून गेल्याप्रमाणे झाले आहे.

ते अनुमान हेच की ज्या महानुभाव व्यक्तीचे विचार, तत्त्वे आणि धोरणे या प्रबंधात प्रतिबिंबित झाली आहेत (असे सर्वांचे म्हणणे आहे) त्याच व्यक्तीकडून याची निर्मिती झाली असावी. पुष्कळ चिंतनाअंती प्रस्तुत लेखकाचे असे मत झाले आहे की या राजनीतीचे कर्ते प्रत्यक्ष शिवाजी महाराज होत, दुसऱ्या कोणाच्या बुद्धीतून ही निघालेली असणे शक्य वाटत नाही. राजनीतीतले प्रत्यक्ष शब्द सगळेच महाराजांच्या तोंडून निघालेले नसतील. पण त्यातला अर्थ--विचार आणि आशय—महाराजांनी सांगितलेला असला पाहिजे. गाढ धर्मश्रद्धा, संपूर्ण ईश्वरशरणता, प्रजाहितदक्षता आणि प्रजावात्सल्य, राज्यकारभारातील आणि बंदोबस्तातील कडक शिस्त व जरब, अशा अनेकानेक भावांच्या छटा त्या त्या स्थली ज्या उमटलेल्या दिसतात त्या महाराजांच्याखेरीज दुसऱ्या कोणाच्या असणे शक्य आहे ! हा संपूर्ण प्रबंध म्हणजे ज्याच्यापुढे ब्र म्हणायची कोणाची प्राज्ञा नाही अशा जबरदस्त अकुतोभय अधिकारी पुरुषाचे बोल वाटतात. "अन्याय खरा जाला तरी तात्काळ बेमुलाहिजा त्याचा शिरच्छेद करावा आणि तें मस्तक गडोगडीं फिरवावें..." (४९·१०). "कदाचित् कोण्ही मामलेदार... गनिमाकडे गेला तरी तो यत्नेंकडून हस्तगत होय ते गोष्ट करावी. कदाचित् हातास न लागे तरी त्याचे लेक गुलाम करावे, बायका बटकी कराव्या, त्यासहि विष अथवा मारेकरी घालोन हरप्रयत्नें तेथील तेथे मारवावा." (५०·१५–२०)

असले कठोर शासनाचे बोल काय रामचंद्रपंताच्या तोंडून निघणे शक्य आहे ! तो तर अनेक सरफराजीची आणि इनामवतनांची आमिषे दाखवून शिलेदार सरदारांना कार्यतत्पर करण्यासाठी धडपडत होता; त्याच्या काळात पिसाळासारख्या लोकांची मराठ्यांकडून मोगलांकडे आणि मोगलांकडून मराठ्यांकडे आमदरफ्ती चाललेली होती !

## या संबंधात आणखी सहायभूत विचार

आज्ञापत्रात शिवाजीमहाराजांचीच राजनीती प्रकट झाली आहे हे मान्य असल्यानंतर त्यावरून निघणारे स्वाभाविक अनुमान 'ती महाराजांनीच सांगितलेली असावी' हे पटण्यास काही अडचण वाटू नये. राजनीती-संबंधाचे आपले विचार एकदा ग्रंथनिविष्ट करून ठेवावे असे महाराजांना केव्हा वाटले असेल ? सततोद्योगाने खचून भरलेल्या त्या आयुष्यात मनात वावरत असलेले विचार सुसंगत रीतीने एकत्र जुळवून सांगण्याइतकी उसंत त्यांना कोणत्या संधीस मिळाली असेल ? असा काळ त्यांच्या आयुष्यात एकदाच आला. तो म्हणजे जयसिंगाशी तह करून ते औरंगजेबाच्या भेटीला उत्तरेत गेले तेव्हाचा होय. राजे ५ मार्च १६६६ रोजी उत्तरेस जाण्यास निघाले व सवादोन महिन्यांनी आग्र्यास पोचले. या दीर्घ अवधीत त्यांना विशेषसे काही काम नव्हते. मातुःश्री जिजाबाई यांना दक्षिणप्रांतसंरक्षणार्थ ठेवले होते आणि मोरोपंत पिंगळे प्रभृती मुत्सद्यांच्या सल्ल्याने त्यांनी कारभार पाहावा अशी योजना केली होती. त्रिंबकपंत डबीर, निराजी रावजी, माणकोजी सबनीस इत्यादि नामवंत कारकून राजांनी आपल्याबरोबर घेतले होते. असा कयास होतो की याच काळात नर्मदापार होत असता राजांनी ही राजनीती सांगितली असावी आणि ती जवळच्या कारकुनांनी आपल्या प्रौढ भाषेत सजवून लिहून काढली असावी. हे राजनीतीचे टिपण दक्षिणेत राहिलेल्या मोरोपंतादि मुत्सद्यांकडे पाठविण्याच्या उद्देशाने त्याला लहानसे प्रास्ताविकही जोडले असावे. "दक्षिणप्रांतसंरक्षणार्थ श्रीमत्सकलतीर्थैकतीर्थ श्रीमन्मातुश्री राहिली आहेत" (११·१८) हे व पुढील मातृभक्तिदर्शक उद्गार त्या प्रास्ताविकातले असले पाहिजेत. राजे यांची मातृभक्ती निरुपम होती हे सुप्रसिद्ध आहे. "स्वामी कायवाङ्मनसा मातुश्रीसाहेबांचे चरणाविरहित अन्य दैवत जाणत नाहींत. हें राज्य व हा कीर्तिलाभ

च पुढे जें होणें यशप्राप्ति हा सकलहि त्यांचे चरणाचा प्रसाद ! त्यांची आज्ञा परिपालन करून त्यांचें चित्त प्रसन्न करून घ्यावें यापरतें स्वामीस इतर इष्ट साधन नाही." विचार करा ! हे परमपूज्यभावदर्शक उदात्त उद्गार राजियांखेरीज दुसऱ्या कुणाच्या तोंडून निघणे शक्य आहे ? सबंध छत्रपतींच्या कुळात हे उद्गार जिच्या संबंधात पुरते शोभून दिसतील अशी मातापुत्रांची जोडी दुसरी झाली नाही ! त्या धन्य जिजामातेच्या संबंधाने राजियांचे हे निरतिशय भक्तिभावाचे उद्गार वाचून ज्याचा कंठ बाष्पगद्गद होणार नाही, असा मराठा वास्तविक असणे शक्य नाही. विवेचकांची मति अव्हांटे चालल्यामुळे हे आनंदनिधान तिला दिसले नाही. हा पूज्य मातेचा उल्लेख राजांनी पुन्हा 'आज्ञापत्रा'च्या शेवटी करून त्याला एक प्रकारे मुद्रांकित केले आहे, हे मागे सांगितलेच आहे.

आणखी एक विचार आहे. 'आज्ञापत्रा'च्या अगदी अखेरीस "तदोत्तर तुमच्या विचारें आणखीहि कितेक नाजूक धंद्याचे नेम...ते सर्वहि यथान्यायें करून दिल्हे जातील." (६२.१५-१७) यावरून असे दिसते की आज्ञापत्रकाराच्या मते सांगावयाचा सर्व विषय पूर्ण झाला नव्हता; आणखी काही बाबती त्याला सांग वयाच्या होत्या. एकंदर प्रबंधाचा शेवटही कडा तुटल्याप्रमाणे एकाएकी झाल्यासारखा दिसतो. असे होण्याचे कारण काय असावे ? त्याच्या कर्त्याला पुढे अवसर मिळाला नाही, हेच कारण असले पाहिजे. आणि अवसर संपला, फुरसत नाही, अशी परिस्थिती कुणाच्या आयुष्यात होती ? अविरत श्रमसाहसाने आणि घडामोडींनी खचून भरलेल्या राजियांच्याच आयुष्यात. रामचंद्रपंत किंवा निळो मोरेश्वर किंवा इतर कोणी जर आज्ञापत्राचा कर्ता असता तर त्याला शंभु छत्रपतीच्या तोंडी झाले तरी असे उद्गार घालण्याचे काय कारण ? त्याला आणखी काही लिहायचे असते तर, आज नाही उद्या, केव्हा तरी त्याने लिहून काढले असते. ज्याला खरोखरीच काही सांगायचे आहे, पण ते सांगण्यास फुरसत नाही, अशाच्याच तोंडून असे उद्गार निघणे शक्य आहे.[१] अशी व्यक्ती राजे यांच्याखेरीज दुसरी कोण असणे शक्य आहे ?

---

१. वरील वाक्यात 'तुमच्या विचारें' या शब्दांनी दक्षिणेत राहिलेल्या मुत्सद्यांचा विचार घेण्याची इच्छा प्रकट केली आहे, हे खरे. पण हे गौरवार्थ अर्थवादात्मक समजले पाहिजे. आतापर्यंत इतके अमोल विचार ज्याने एकट्याने सांगितले, त्याला बाकीच्या गोष्टींकरिता इतरांचा विचार घेईपर्यंत अडून बसावेसे वाटेल हे असंभवनीय होय.

राजियांचे वय या वेळी छत्तीस वर्षांचे होते. स्वराज्यस्थापनेच्या उद्योगाला लागून २१ वर्षे झाली होती. या काळात त्यांनी कितीतरी किल्ले काबीज केले, लढविले, नवीन बांधले, किल्ल्यांच्या आधारे राज्यप्रसार केला; आरमार उत्तम सजविले, सिंधुदुर्ग हा बळकट जंजिरा बांधला आणि दर्यावर्दी गनिमांच्या मनात दहशत उत्पन्न केली; मातीतून रत्ने काढावी त्याप्रमाणे मोरोपंतासारखे सव्यसाची आणि बाळाजी आवजी, निळोपंत, रघुनाथपंत यांच्यासारखे लेखणीचे पक्के सरकारकून, नेताजी, तानाजी, बाजी देशपांडे, येसाजी यांच्यासारखे शूरमर्द सरनोबत, असे अनेकानेक ' कृतकर्मे ' निर्माण केले; देशमुख, देशकुलकर्णी इत्यादि ' दायादां ' प्रमाणे वागणाऱ्या वतनदारांना शिकस्त करून देशाधिकारी, देशलेखक इत्यादि आज्ञाधारक सेवकांची श्रेणी निर्माण केली; याप्रमाणे नूतन सृष्टी निर्माण करण्याचे काम बरेचसे उरकून ते मनात काही तरी हेतु योजून औरंगजेबाच्या भेटीच्या निमित्ताने उत्तरेकडे चालले होते. त्या लोकोत्तर प्रतिभेच्या डोक्यात अपरंपार अनुभवांची कडसणी होऊन राजनैतिक विचारांचा परिपाक सिद्ध झाला होता. उत्तरेस संकटाच्या जबड्यात आपण जातो, पुढे काय होईल काय नाही, तेव्हा राजधर्म, राजशासन यासंबंधी जे विचारनियम आपल्या मनात स्थिर झाले आहेत ते लेखरूपाने चिरस्थायी करावे असे राजांना वाटणे स्वाभाविक, नव्हे अनिवार्य होते. बरोबर जी कारकून मंडळी होती त्यांना फुरसतीनुसार राजे आपले विचार सांगत असतील; प्रौढ अभिजात शैलीमध्ये ते विचार मांडून ही कारकून मंडळी राजांना वाचून दाखवीत असतील आणि राजांच्या पसंतीनुसार पक्के करीत असतील. धीरेधीरे असा क्रम चालत असता वाट संपली, पण विचार संपले नाहीत, अशी स्थिती आली; तेव्हा तिथेच पुरे करून मातुःश्रीचा उल्लेख असलेली उपक्रमोपसंहाराची वाक्ये लिहून राजांनी हे लिखित दक्षिणेकडे पाठवून दिले असेल. पुढचा एकंदर काळ धामधुमीचाच गेला. तेव्हा छत्रपतींच्या दप्तरात हे लिखित अलक्षित अवस्थेत पडून राहिले असेल. राजारामकाली कदाचित कुणाच्या तरी हाती पडून त्याच्यावर थोडेसे संस्करण झाले असेल. पहिल्या प्रकरणाचा बराचसा भाग राजारामकाळी लिहिला असणे शक्य आहे. त्यातला मजकूर, शंभुछत्रपतिविषयक आरंभीचा उल्लेख वगळता, बहुतांशी व्यवस्थित व (गौरवाची प्रवृत्ती जमेस धरून) यथातथ्य आहे. हे संस्करण करणारा गृहस्थ सभासद बखरीशी परिचित असावा. पुढे शंभुछत्रपती ( करवीरकर ) याच्या

काळात ते आणखी कोणा तरी आश्रिताच्या हाती पडून त्याने स्वामिगौरवार्थ त्याच्यावर आणखी संस्करण करून ते आज दिसते त्या स्वरूपात तयार केले असले पाहिजे. प्रास्ताविक भागात जे घोटाळे व प्रमाद झाले असल्याचे मागे वर्णिले आहे ते या संस्करणात झाले असावेत. या संस्करणकाराच्या हातून मूळ हस्तलिखित नष्ट होणे क्रमप्राप्तच होते. ते जर जिवंत राहिले असते तर या गृहस्थाच्या बहादुरीचे बूडच नाहीसे झाले असते. हा संस्करणकार कोण, याचा पत्ता आपल्याला सध्याच्या ज्ञानाच्या स्थितीत काही लागत नाही. पण तो रामचंद्रपंत किंवा दुसरा कोणी उच्चपदस्थ अधिकारी असणे शक्य वाटत नाही, हे पूर्वी निर्दिष्ट केलेच आहे. बावडा येथील पंत अमात्यांच्या दप्तरात हा ग्रंथ रामचंद्रपंतांनी लिहिला असा यत्किंचित पुरावा आढळत नाही; त्याची प्रत बावड्यास कोठेही उपलब्ध होऊ शकली नाही; असे स्वच्छ विधान कै. सरदेसायांनी केले आहे.[1] पंतांशी किंवा त्यांच्या घराण्याशी या प्रबंधाचा काही संबंध असावा असे वाटत नाही. ज्याने हे संस्करण (किंवा अपकरण) केले त्याने शंभुछत्रपतीचे नाव ज्या उद्देशाने घातले त्याच (खुशामतीच्या) उद्देशाने रामचंद्रपंताचे नाव घातले असावे. प्रास्ताविक भागाच्या अखेरीस मातुश्रीनंतर राजकुमारांचा (एक की अनेक ?) जो उल्लेख आहे तो कोणास अनुलक्षून असावा याचा तर्काने काही उलगडा होऊ शकत नाही. संस्करणकर्त्याने जशी इतर अनेक पोकळ, चुकीची आणि अनैतिहासिक विधाने केली आहेत तसेच हेही असावे. पोकळ कविकल्पनाच करायची, तर मग ती एकाच बाबतीत का ? सर्वच बाबतीत करावी ! नर्मदापार होऊन उत्तरदिग्विजय करण्याची कल्पना कधीच प्रत्यक्ष सृष्टीत अवतरणारी नसली तरी स्वामीची अहंभावना त्यामुळे चाळवली जाऊन तिला गुदगुल्या होतील; त्याप्रमाणे राजकुमाराचा उल्लेख केल्याने स्वामीची कौटुंबिक वासना चाळवली जाऊन त्याची मर्जी प्रसन्न होईल, असे स्तुतिपाठकाला वाटणे शक्य आहे. पण हा स्तुतिपाठक संस्करणकर्ता भरघोस भाषेच्या अवडम्बरात अफाट विधाने दडपून देणारा जरी असला तरी सावध किंवा चाणाक्ष नसावा. प्रास्ताविकात 'चिरंजीव जीविताधिक राजकुमारां'ना त्याने घुसवून दिले, पण त्याला जाब देण्यासाठी समारोपात हे टाकायला पाहिजे, याचे भान त्याला राहिले

१ वीणा प्रकाशनने प्रकाशित केलेले 'आज्ञापत्र', डॉ. कोलते यांचा लेख, पृ. १२, १३.

नाही ! लबाडी किंवा अपराध करणारा कितीही वस्ताद असला तरी सत्तत्त्वाचा अंमल इतका सर्वव्यापी असतो की कुठे ना कुठे फट राहूनच जाते, असे म्हणतात. तसे या बाबतीत झालेले दिसते.

६

## एकंदर विवेचनाचा मथितार्थ

या एकंदर विवेचनाचा मथितार्थ असा :—

१ 'आज्ञापत्रा'त शिवाजी महाराजांच्या राजनीतीचे आणि सांग्रामिक व्यवस्थेचे यथातथ्य प्रतिबिंब पडले आहे.

२ 'आज्ञापत्रा'चा मुख्य भाग (प्र. ३–९) स्वतः शिवाजीमहाराजांनी सांगून लिहविला असावा.

३ हे काम औरंगजेबाच्या भेटीला जाण्याकरिता महाराजांनी उत्तरेकडे प्रवास केला त्या काळात (५ मार्च ते ९ मे इ. स. १६६६) झाले असावे.

४ मातुःश्रीचा उल्लेख असलेले उपक्रमोपसंहार त्याच वेळी त्याला जोडलेले असावे

५ त्यावर एक किंवा बहुधा दोन संस्करणे होऊन 'आज्ञापत्रा'चे सध्याचे स्वरूप सिद्ध झाले. पहिले संस्करण राजारामकाली झाले असावे आणि त्यात शंभुछत्रपतीचा प्रारंभीचा उल्लेख वगळून बाकीचा पहिल्या प्रकरणाचा बहुतेक भाग लिहिला गेला असावा. हे करणारा इसम सभासद बखरीशी परिचित असावा. दुसरे संस्करण करणारा इसम कोणी तरी अर्धवट माहिती असलेला, चुकांची कदर न बाळगणारा, खुशामतीखातर पोकळ, अतिशयोक्त विधाने दडपून देणारा दरबारी आश्रित असावा. चुकांनी आणि अतिशयोक्तीने भरलेले अवडंबरमय दुसरे प्रकरण ही याची खास कर्तबगारी !

६ आठव्या प्रकरणाच्या प्रारंभीचा महाराजांचे राज्यसंपादन आणि औरंगजेबाची स्वारी यासंबंधीचा मजकूर संस्कारकाने घुसविला असावा.

७ वर निर्देशिलेल्या कारणांस्तव प्रास्ताविक प्रकरणांचा मजकूर छत्रपतींच्या सरकारातील कोणीही जबाबदार उच्चपदस्थ अधिकाऱ्याने लिहिला असणे शक्य वाटत नाही.

८ महाराजांच्या राजनीतीची जी जी विशिष्ट तत्त्वे राजनीतीत प्रतिबिंबित झाली आहेत, त्यांची जाणीव किंवा त्यांच्या महत्त्वाचे आकलन नंतरच्या छत्रपतींना व अष्टप्रधानादि राज्यचालकांना होते असे दिसत नाही. तेव्हा या तत्त्वांचे ज्यात जरबेने व अधिकारपूर्ण वाणीने प्रतिपादन केले आहे तो 'आज्ञापत्रा'चा मुख्य भाग (प्र. ३-९) कोणाही शिवोत्तरकालीन छत्रपतीने किंवा मुत्सद्याने रचला किंवा लिहिला असणे शक्य वाटत नाही.

९ आरंभी असलेल्या नामोल्लेखाखेरीज 'आज्ञापत्रा'शी रामचंद्रपंताचा काही संबंध असावा, असे मानण्यास आधार उपलब्ध नाही. आरंभीचा उल्लेख हे रामचंद्रपंताच्या कर्तृत्वाचे प्रमाण होऊ शकत नाही.

१० आयुष्यभराच्या वागणुकीत आणि राज्यकर्तृत्वात रामचंद्रपंताची जी मनोवृत्ती आणि वर्तणूक दिसून आली ती 'आज्ञापत्रा'त प्रतिपादिलेल्या तत्त्वांच्या व धोरणांच्या सर्वस्वी उलट असल्याचे दिसून येते. तेव्हा पंत 'आज्ञापत्रा'चा कर्ता असावा हे सुतराम असंभवनीय वाटते.

११ आरमार आणि दर्यावर्दी व्यवहार यांच्याशी रामचंद्रपंताचा विशेष संबंध आला होता असे दाखविण्यासाठी जो आधार पुढे करण्यात आला तो बरोबर नाही. तस्मात असा संबंध सिद्ध होऊ शकत नाही.

सध्या जी ऐतिहासिक सामग्री उपलब्ध आहे—प्रस्तुत लेखक जी पाहू शकला—तिच्या आधारे जी अनुमाने निघतात असे प्रस्तुत लेखकास वाटते ती वर निवेदन केली आहेत. सत्यसंशोधनाच्या कामी कोणताच पूर्वग्रह किंवा आग्रह असण्याचे कारण नाही. वरील विवेचनातील काही किंवा सर्व अनुमाने चुकीची ठरविण्याइतपत दुसरी बाजू बळकट आहे असे दिसल्यास ते मान्य करण्यास प्रस्तुत लेखकास आनंदच वाटेल.

## ७

## वाङ्मयीन समालोचन—प्रास्ताविक भाग

प्रास्ताविक भागाची शैली मुख्य राजनीती भागाच्या शैलीहून बरीच भिन्न वाटते, हे मागे सांगितलेच आहे. ही भाषा चांगली प्रौढ व वजनदार आहे, पण मुख्य विभागाचे तेज आणि भावसौन्दर्य यात नाही. मुख्य विभागाच्या

भाषेपेक्षा ही अधिक संस्कृतप्रचुर वाटते. वाक्ये अधिक लांब, संयुक्त स्वरूपाची आहेत. त्या काळात वाढत चाललेल्या राजकीय आणि राष्ट्रीय व्यवहारामुळे आणि स्वत्वाच्या अभिमानामुळे मराठी गद्याला प्रौढ, भारदस्त आणि डौलदार स्वरूप येत चालले होते; त्या समृद्धतेची दर्शक अशी ही भाषाशैली आहे.

पण यापेक्षा जमेच्या बाजूस अधिक काही सांगण्याजोगे नाही. हा लेखक पुनरुक्ती बरीच करतो. किंवा संस्करण करणारे दोघे असल्यास दुसरा पहिल्याचे अनुकरण करतो. पहिल्या प्रकरणाच्या पूर्वार्धाची दुसऱ्या प्रकरणाच्या पूर्वार्धात, क्वचित त्याच शब्दात, पुनरुक्ती झाली आहे. आणखी एक लक्षात घेण्याजोगी गोष्ट ही की पुढील भागातील कित्येक गोष्टींचे हा अनुकरण किंवा उसनवारी करतो. कृतकर्म, परिच्छिन्न, उपराळा, अंगेजणी, माया, उस्तवारी, आवाई इत्यादि प्र. ३ ते ९ मध्ये आलेले कित्येक शब्द हा वापरतो. यांच्यापैकी बरेच शब्द त्या काळी सर्वप्रचलित असतील; तेवढयांच्या बाबतीत अनुकरणाचा दोषारोप याच्यावर करता येणार नाही. पण ‘ दिनप्रतिदिनीं प्रतिपच्चंद्रनाय ’ (३२.१९), ‘ संपादिले वैभवावरी कृतकार्यता मानलियाने पुढील उद्योग राहतो ’ (१९.७) अशा काही शब्दप्रयोगांचे व वाक्यखंडांचे हा साक्षात अनुकरण करतो (३.१३; ११.१). हुजरातीचा विषय मुळात ‘ राजधर्म ’ प्रकरणात (२०, २१) आला आहे, त्यावरूनच याने प्र. २ मधील हुजरातीविषयीचा मजकूर लिहिला असावा असे दिसते (८.६–२०). त्यात शब्दसाम्यही बरेच आहे. अनुकरणाची आणखी कित्येक स्थळे पुढे टीपांमध्ये दाखविली आहेत.

या साम्यावरून प्र. ३ ते ९ यांचा लेखक व प्र. १, २ यांचा लेखक हे एकच असले पाहिजेत असे कित्येकजण अनुमान काढतात. पण खरोखर अनुमान याच्या उलट निघते. प्र. ३ ते ९ या भागाची जी योग्यता आपण पाहिली आहे, त्यावरून त्याचा लेखक स्वतःच्या मजकुराची अशी पुनरुक्ती करील असे वाटत नाही. त्याच्या ठायी असले कल्पनादारिद्र्य असल्याची कल्पना करवत नाही. एकाच लेखकाच्या–समर्थ लेखकाच्या–मजकुरात शब्दांचे साम्य असू शकेल; पण कल्पना व वर्णने यांची उसनवारी असू शकणार नाही. तेव्हा या साम्यामुळे दोन्ही भागांच्या लेखकाचे एकत्व सिद्ध होत नसून हे लेखक भिन्न असले पाहिजेत असे मानण्याला तो एक आधार होतो. अर्थात हे साम्य नसून अनुकरण आहे; आणि ते राजनीती विभागातल्या काही अंशाचे प्रास्ताविक भागाच्या लेखकाने केलेले आहे.

## वाङ्मयीन समालोचन—राजनीती विभाग

### अ

### अर्थभारवती वाणी

राजनीतीभागाचे वाङ्मयस्वरूप अतिशय उज्ज्वल आहे. तसे होण्याचे कारण एकच आहे. महाप्रतिभाशाली पुरुषाचे हे खडे तात्त्विक बोल आहेत. जीवनाच्या सारभूत तत्त्वाची ज्याला प्रतीती आली आहे आणि योगयुक्त कर्मरततेमुळे ज्याचे अंतरंग प्रकाशमान झाले आहे असे व्यक्तित्व या बोलांच्या मागे उभे आहे, अशी जाणीव विचक्षण वाचकाला झाल्याखेरीज राहत नाही. याच्यातच या प्रबंधाचे सामर्थ्य आहे.

जो पुरुष हे निरूपण करायला बसलेला आहे, तो जणू आपले विचार बाहेर टाकीत आहे आणि त्या प्रभातरल विचारगोलकांभोवती शब्द गोळा होऊन त्याला काही रंगरूप देत आहेत ! शब्दांना तो समग्र विचार पेलत नाही, त्यातल्या कित्येक अर्थच्छटांचे शेव अंतराळात मोकळे सुटून जातात. त्यांचे आकलन करण्याचा यत्न रसिक मनाला आनंद देणारा ठरतो. इतका मूल्यवान अर्थ इतक्या लहानशा अवकाशात भरलेला, असा प्रबंध मराठीत दुसरा नसेल. ‘ अर्थभारवती वाणी भजते कामपि श्रियम् । ’ हे वचन इथे सार्थ ठरते.

काही लोकांच्या मनामध्ये व्यक्त करावयाचा अर्थ सर्व पैलूंसह रेखीवपणे उभा राहत नाही, काहीजणांना अर्थ व्यक्त करण्यासाठी योग्य शब्द सापडत नाहीत, काहीजणांना उपमादि अलंकारांची मदत अर्थव्यक्तीसाठी घ्यावीशी वाटते, तर काहीजण व्यक्तीकरणाचा साक्षात मार्ग जमत नसल्यामुळे मुख्य गाभ्याच्या भोवती रिंगण घालीत असल्यासारखे दिसतात. आज्ञापत्रकर्त्याच्या बाबतीत हे काही नाही. जे सांगायचे आहे त्याविषयीचा त्याचा अधिकार इतका मोठा आहे की एकदम त्याच्या गाभ्याला तो हात घालतो; ‘ शब्दांनो मागुते या ’ अशी शब्दसृष्टीला तो आज्ञा करू शकतो; आणि मुख्य विचार घनीभूत स्वरूपात रोखठोक रीतीने व्यक्त करतो. उदाहरणे घेण्याकरिता धुंडीत बसण्याचे कारण नाही. मासल्यादाखल कुठलेही वाक्य किंवा कोणतेही विधान घ्या. प्रकरण ६ च्या आरंभीचे वाक्य पहा. ‘राज्यांतील वतनदार...देशनायकच आहेत” (३६·१).

'प्राकृत परिभाषा मात्र आहे' हे शब्द किती समर्पक बहुलार्थक योजिले आहेत! प्राकृत म्हणजे सर्वसामान्य लोकात प्रचलित, ढोबळ मानाची, वरवरची, तत्त्वदृष्ट्या खरी नव्हे अशी; इतक्या छटा अभिव्यंजित करण्यास हा शब्द समर्थ आहे. परिभाषा म्हणजे व्याख्या, स्पष्टीकरणात्मक संज्ञा, संकेत. हे दोन्ही शब्द इथे पूर्ण उचित तर आहेतच; पण त्यांचा संयोग फार बहारीचा झाला आहे. देशमुख इत्यादिकांना वतनदार ही संज्ञा प्रचलित तर आहे, पण ती आता अगदी ढोबळ मानाची, त्यांचे स्वरूप नीटपणे व्यक्त न करू शकणारी, अशीच केवळ बनली आहे, असा अर्थ इथे फार सुंदर रीतीने व्यक्त केला आहे. पुढील वाक्यखंडातील 'देशनायक' हा शब्द असाच अत्यंत समर्पक व बहुलार्थव्यंजक आहे. पुढारी, मार्गदर्शक, सत्ता गाजविणारा, शासन करणारा, असा नाना अर्थांचा पुंज त्यातून निष्पन्न होतो. 'स्वल्पच' परंतु 'स्वतंत्र' ही दोन विशेषणेही महत्त्वाची आहेत. पण शब्दाशब्दावर भाष्य करायचे म्हटल्यास प्रचंड ग्रंथ निर्माण होईल, तेव्हा आवरते घ्यायला पाहिजे. या प्रकरणाच्या सुरवातीपासून 'दुःसाध्य होऊन जातात' इथपर्यंतचा मजकूर म्हणजे मराठी देशातील कारभारविषयक परिस्थितीचे संकलित रेखाचित्र आहे. मराठी इतिहासातील मुख्य समस्येचे ते अर्करूप निदर्शन आहे.

## आ

### अमोघ शब्दशक्ती

आज्ञापत्रकर्त्याची शब्दशक्ती अमोघ आहे. वाक्यात एकेक शब्द तो असे वापरतो की त्यांचा अर्थ मनात तात्काळ घुसून मन प्रकाशमान होते. शब्दांच्या सामर्थ्याने मन भारावून जाते. वर उल्लेखिलेल्या मजकुराचे केंद्रभूत वाक्य 'हे लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत' यातील 'दायाद' हा शब्द! या शब्दात अर्थ तर खूप भरलेला आहेच. पुढची सहासात वाक्ये दायाद याचेच स्पष्टीकरण आहे. या अर्थभाराबरोबरच त्या शब्दात एक प्रकारचे सामर्थ्य आहे. दुसरा कोणताही शब्द वापरला असता तर हे सामर्थ्य अनुभवास आले नसते. जिथे अर्थाची विशेष उत्कटता, ओजस्विता किंवा गंभीरता उद्दिष्ट असेल तिथे तशाच सामर्थ्यशाली शब्दांची योजना झालेली आपणास आढळेल.

'यवोदरप्रमाण भूमि तेहि इनाम देऊं नये', 'आचमनभर उदक तेंहि **लीला-प्रसंगेकडूनहि** अभिलाषूं नये' यातील जाड ठशातील शब्दांमुळे त्या त्या **ठिकाणी** अर्थाची शक्ती आणि उत्कटता कशी भासमान होते याचा वाचकांनी आपापल्या ठिकाणी मननपूर्वक प्रत्यय घ्यावा.

### शब्दांचे अंतरंग ओळखले

वर वर्णिलेले हे वाङ्मयीन प्रतिभेचे विशिष्ट सामर्थ्य होय. शब्दांच्या अंतरंगात प्रवेश करण्याची जी मूलभूत शक्ती तिच्याच पायावर या सामर्थ्यांची उभारणी असते. ही मूलभूत शक्ती आज्ञापत्रकर्त्यांच्या अंगी फार मोठ्या प्रमाणात होती हे सांगण्याची जरूर नाही. वर्ण्य अर्थ सुंदर व समर्पक रीतीने व्यक्त करणारे शब्द त्याने ठायी ठायी योजिले आहेत. वाक्यात चपखल बसविलेल्या अशा खुबीदार शब्दांच्या अर्थप्रभेने सबंध वाक्य शोभायमान होते. असे शब्द सगळीकडे आहेत; ते टिपून त्यांचे अर्थविवेचन करणे हे भाषेच्या व शैलीच्या अभ्यासाचे मनोरंजक अंग ठरेल. तिसऱ्या राजधर्म प्रकरणातले सहज नजरेस आलेले असे काही शब्द इथे देतो. त्यांच्यामुळे प्राप्त झालेल्या अर्थसौन्दर्याचे निरीक्षण करावे आणि इतरत्र आलेले असे शब्द निवडून काढण्याचा प्रयत्न करावा.

**राज्यमदारूढ** न होतां (१४.८).

(देवतायतने, धर्मक्षेत्रे, मठ इ. चा) **तेजोविशेष** (१५.१०).

**अलालुची** (१६.५) हा शब्द अनेकदा येतो.

**परिच्छिन्न** (१६.१४), अजीबात, पूर्णपणे, एकदम, निग्रहाने इ. अनेक अर्थ च्छटांचा द्योतक असा हा त्या काळी प्रचलित असलेला सुंदर शब्द अनेकदा येतो. यावरूनच **परिच्छिन्नवादें** (१९.४).

**इंगितसंज्ञा** जाणते (१६.१७).

**धण्याचे संनिध ऊर्मीने** (१६.२३), फार सुंदर व्यंजक शब्द.

**अंगेजणी** (२०.१०), **अंगेज** (२०.१८) हे सुंदर अर्थघन शब्द त्या काळच्या गद्यात प्रचलित होते.

सत्तापराधीन (२०.१७), पंचरूढ जमाव (२१.१), लक्षणीक मनुष्य (२१.१५), रसिकतेने (२२.६); नुसते प्रेमळपणाने न म्हणता रसिकतेने असे म्हटले, यातील इंगित लक्षात घेतले पाहिजे.

निखालसपणा (२३.५), अवाच्यवाद कार्ये (२६.३), इ०.

## शब्दांच्या मालिका

शब्दांच्या मालिका हे आज्ञापत्राच्या गद्याचे आणखी एक वैशिष्टय होय. त्या काळातल्या एकंदर गद्यरचनेचे, किंबहुना सर्व गद्यपद्यरचनेचे हे वैशिष्टय होते. मराठी राष्ट्राच्या जागृतीचा तो काळ होता. मराठ्यांची अस्मिता वृद्धिंगत होत होती. राज्यकारभार, देशकारभार, सांग्रामिक कारभार, नाना हुन्नर आणि विद्या यांच्यामध्ये लोक 'ऊर्मी'ने वावरू लागले होते. लोकांचा व्यवहार वाढत होता तशी वर्णनशक्ती स्फुरण पावून शब्दसृष्टीला जन्म देत होती. नवनवीन शब्दांचा सरासर प्रसव होत होता; तेव्हा किती शब्द वापरू किती न वापरू, असे कवींना, गद्यकारांना होत होते. कविवर मुक्तेश्वराचे उदाहरण आपल्यापुढे आहे. समानाधिकरण शब्दांचे घोसच्या घोस त्याच्या काव्यवितानात लटकत असलेले आपणास दिसतील. आज्ञापत्रकर्त्यांचीदेखील पद्धत अशीच आहे. साधारणतः कोणताही विषय वर्णावयाचा असता वाक्यात एकाच नात्याने गोवलेल्या शब्दांची माळकाची माळका तो हजर करतो. सरकारकून कसा असावा हे सांगताना विशेषणांची केवढी लांब माळा त्याने गुंफली आहे ! "कुलीन कृतकर्मे कार्याकार्यविचक्षण शास्त्रज्ञ राजधर्मविशारद......" (३०.३-९) अशी ही वर्णनात्मक विशेषणे एकंदर २३ आहेत ! इतका विशेषणांचा वर्षाव केला आहे, म्हणून त्यात सारख्याच अर्थाची पुनरुक्ती आढळेल असेही नाही ! काही थोडे जवळ जवळ येणाऱ्या अर्थांचे शब्द आढळतील; ते नसते तरी चालले असते असे वाटेल. पण अशी उदाहरणे अगदी थोडी.

अशा शब्दांच्या माळिका प्रस्तुत प्रबंधात पुष्कळ ठिकाणी आढळतील. राजांनी जवळचे सेवक ठेवावे, ते कसे असावे व कसे नसावे (१६.१६-१८), हुजरातीत माणूस ठेवावे ते कसे असावे व कसे नसावे (२१.१-५), हुजरातीत सज्ज ठेवायचे सामान (२२.११-१३), टोपीकर (३४.८-९), किल्ल्यावर अधिकारी ठेवायचे ते कसे असावेत व नसावेत (४६.२२-४७.२) (४९.१-२)-अशी

अनेक स्थळे उल्लेखिता येतील. या व इतर ठिकाणच्या शब्दमालिका निरीक्षणाकरिता घेऊन त्यातील शब्दांचे औचित्य व सौंदर्य पारखावे.

## ३

## शैलीचा विशेष : तत्त्वार्थबोधक लघुवाक्ये

अत्यंत महत्त्वाचे सिद्धान्त किंवा तत्त्वार्थ छोट्या वाक्यांमध्ये परिणामकारक रीतीने व्यक्त करणे हा आज्ञापत्रकर्त्याच्या शैलीचा विशेष आहे. 'सकल कार्यामध्ये अपकीर्तीचे भय बहुत वागवावें' (१५.२), 'राजे लोकांस विनोदाचे व्यसन येकंदर नसावें' (१८.१८), 'संपादिलें पाठीसी घालोन नित्य नूतन संपादावें' (१९.९), 'संपूर्ण राज्याचें सार ते दुर्गें' (४५.१), 'मर्यादाभंग तेंच राज्यनाशाचें कारण' (५१.९), 'ज्यास अश्वबल त्याची पृथ्वी प्रजा आहे. तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र' (५८.१–३)-अशी तत्त्वबोधक लघुवाक्ये ठिकठिकाणी विखुरलेली आपणास आढळतील. या बाबतीत आज्ञापत्रकर्त्याची तुकोबारायांशी तुलना होऊ शकेल. तुकोबांच्या अभंगातील अशा कितः तरी सूक्ती लोकांच्या तोंडी खेळत आहेत. 'सत्य संकल्पाचा दाता भगवान', 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति', 'सुख पाहतां जवापाडें, दुःख पर्वताएवढें', असली वचने म्हणताना अगदी साधी वाटतात. पण जीवनसत्याचे अचूक भान होणे आणि वेचक शब्दात वेधक रीतीने ते प्रकट करता येणे हे सामान्याचे काम नाही; साक्षात्कारी प्रतिभावंतालाच ते साधते. आज्ञापत्रकार आणि तुकोबा या दोघात फरक एवढाच की तुकोबांची दृष्टी जीवनाच्या मूलभूत सत्त्वांशावर खिळलेली असल्यामुळे त्यांची वचने त्रिकालाबाधित वाटतात, तर आज्ञापत्रकर्ता विशिष्ट देशकालातील राजकीय व्यवहारांचा विचार करीत असल्यामुळे त्याची वचने त्या देशकालात पूर्ण समर्पक असूनही आज त्यापैकी कित्येक बाधित झाली आहेत. रॉकेट आणि अण्वस्त्रे यांच्या आजच्या काळात 'संपूर्ण राज्याचे सार ते दुर्गें' किंवा 'ज्यास अश्वबल त्याची पृथ्वी प्रजा' इत्यादि वचने गैरलागू झाली आहेत हे उघड आहे. प्रतिभा तीच असूनही ज्या विषयात ती वावरते त्याला अनुसरून तिच्या आविर्भावाच्या चिरंतनत्वाला मर्यादा पडते.

### मिश्र वाक्य रचण्याचे कौशल्यही आहे

आज्ञापत्रकर्त्याची सर्वसाधारण प्रवृत्ती छोटी छोटी ठाशीव वाक्ये लिहिण्याकडे आहे. आणि त्यामुळेच त्याच्या शैलीला तेज व सौंदर्य प्राप्त झाले आहे. पण अनेक परस्परावलंबी विचार एकत्र गुंफून अनेकविधानात्मक संयुक्त वाक्य रचण्याचे कौशल्यही त्याच्या अंगी आहे. "तैसेच आपले लाभालाभ...वर्तावें" (१४.९-१४), "गडकोटचे मामलेदाराने...आपणाजवळ आणावें"(४९.५-१०) ही अनेकविधानात्मक मिश्रवाक्यांची उदाहरणे पाहिल्यास गुंतागुंतीचा विचारही विशद रीतीने व्यक्त करण्याची हातोटी याला साधली आहे हे दिसून येईल. "ते (भीड) स्वल्प कार्यास्तव...चढतें यैसें नाही" (२९.१३-१५) हे वाक्य विशेष लांबलचक नाही; पण त्याच्यात इतका अर्थ ठासून भरला आहे की सुभाषितानुसार 'वाग्मी' ही पदवी या लेखकाला पूर्णपणे शोभेल.

### ई

### प्रायः अलंकाररहित शैली

आज्ञापत्रकर्त्याची शैली प्रायः अलंकाररहित आहे. त्याचा अधिकार इतका मोठा आहे आणि त्याला जे सांगायचे आहे ते इतके भरीव आहे की साजसजावटीच्या खटाटोपात पडण्यात त्याला मतलब वाटत नाही. अलंकारांचे साज आणि कल्पनांची आभरणे फक्त काव्यातच आढळतात असे नाही; गद्यग्रंथही वक्रोक्तीने आणि कल्पनावैभवाने नटलेले आढळतात, याला उदाहरण 'भाऊसाहेबांच्या बखरी'चे आहे. पण असले नटण्याचे प्रकार या पुरुषाच्या खिजगणतीतही नाहीत, इतकी त्याची प्रकृती धीरोदात्त दिसते. अनुभवाने आणि चिंतनाने भरीव बनलेले आपले विचार तितक्याच ठाशीव भाषेत सांगताना मध्येच एखादी कल्पना चमकून गेली तर गेली. "पुन्हा तें पाणी चढतें यैसें नाही" (२९.१५) इथे 'भीड' म्हणजे वचक, धाक, यावर पाण्याचे रूपक केले आहे. "जैसे कंटकपुष्पवृक्षाचीं पुष्पें मात्र घेऊन... परित्याग करावा" (३०.१७) इथे कंटकपुष्पवृक्षाची उपमा सहजगत्या येऊन गेली आहे. "गडकोटाविरहित जें राज्य त्या राज्याची स्थिती म्हणजे अभ्रपटलन्याय

आहे" (४६.२), येथील विधान किती सुंदर कल्पनेने अलंकृत झाले आहे![1]

उ

## अनुपम भावसौंदर्य : गाढ धर्मश्रद्धा

अलंकरण क्वचितच असले, तरी भावसौंदर्य या प्रबंधात सर्वत्र आहे. रूक्ष-विषयपरामर्शी जी शेवटची दोन प्रकरणे त्यात हे कमी प्रमाणात आहे; तरी अगदीच नाही असे नाही. ह्या भावसौंदर्यातील स्थायीभाव गांभीर्याचा आहे. हे गांभीर्य गाढ ईश्वरनिष्ठेमुळे उदात्त बनले आहे आणि निग्रही वीरश्रीने तेजस्वी बनले आहे. या भावांचा संमिश्र विलास ३, ४, ६, ७ या प्रकरणांमध्ये दिसून येतो आणि त्यात काही स्थले भावांच्या उत्कटतेमुळे विशेषच बहारीची वाटतात. प्र. ३ 'राजधर्म' याची सुरवातच अतिशय उदात्त रीतीने झाली आहे. केवळ राजकीय निरूपणात इतक्या गाढ धर्मश्रद्धेचा, ईश्वरनिष्ठेचा आणि अनासक्ततेचा आविष्कार जगाच्या वाङ्मयात इतरत्र क्वचितच आढळेल. या संपूर्ण प्रबंधाचा पायाच ईश्वरनिष्ठा आणि धर्मश्रद्धा हा आहे. त्याची स्फुट चिन्हे सर्वत्र दिसतात.[2] त्यामुळे या प्रबंधावर सगळीकडे आध्यात्मिकतेची उदात्त आणि हृदयंगम छाया पडली आहे. फितुरी मामलेदारास प्रयत्नेकरून मारवावा (४९.११; ५०.१९), हे कठोर शासन ऐकतानाही आपल्याला सांगणाऱ्याचे सदयपूर अनासक्त मन मागे उभे असल्याचे दिसते.

'धर्माची सूक्ष्मता बरी शास्त्रतः विचारून, देशकालपात्र पाहून पर्वादि पुण्यकाळी सदक्षणिक धारादत्त भूमि अथवा ग्राम देणें ते द्यावी.' (४२.१–११) असे सांगितल्यावर हा म्हणतो—

"आणि दिधलियावरी कैसाहि आपत्काल पडो, प्राणपर्यंत संकटें घडोत, परंतु यहलोकीं सुख क्षणैक हें जाणून, परलोकभय संपूर्ण चित्तांत आणून,

---

१ अशीच आणखीही काही अलंकरणस्थले आढळतील (२५.६; २५.२० इ. इ.), ती शोधावी.

२ उदाहरणार्थ, १५ (संपूर्ण पृष्ठ); २५.५; २५.१०; २८.१० २८.२१-२४; ३०.४, ५, ७; ३१.१८-२० इत्यादि पहा. प्रकरण ७ हे सर्वच गाढ आणि निग्रही धर्मश्रद्धेचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

दिधलियामध्ये आचमनभर उदक तेंहि लीलाप्रसंगेंकडूनहि अभिलाषूं नये. ऐसे जे धैर्ये पापभीरु राजे आहेत, त्यांचें संकट तो ईश्वरच परिहार करितो." (४२.१४–१८).

केवढी ही उत्तुंग ऊर्जस्वल वाणी ! श्रद्धा, वीरता आणि अनासक्तता यांनी इथे शीग गाठली आहे.

### अनुपम भावसौंदर्य : गौरवयुक्त वीरश्री

आज्ञापत्राचा सगळाच विषय ते सांगणाऱ्याला परम प्रिय होता; जणू जन्मोजन्मी त्याचे मन त्यात मुरलेले होते. लेखकाची तन्मयता यात सर्वत्र दिसते. त्यातूनही जिथे जिथे विशेषच त्याची भावना उल्लसित झाली तिथे तिथे त्याच्या वाणीचा अतिशय हृदयंगम आविष्कार झालेला दृष्टीस पडतो. धर्मश्रद्धेचे उत्तुंग विलसित आपण आता पाहिलेच. वीरश्रीची विलसितेही काही दृष्टीस पडतात. शिवाजी महाराजांनी तानाजी, मोरोपंत, नेताजी, बाजी, कडतोजी, रघुनाथपंत अशी अनेक नररत्ने पैलू पाडून तयार केली, त्यांच्यावर महत्कार्यें सोपवून त्यांच्याकरवी राज्यविस्तार केला; तेव्हा या 'प्रधान' मंडळीसंबंधाने त्यांना अतोनात धन्यता, गौरव आणि प्रेम वाटणे साहजिक होते. हे गौरव त्यांनी भावनापूर्ण वीरश्रीयुक्त वाणीने व्यक्त करावे हे तितकेच साहजिक होते. "प्रधान म्हणजे नृपसत्ताप्रसारक; प्रधान म्हणजे धर्मसंरक्षणाचे अध्यक्ष; प्रधान म्हणजे राजमदजनित अन्यायसागराची मर्यादा...परलोकपंथीची दीपिका" (२८.२०–२४), अशा तऱ्हेचें जे कल्पनाशाली गौरवपूर्ण वर्णन आहे ते याच भावनेचे द्योतक होय. अशीच जिव्हाळ्याची व गौरवाची भावना त्यांची गडकोटांविषयी होती हे सुप्रसिद्ध आहे. तेव्हा गडकोटाविषयीही त्यांनी अशीच रूपकमालिका योजून वीरश्रीयुक्त वर्णन केले आहे. "...गडकोट हेंच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचे मूळ, गडकोट म्हणजे खजीना, गडकोट म्हणजे सैन्याचे बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपले प्राणसंरक्षक......" (४६.३९). या दोन्ही उताऱ्यातील वाक्यखंडांना एक प्रकारची लय आहे. त्यामुळे त्यांच्या ओजस्वितेत भर पडली आहे.

अत्यंत तर्कशुद्ध असूनही उदात्तभावपूर्ण, सूक्ष्म तपशिलाने युक्त असूनही अत्यंत व्यापक तत्त्वांचा प्रतिपादक, कठोर राजनीतीलाही गाढ धर्मश्रद्धेने

शोभविणारा, प्रायशः अनलंकृत असूनही अत्यंत हृदयंगम, असा हा प्रबंध आहे. मराठीचा हा अमूल्य ठेवा आहे.



ॐ

## चिरंतन वाङ्मय

राजकीय आणि सांग्रामिक स्थितीत झालेल्या अफाट बदलामुळे यातील काही भाग जरी गैरलागू झाला असला, तरी त्यामुळे या प्रबंधाचे महत्त्व आजघटकेला केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे राहिले आहे असे समजणे बरोबर होणार नाही. कोणत्याही चिरंतन वाङ्मयात परिस्थितिसापेक्ष असा भाग असतोच. पण त्यात जे भाव व्यक्त झालेले असतात ते मूलभूत असतात आणि त्या भावांशी शैलीचे जे सुसंवादित्व साधलेले असते ते हृदयंगम असते. त्यामुळे आपल्या मनावर उदात्त संस्कार करण्याचे अशा वाङ्मयाचे सामर्थ्य क्षीण होत नाही. आजच्या लोकशाहीच्या काळात राजे नाहीत. पण निराळ्या प्रकारचे झाले तरी सत्ताधीश आहेतच. या राजनीतीच्या राजधर्मप्रकरणातला सगळा तपशील आज लागू पडणारा नाही. पण त्यातील ईश्वरशरणता, धर्मश्रद्धा, 'यथान्यायें यथाधिकारें यथोचित' सेवक लोकांचे मनोधारण, सेवकनियुक्तीविषयी दक्षता, राष्ट्रसंरक्षणविषयक कर्तव्य इत्यादि जे भाव आहेत ते तीनशे वर्षांपूर्वी होते तितकेच आजही ग्राह्य आहेत आणि हे भाव सूक्ष्म, गंभीर आणि अर्थभारवती शैलीने व्यक्त करून अर्थ व शैली यांचा जो सुसंवाद साधला आहे तो तितकाच मनोरम आहे. हे विधान कमजास्त प्रमाणात सर्व प्रकरणांसंबंधाने सार्थ ठरेल. तेव्हा या ग्रंथाचे महत्त्व आता केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे आहे अशी समजूत करून घेणे आपल्या हिताचे होणार नाही. वाङ्मयमूल्ये जीवनसत्यांना जाब देणारी अशीच असली पाहिजेत.

'शिवरायाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं'

या वचनाला आजघटकेला जर भरीव अर्थ असेल तर तुकाराम रामदास यांच्या वाणीच्या तोलात बसणारा हा छोटा प्रबंध आजच्या मराठ्याने आदराने हृदयात धारण केला पाहिजे.

●●●

## आज्ञापत्राच्या सर्वांत अधिक मूल्यवान हस्तलिखितातील काही ओळींचे ठसे

मुळाशी ठशाचे संकोचाचे प्रमाण २ : १

पत्र ३ ओळी २१–२५
मुद्रित संहिता ३.१२ ते ३.१७

[illegible]
[illegible]
१ [illegible]
[illegible]
[illegible]

पत्र ४, ओळी १–७
मुद्रित संहिता ३.१८ ते ४.६

[illegible]
[illegible]
२ [illegible]
अर्जुनस्यप्रतिज्ञाद्वे नदैन्यं नपलायनं
[illegible] श्लोकः आयुरक्षांतिमर्माणि [illegible]
[illegible] इतिगांडीविनोबुध्धिर्नदैन्यंनपलायनं १ उद्योगिनंपुरुषसिंह
मुपैतिलक्ष्मी [illegible]
[illegible]

पत्र ५, ओळी १२–१३
मुद्रित संहिता ५.१६ ते ६.३

[illegible]
३ [illegible]

## प्रकरण १

श्री

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ४२ मन्मथनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध चतुर्थी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी यांणी समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली यैशी जे : स्वामी राज्यासनारूढ जाहले असतां सर्वांचीं समाधानें केलीं. राज्याचा सर्वहि अर्थ मनास आणिला. त्यास सकलहि लहानथोर सेवक राज्याचे विज्वर प्रसंगामुळें कितेक आपलाले योगक्षेमविषयीं कुंठितबुद्धि व हतधैर्य जाले. ज्यांणी परंपरेने येकनिष्ठपणें सेवा करून या राज्यांत आपल्या नाम्ना संपादिल्या यैसेहि कितेक सेवक होते त्यांणी अवसानें सोडोन परंपरागत मेळविले अधिकाराचा परिच्छिन्न परित्याग करून इतरावलंबी जाहले. कितेक केवळ जो अन्यायमार्ग होता तोच आपला जीवनोपाय कल्पून त्याच प्रवाहीं पडिले. हें येक राज्य, या राज्याची येक मर्यादा, हा भाव अगदी उडोन गेला. यैसें जाहलें असतां, स्वामींनी तितकाहि विचार बरा चित्तांत आणून, हें राज्य म्हणजे केवळ ईश्वरदत्त, या राज्याची अभिवृद्धि व्हावी हें ईश्वरास परम अवश्यक, तदनुरूप श्रीने या राज्याचे

अभिवृद्धीचा कीर्तिलाभ स्वामीचेच विभागास आणिला यैसें समजोन, यथास्थित निश्चयें ईश्वरस्मरण करून तत्प्रसादसामर्थ्यें या सकल विस्खलित प्रसंगांत बरी सूक्ष्मबुद्धि चालऊन जे ईश्वरनिष्ठ परंपरागत सेवक बुद्धिमत कृतकर्मे होते, ज्या उपायें त्यांचें मनोधारण करावें त्या उपायें त्यांचीं समाधानें करून त्यांचे विचारें बुद्धीने बुद्धि वाढऊन सर्वहि आपलाले अधिकारानुरूप राजकार्यविषयीं सानुरक्त व उद्योगतत्पर केले. स्वामीचे विहित शासनें प्रजा संरक्षण पाऊन सकल क्षुद्रोपद्रवविषयीं निश्चिती मानोन वंशपरंपरेने संपादिले अर्थकीर्तीविषयीं स्वस्थचित्त होऊन दुसरा अर्थ कांही चित्तांत न आणितां निःसंशयपणें स्वामिकार्यास सादर जाले.

ज्या राज्यावर अवरंगजबासारिखा सबळ शत्रु चालोन आला असतां हतप्रभ होऊन गेला, तें हें राज्य. औरंगजेब याणे या राज्यानिमित्त आपला संपूर्ण पराक्रम व अर्थवैभवादि सर्व शक्ति वेचली; तथापि श्रीकृपाकटाक्षवीक्षणें सकलहि निर्फळ होऊन परिणामीं हतोद्यम हतोत्साह होत्साता पराङ्मुख होऊन यमालयाश्रयास गेला. परंतु औरंगजेब म्हणजे चौपन्न पादशाहीचा धणी; सैन्यादि देशकोशविषयीं अद्वितीय समृद्धिमान; किंबहुना या पृथ्वीतलाचे ठायीं 'दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा' यैसी ज्याची प्रख्यात आख्या, यैसे महाशत्रूसी संग्रामप्रसक्त जाहलियावर त्याचा पराजय विनाश्रम स्वल्पायसें होणें परम कठीण! तदनुरूपच परस्परें समरप्रसंगातिशयामुळें संपूर्ण राज्यांतील प्रजा पीडा पावली. कितेक देश निराश्रयित जाहले. संपूर्ण मार्गावरोध होऊन इतर देशद्वीपांतरीहून वस्तुजात येणें राहिली. तैसेच सैनिक कितेक

(श्लोक) मुनयोऽपि न गच्छन्ति या गतीर्योगिनोऽपि च ।
स्वामिकार्यगतप्राणास्तां गतिं यांति सेवकाः ।। १

या दृढ बुद्धीने शरीरास्था न पाहतां स्वामिकार्यावरी क्षात्रधर्में शाश्वतलोकाश्रयित जाहले. कितेक हतसैन्य होत्साते कुंठितपराक्रम होऊन शत्रूस मिळोन गेले. कितेक स्वामी शत्रुसमरव्यसनासक्त पाहून दुर्बुद्धितिमिरांधतेने स्वाधीन केलीं देशदुर्गें स्वतंत्रवादें आक्रमून बैसले. राजशासनस्वल्पतेमुळें स्थळोस्थळीं प्रत्यक प्रत्यक स्तोमें होऊन परस्परें कलहास प्रवर्तले. या विषमसंधीमध्यें शामलादि क्षुद्रांस अवकाश पडून बद्धमूल जाहले. अवशिष्ट देश उद्वस व दुर्गें सांग्रामिक सामग्रीरहित जाहलीं. राजमर्यादा राहून गेली.

पाहतां येकेक प्रसंग अनर्थाचेंच कारण. तथापि श्रीस या राज्याचा व स्वामीचा पूर्ण अभिमान. पुढें प्रतिपच्चंद्रन्यायें दिनप्रतिदिनीं या राज्याची अभिवृद्धि व्हावी हे श्रीइच्छा बलवत्तर. तदनुरूप या संभावित वंशीं स्वामीचा जन्म जाहला आहे. तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामी यांणी हें राज्य कोणे साहसें व कोणे प्रतापें निर्माण केलें ! त्याच वंशीं आपण निर्माण जालों असतां या राज्याचा यैसा विस्खलित प्रसंग हे तो गोष्ट परम अनुचित.

या अर्थें तीर्थरूप कैलासवासी महाराज साहेब यवनाश्रयें असतां त्यापासोन पुणें आदिकरून स्वल्प स्वास्ता स्वतंत्र मागोन घेऊन पंधरा वर्षांचें वय असतां त्या दिवसापासून तितकेच स्वल्पमात्र स्वास्तेवर उद्योग केला.

(श्लोक) आयू रक्षति मर्माणि आयुरन्नं प्रयच्छति ।
इति गांडीविनो बुद्धिर्न दैन्यं न पलायनम् ॥ १
[अर्जुनस्य प्रतिज्ञे द्वे न दैन्यं न पलायनम् ॥]

तैसेंच 'उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीः' या दृढ बुद्धीने शरीरास्था न पाहतां केवळ अमानुष्य पराक्रम, जे आजपर्यंत कोण्हें केले नाहींत व पुढें कोण्हाच्याने कल्पवेना यैसे स्वांगें केले. मनुष्यपरीक्षेने नूतनच सेवक नवाजून योग्यतेनुसार भार वाढऊन महत्कार्योपयोगी करून दाखविले. येकास येक असाध्य असतां स्वसामर्थ्यें सकलांवरी दया करून येकाचा येकापासोन उपमर्द होऊं न देतां येकरूपतेने वर्तऊन त्याहातून स्वामिकार्यें घेतलीं. दक्षिण प्रांतें इदलशाही, कुतुबशाही, निजामशाही हीं महापराक्रमी सकलार्थें समृद्धिमंत संस्थानें, तैसेंच मोगल येकेक सुभा लक्ष लक्ष स्वारांचा, याविरहित शामल फिरंगी इंगरेज जवार रामनगरकर पाळेगार सोंधे बिदनूर म्हैसूरवाले त्रिचंनापल्ली आदिकरून संस्थानिक, तैसेच जागजागां पुंड पाळेगार व चंदरराव सुरवे सिर्के सावंत भालेराव दळवी, वरघाटे निंबाळकर घाटगे माने आदिकरून देशमुख कांटक सकळहि पराक्रमी सजुते सामानपूर असतां बुद्धिवैभवें व पराक्रमें कोण्हाची गणना न धरितां कोण्हावरी चालोन जाऊन तुंबळ युद्ध करून रणास आणिले, कोण्हावरी छापे घातले, कोण्हास परस्परें कलह लाऊन दिल्हे, कोण्हाचे मित्रभेद केले, कोण्हाचे डेरियांत सिरोन मारामारी केली, कोण्हासी येकांगी करून पराभविले, कोण्हासी स्नेह केले, कोण्हाचे दर्शनास आपण होऊन गेले, कोण्हास आपले दर्शनास आणिले, कोण्हास परस्परें दगे करविले, जे कोण्ही इतर प्रयत्नें नाकळेत त्यांचे देशांत जबरदस्तीने स्थळें

बांधून पराक्रमें करून आकळिले, जलदुर्गाश्रयित होते त्यांस नूतन जलदुर्गेंच निर्माण करून पराभविले, दुर्घट स्थळीं नौकामार्गें प्रवेशले. यैसें ज्या ज्या उपायें जो जो शत्रु आकळावा तो तो शत्रु त्या त्या उपायें पादाक्रांत करून साल्हेरी अहिवंतापासून चंदी कावेरी तीरपर्यंत निष्कंटक राज्य, शतावधि कोटकिल्ले, तैसींच जलदुर्गें व कित्येक विषम स्थळें हस्तगत केलीं. चाळीस हजार पागा व साठसत्तर हजार सिलेदार व दोन लक्ष पदाति, कोट्यावधि खजाना, तैसेंच उत्तम जवाहिर, सकल वस्तुजात संपादिलें. शहाण्णव कुळीचे मराठियांचा उद्धार केला. सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति म्हणविलें. धर्मोद्धार करून देवब्राह्मण संस्थानीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्मे वर्णविभागें चालविलीं. तस्करादि अन्यायी यांचें नांव राज्यांत नाहींसें केलें. देशदुर्गादि सैन्याचे बंद नवेच निर्माण करून येकरूप अव्याहत शासन चालविलें. केवळ नूतन सृष्टिच निर्माण केली. औरंगजबासारिखा महाशत्रु स्वप्रतापसागरीं निमग्न केला. दिगंतविख्यात कीर्ति संपादिली ! तें हें राज्य !

● ●

## प्रकरण २

राजश्री थोरले कैलासवासी साहेबांमागें स्वामी यांणी असाधारण श्रमसाहस करून औरंगजेब चालोन आला असतां युद्धप्रसंगीं त्याचे कितेक प्रमुख सैनिक रणासी आणिले, कितेक हतदर्प करून पराङ्मुख केले, कितेक शरणागत करून शाहजादे आदिकरून मुक्त केले. तदुत्तर त्यांचेच पुण्यप्रभावेंकडून मुख्य शत्रु अतिशयित दुराग्रहीं प्रवर्तोन योग्यायोग्य कार्यें न विचारित स्वांगें संपादित होत्साता स्थळोस्थळीं अपमान पावोन कथाशेष जाला. परंतु त्या युद्धप्रसंगामुळें राज्याचा यैसा विज्वर प्रसंग होऊन गेला संपूर्ण देशदुर्गें पादाक्रांत जाहलीं. राज्य यैसें नांवां मात्र सावशेष उरलें; तें हे निर्मर्याद.

ज्या राज्याचा बंदोबस्त यैसा होता जे, इतर स्थलिकांस व सकल माडलिकांस व देशाधिकारी यांस आपले देशसंरक्षणविषयीं याच युक्तीचा आधार; या राज्यांतील नीति व मर्यादा सर्वांनी सिकोन जाव्या; त्या राज्याचा यैसा विस्खलित प्रसंग पाहून, राज्यांतील प्रजा म्हणजे तोच राज्याचा जीवनोपाय, ते प्रजा इतर अनेक क्षुद्रोपद्रवांमुळें बहुत पीडा पावली. राजसत्तेव्यतिरिक्त दुसऱ्याचें तिलांशहि स्वामित्व ज्यावरी नसावें त्यांस

राजशासनापेक्षा इतर शासनें अधिक प्राप्त जालीं. किंबहुना यामुळें त्यावरील राजसत्ताच आवघी उडोन गेली. केवळ अनाथ होऊन कितेक विदेशास गेले. कितेक वृत्तिलोभानिमित्त मात्र इतकेंहि संकट सोसून जीव धरून राहिले. स्वामीने त्या सकल प्रजेस अभय देऊन त्यांचे संपूर्ण उपद्रव दूर केले. ज्याचा जैसा श्रम, ज्याचा जैसा व्यवसाय आणि ज्या भूमीस जैसें पीक, ज्या ठाईं जैसा उपाय, तो सर्वहि मनास आणून तदनुरूप प्रतिवर्षीं प्रजेपासोन याप्रमाणें घ्यावें यैसा येक नियम केला. त्याप्रमाणें गडकिल्ले यांस त्यांचे संरक्षणाची आज्ञा केली. ज्या प्रजेस जिकडून जो उपद्रव होणार तो सर्वहि चुकविला. जो किल्लेकोटाव्यतिरिक्त मोकळा देश त्यास पुढें हुजरात व जागजागा हशम व स्वारांचा जमाव ठेऊन ठाईंठाईं बरी मजबुदी केली तो प्रांत अगदी पाठीशी घालोन बाहेरील अरिष्टें तिकडील तिकडे निवारण केलीं. संपूर्ण प्रजा आपलाल्या उद्योगास प्रवर्तविल्या. हुजरात गडकोट लस्कर आदिकरून याचा वेतनाचा पहिलेपासोन जो नियम होता, त्यास यथास्थित चालवावें यैसा निश्चय करून सकलांसहि ज्या गोष्टींत राज्याचें हित आणि स्वामीचें कल्याण त्या गोष्टीस परम साक्षेपी केलें. सर्वांसहि माया लाऊन त्यांपासोन सर्व विचार घेतला.

त्यास आधी राज्याचा बंदोबस्त केलिया अनायासें इतर प्रयोजनें सिद्धीस जातात या विचारें राज्यांतील सरकारकून व सरदार आदिकरून लहानथोर सेवक यांचे यथोचित बहुमान करून समाधानें केलीं कितेक नूतनच सेवक कार्यकर्ते नवाजिले. सकलांचीं चित्तें हातीं घेऊन येकाचा येकास द्वेष करूं न देतां

यथायोग्य यथानुक्रमें राजकार्यास प्रवर्तविले. जे अमर्याद प्रतिकूल होते त्यांस यथोचित शासनें अनुकूल करून मर्यादेने ठेविले. जे केवळ अनर्गल उत्पाती, उपेक्षा केलियाने अन्यायाची वृद्धि होणार, यैसे जे होते त्यांस मारून गर्देस मेळविले. संपूर्ण प्रजा अभय देऊन निरुपद्रव केली. देश स्वस्थ केला.

मुख्य हुजरात म्हणजे देशदुर्गादिसैन्यरक्षणाचें आदिकारण तें अगदी गळाटून हुजरात यैसें नांव मात्र अवशिष्ट राहिलें, ते हुजरात, लस्कर हशम बंदुखी तिरंदाज आदिकरून परम शूर विश्वासू हुकूमबारदार यैसे लोक ठेऊन देखीलसामान त्यांची उस्तवारी करून हुजरात बरी सजली. तमाम किल्लेकोटांची राहिली इमारत नवी चालीस लाऊन गल्ला दारूगोळे बाण होके भांडीं इत्यादि सामान चढवून संपूर्ण देशदुर्गें सामानपूर केलीं. राज्यांतील पागा व हशम यांचा अगदी बंद ढासळोन गेला होता तो पुन्हा नीट करून आरबी इराखी ताजी कच्छी धड घोडे, धड सामान व मारक आस्कारियाचें माणूस ठेऊन पागा केली. मावळे आडाव इटेकरी पटाईत बांकाईत, यावेगळे बंदुखी दुरुस्तंदाज कानडे तोरसाली व जांगडे बंदुखी व तिरंदाज यांची संचणी करून हशम मेळविले. रामचंग्या दुराब्या फिलनाळा व सुरतनाळा यांखेरीज थोर थोर गाड्यांवरील भांडीं व करोल, यैसा चालता तोफखाना सजला. राज्य अबादान केलें.

पुढे पराक्रांत राज्य हस्तवश्य करावें, त्यास संनिधवासी शत्रु म्हणजे केवळ उदरांतील व्याधि, त्याचा पराभव आधी करावा या विचारें शामल केवळ राज्याचे अपायाचेंच कारण, यवनेशाचे

मनोरथाचें साधन, त्या शामलाकरितां पहिले मुख्य शत्रूची कार्यसिद्धि विशेष जाली, किंबहुना या विषमसंधीमध्ये त्याणे कितेक देशदुर्गें आक्रमिलीं, मुख्य स्थळ रायगड म्हणजे तख्ताची जागा तो आक्रमिला, ब्राह्मणादि सकल प्रजेस पीडा पावऊन भ्रष्ट केली, यैसे शत्रूची उपेक्षा करणें, आजीचें उद्यावरी घालणें हें परम अनुचित आणि स्वामीसहि परम असाध्य होऊन त्याचा उपराळा ताम्राकडून होणार--पहिले तीर्थरूप कैलासवासी स्वामीने शामलावरी निग्रह केला, त्या प्रसंगीं शामलाचा उपराळा ताम्राकडून जाहला याकरितां शामल सावशेष उरला, अन्यथा त्यांचे यत्नापुढें शामलाने अवशिष्ट उरावें यैसें काये होतें--कोण्ही येक स्थळ अथवा देश परनिग्रह प्राप्त जाला असतां उपराळ्याचे बळें निर्वाह करितो, तो उपराळा आधी तोडावा, त्याउपरी त्याचा यत्न करावा, यैसी नीति आहे—याकरितां शामलाचे जाहगिरीचा देश नंदुरबार आदिकरून दळवटून फन्ना केला. ताम्राचा त्याचा विरोध घालोन तिकडून उपराळा होणार तो राहविला आणि त्यावरी चालोन घेतलें. दर्यांतून आरमार व खुष्कीने लस्कर घालोन चौतर्फा येलगार करून अवकाश घेऊं न देतां त्याणे आक्रमिलीं स्थळें व राजपुरी आदिकरून त्याचीं प्राचीन वसतिस्थानें निग्रह करून आक्रमून शामलाचें निर्नाम केलें. अनुपदें सावंतादि जे राज्यास कंटकभूत जाले होते त्यांचा निःपात केला. अवशिष्ट वतनदार वरकड स्वतंत्र स्थळें करून बद्धमूल जाले होते ते भयभीत होऊन स्थळें सोडून देऊन शरण आले; त्यांस पूर्ववत् स्वशासनवश्य केलें. म्हैसूरकरादि पाळेगारांसी यथोचित शिक्षा करून प्रतिवार्षिक करभाराचे नियमावर आणून ठेविलें. राज्य निःकंटक जालें. इतकाहि प्रसंग श्रीकृपेने सिद्ध जाला.

यावर यवनाक्रांत राज्य आक्रमावें, अवनीमंडल निर्यावनी करावें, हा निगूढ चित्ताभिप्राय प्रगट करून पूर्व पश्चिम दक्षिण या प्रांतीं जे जे यवनस्तोमें बद्धमूल जाहलीं होतीं त्यांवरी सेनासमुदाय प्रेरून मारून काढिले. सालेरी अहिवंतापासून चंजी कावेरीतीर-पर्यंत गतराज्य संपूर्ण आक्रमिलें. विज्यापूर–भागानगरादि प्राचीन महास्थलें यांजवरी खासा स्वारी चालोन जाऊन तेथील यवनसंबंधी सेनानायकास हतसैन्य करून मारून काढून तें स्थळ व तत्संबंधी देशदुर्गेंसहित स्वशासनवश्य केलीं.

अनुपदें औरंगाबाद बुऱ्हानपूर म्हणजे या दक्षिणप्रांतीं यवनेशाचें मुख्य गुलम, त्यावरी चालोन घेतलें असतां अपरिमित यावनी सेना समरोन्मुख जाहली. तुमुल युद्धप्रसंग प्राप्त जाला. यवनांनी जीविताशा सोडून अतिशयित पराक्रम दर्शविला. तथापि त्याचा नाश व स्वामीचा जयप्रभाव वर्धिष्णु व्हावा हें श्रीइच्छा बलिवंत, तदनुसार स्वामीच्या प्रतापानलें अशेष यावनी सेना शलभन्यायें विदग्ध होऊन पराजय पावली. कितेक सैनिक यमसदनास गेले. कितेक पराङ्मुख जाहले. कितेक हस्तवश्य केले. अश्वगजादि तत्संबंधी संपूर्ण संपदा हातास लागली. औरंगाबाद बुऱ्हानपूर आदिकरून संपूर्ण त्या प्रांतीचीं स्थळें हस्तगत होऊन स्वामीचे विजयध्वज सुशोभित जाहले. नर्मदेपासून श्रीरामेश्वर-पर्यंत स्वामीचें राज्य निःकंटक जाहलें. हा स्वामीचा मनोदय चित्तीं होता तैसा श्रीदयेने व–तुम्ही लोक स्वामीचे हिंदुराजकार्य-धुरंधर राज्याभिवृद्धिकर्ते–तुम्हा सेवक लोकांचे अंगेजणीने सिद्धीस पावला. तुम्हा सेवक लोकांचे सेवेचें सार्थक जालें.

याउपरी इतकियाचवरी कृतकार्यता व श्लाघ्यता मानून राहीन म्हणतां पुढील उद्योग राहून जातो. मुख्य शत्रु अवाई खावोन व्यग्र जाला आहे, तो सांवर धरितो. फौजांचा बंदेज करितो. देशदुर्गादि मजबुदी करून तत्प्रांतीचे संपूर्ण मांडलिक नयभयें हाताखाली घालोन तमाम देसींच्या फौजा यकत्र करून अगदी आपला देश पाठीसीं घालून पुढें नर्मदातीरास चालोन येतो. तेव्हा जुंझ या प्रांतींच पडतें. तमाम हिंदुस्थान निरुपद्रवच राहतें. स्वामीने हा नूतन संपादिला देश यावरीच कसाला पडतो. हे विचाराची वाट नव्हे. आपली सलाबत शत्रूवर पडोन शत्रूने अवाई खादली आहे. संपूर्ण मांडलिक द्विधाभाव पावले आहेत. याजमध्यें शत्रूस अवकाश घेऊं न देतां आपण सेनासमुदायानसीं चालोन जाऊन शत्रूचा पराभव करावा हाच स्वामींनी दृढ विचार करून तमाम त्या प्रांतीचे रजपूत येकत्र करविले. स्वामी सुमुहूर्तें नर्मदापार जाहले. श्रीकृपें अचिरकालेंच मुख्य शत्रूचा पराभव करून दिल्ली आगरें लाहोर ढाके बंगालें ढकांभकर आदिकरून संपूर्ण तत्संबंधी देशदुर्गें हस्तवश्य करून श्रीवाराणसीस जाऊन स्वामी श्रीविश्वेश्वरस्थापना करीत; तावत्कालपर्यंत दक्षिणप्रांतसंरक्षणार्थ श्रीमत्सकलतीर्थैकतीर्थ श्रीमन्मातुश्री राहिली आहेत. त्यांसन्निध श्रियासह चिरंजीव जीविताधिक प्रियतम राजश्री राजकुमार यांस ठेविले असेत. त्या उभयतांचे सेवेसी तुम्हास ठेविलें आहे. यैशियास स्वामी कायावाङ्मनसा मातुश्रीसाहेबांचे चरणाविरहित अन्य दैवत जाणत नाहीत. हें राज्य व हा कीर्तिलाभ व पुढे जें होणें यशप्राप्ति हा सकलहि त्यांचे चरणाचा प्रसाद. त्यांची आज्ञा परिपालन करून त्यांचें चित्त प्रसन्न करून द्यावें यापरतें स्वामीस इतर इष्ट साधन नाहीं. हे स्वामीची

अनुपम निष्ठा तुम्हास कळलीच आहे. तदनुरूप तुम्ही हा संपूर्ण अर्थ बरा चित्तांत आणून त्यांचे आज्ञेप्रमाणे वर्तोन श्रीमन्मातुश्रीसाहेब स्वामीवर व तुम्हावर दिनप्रतिदिनीं संतोष पावेत तें करणें.

तुम्ही कृतकर्में सेवक. तीर्थरूप कैलासवासी स्वामी कर्नाटक प्रांतीं गेले, तुम्हावरी हा राज्यभार दिधला असतां तुम्ही यथोचित राज्याभिवृद्धि केली. तुम्हास राजकार्यें नीतिमर्यादा अवगतच आहेत. तथापि चिरंजीव राजकुमार तदनुसार या राजकार्यीं सुशिक्षित व्हावेत, वरकड देशोदेशी ठेविले देशाधिकारी व पारपत्यगार यांणी नीतीने वर्तोन राज्य संरक्षण करावें, यास्तव स्वामींनी यथाशास्त्र राजनीति या आज्ञापत्रारूढ केली आहे. ती सकलहि चित्तांत आणून चिरंजीव राजश्री राजकुमार तदनुसार अधीत होत यैसें करावें व सकल सेवकलोकीं त्याप्रमाणें यथाधिकारें वर्तोन राज्य संरक्षण करावें.

● ●

## प्रकरण ३

राजे प्रजेचे करुणेस्तव ईश्वरें निर्माण केले. त्यांनी ईश्वरास शरण असून प्रजेच्या हितकार्यी सादर असावें.-स्वतः धर्माचरणीं दृढ राहून, राज्यांतील देवस्थानें मठादिकांना उत्पन्नें करून द्यावीं आणि वैदिक तपस्वी ब्राह्मण व सत्पुरुष यांचा योगक्षेम चालवून त्यांचा आशीर्वाद संपादीत जावा.--राजाने स्वशरीरसंरक्षणविषयीं अत्यंत सावध असावें. जवळील सेवक अत्यंत विश्वासू शूर सुलक्षणी असे ठेवावे.-मादक द्रव्य सर्वथैव भक्षू नये. हत्यारें आणि लष्करी सामग्री वापरण्याची विद्या संपूर्ण अवगत करून ठेवावी.—राज्यकारभार हें राजे लोकांचें मुख्य साध्य आहे. दरबारांत नृत्यगायनादि करूं नये; त्यांत चित्त आसक्त होऊं देऊं नये.—कवीश्वर, भाट यांना आश्रय द्यावा, परंतु यांचा किंवा इतर बाहेरच्या लोकांचा कारभारांत प्रवेश होऊं देऊं नये.-- राजे लोकांमध्ये विनोदप्रवृत्ति नसावी. आपल्याच शहाणपणावर न जातां कार्यभागीं बुद्धिमंत असतील त्यांचा सल्ला घ्यावा.-संपादिलें पाठीशीं घालून नित्य नूतन संपादावें. राज्याचा खजाना वाढवावा.- सेवक लोकांचीं वेतनें नेमस्त करून तीं बिनचूक पाववावीं. ठरीव नेमापेक्षा कोणाला भिडेने किंवा कार्यविशेष केलें म्हणून अधिक वेतन करू नये.-देशदुर्गसंरक्षणाचें आदिकारण हुजरात होय. निवडक, शूर आणि योग्यतेचीं माणसें ठेवून हुजरात उत्तम तयार करावी.-- हुजरातींत शिस्त कडक राखावी. त्यांतील सैनिकांवर लोभ करून ते निष्ठावंत राहतील असें करावें.-सर्व शस्त्रास्त्रें, हत्यारें व युद्धसामग्री

*सदोदित सज्ज ठेवावी. हुजरातींत शिलेदार बिलकुल ठेवूं नयेत.—आपल्या अवगुणांचा त्याग करून जेणेकरून निखालसपणें मनुष्यसंग्रह होईल तें करावें.—चाकर ठेवतांना नीटपणें पारखून त्याच्याबद्दल जामीन घेऊन मग ठेवावा.—राजे लोकीं परिमित बोलत जावें.—कोणाहि सेवकाचा दोष मुखें उच्चारीत जाऊं नये.—राजकुमाराच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था करावी. त्या त्या विद्येंत निपुण असे शिक्षक ठेवावे.—विचारवंत सूक्ष्मज्ञ अशीं एकदोन निःस्पृह माणसें आपल्या सहवासांत वागवावीं. आपल्या हातून कांही गैर घडल्यास कानउघाडणी करण्याचा त्यांना अधिकार द्यावा.—राजे लोकीं बहुत सोसक असावें. सेवक लोकांचे दोष सहिष्णुता धारण करून घालवावे.*

प्रथम राजे लोकीं, सकल सृष्टि ईश्वरनिर्मित, सकलांचा नियंता ईश्वर, त्याणे निर्माण केले. जनामध्ये आपण येक, परंतु सकलांच्या प्रकृति भिन्नभिन्न; त्यांस येक नियम करून संरक्षणकर्ता नसतां परस्परें विरोध पावोन नाशातें पावतील. यैसें न व्हावें, आपली सकळ प्रजा निरुपद्रव होत्साती धर्मप्रथप्रवर्तक असावी. या प्रजेचे करुणेस्तव ईश्वरें संपूर्ण कृपानुग्रहें आपणास राज्य दिधलें आहे. या ईश्वरआज्ञेस अन्यथा केलियाने ईश्वराचा क्षोभ होईल हें संपूर्ण भय चित्तांत आणून राज्यमदारूढ न होतां सार्वकाळ अप्रमत्त होऊन प्रजेचे हितकार्यीं सादर असावें. तैसेच आपले लाभालाभ ईश्वराधीन आहेत, ते कोणाच्याने अन्यथा करवत नाहींत, हा दृढ निश्चय चित्तांत आणून सार्वकाळ ईश्वरास शरण असोन, अंतरंगें पराधीन न होतां, सेवकलोकीं केले सेवेची अवगणना न करितां, यथान्यायें यथाधिकारें यथोचित सेवक लोकांचें मनोधारण करून वर्तावें.

परंपरागत जो उत्तम, वडील वडील आचरत आले असतील तोच धर्म आचरोन जेणेकडून कीर्तिलाभ होय तें करावें. सकल कार्यामध्ये अपकीर्तीचें भय बहुत वागवावें. पूर्वी जे राजे होऊन गेले त्यांणी धर्मेचकडून यहलोक परलोक साधला आहे. धर्माचरण-देवतापूजन-सत्पुरुषानुग्रह-साधनें सकल-कल्याण-प्राप्ति व राज्यादिवंशाभिवृद्धि अव्याहत नेमीत आहे, या दृढनिश्चयें राज्यामध्यें जे देवतायतनें व तीर्थें व क्षेत्रें व सत्पुरुषांचे मठ व समाधिस्थानें असतील, तेथील नित्याभिषेक व पूजा-नैवेद्य व प्रतिवार्षिक यात्रा-मोहोत्सवाचे अनुकूलतेची जेथील तेथे तेजोविशेषानुरूप मोईन करून देऊन स्वांगें परामर्ष करून हा प्रसंग अव्याहत चालवावा. ब्राह्मण—वैदिक शास्त्रज्ञ निःस्पृह—अयाचित वनवासी तपस्वी सत्पुरुष यांचे ठाईं परम निष्ठा धरून जेथे जेथे असतील तेथील तेथे त्यांचे योगक्षेमाचा निर्वाह करून देऊन सर्व प्रकारें त्यांस संतुष्ट करून आपल्या कल्याणाभिवृद्धीविषयीं आशीर्वाद संपादीत जावा. वेशधारी फकीर जोगी जंगमादि जे केवळ दांभिक, भुताटकी करून फिरणार, यांचा विश्वास न धरितां, मोह न पावतां, अल्पस्वल्प भिक्षा देऊन परभारें वाटेस लावावे. धर्मास विरुद्ध ऐसीं पाषांडी मतें राज्यांत सर्वथैव होऊं देऊं नये. कदाचित् कोठेहि उद्‌भव जाला तरी त्याचा स्वतां परामर्ष करून पुन्हा कोण्ही त्या दुष्ट मार्गीं न प्रवर्तेत यैसी यथोचित शिक्षा करून तो मार्ग मोडून टाकावा. तपस्वी शीघ्रकोपी यांचा सहवास न करितां दुरूनच त्यांचा परामर्ष करून संतोषरूप राहत, आशीर्वाद देत तें करावें. अंध पंगु आतुर अनाथ अनुत्पन्न जे असतील त्यांचे ठाईं भूतदया धरून ते निवांत असिजे तों त्यांचा जीवनोपाय करून देऊन चालवीत जावें.

राजेलोकीं निदान युद्धाव्यतिरिक्त स्वशरीरसंरक्षणविषयीं सार्वकाळ अत्यंत सावध असावें. पाकालय जलस्थान फलस्थान वसनागार आदिकरून हे नाजूक माहाल, यांविरहित आणखी कारखाने यामध्यें जे लोक ठेवणें ते परम विश्वासू पारंपर्यसेवक अलालुची प्रमाणिक जे असतील ते परीक्षा करून ठेवावे. ज्या कार्यास जो जेथे योग्य तो तेथेच ठेऊन त्याचा उपयोग घ्यावा. ज्यांचा अधिकार जो असेल तो त्यांचेच हातून घेऊन अधिकारपरत्वें सकलांवर सारखा लोभ करून त्यांस आपले योगक्षेमविषयीं अपेक्षा न पडे ऐसा स्वतां परामर्ष करून चालवावें. कोण्हेविसीं आपला संशय त्यास किंवा त्याचा संशय आपणास न पडतां आपलाले सेवेवरी राहात तें करावें. कदाचित् यकाचा संशय प्राप्त जाला तरी न्यायतः तेच समयीं शोध करून निःसंशय प्रशस्तचित्तें कार्यास प्रवर्तेत तें करावें. संशयनिवृत्ति नव्हेच तरी त्यास परिच्छिन्न दूर करून इतर सेवा सांगावी. शासनार्ह असलिया शासन करावें. ये गोष्टीची उपेक्षा न करावी. तैसेंच जवळील सेवक अत्यंत विश्वासू, सुज्ञ, आपला मनोदय जाणून वर्तते, इंगितसंज्ञा जाणते आणि शूर दर्शनी ऐसे लक्षणीं होत असतां निर्दय आणि दुराग्रही दुष्टचित्त नव्हेत यैसे परीक्षून ठेवावेत. त्यांचे ठाईं मनापासून लोभ करून ते आपणाविरहित इतर दैवत न जाणतां येकरूप निष्ठेने राहत तें करावें. त्यांस योगक्षेमविषयीं कोण्हाचें आर्जव न पडे तें करावें. स्वाभाविक ते कोण्हाचे घरीं धण्याचे आज्ञेवेगळे न जात आणि अंतःस्थ प्रकार बाहेर न बोलेत, तैसेंच धण्याचे संनिध ऊर्मीने कोण्हावरी अन्याय करूं न पावेत, थोर लोक कारभारी यांची अमर्यादा न करीत, कोण्हाची चाहाडी न बोलेत, या रीतीने

मर्यादेने ठेवावे. त्यांमध्यें जो जैसा भार धरील तैसी त्याची सर्फराजी करावी.

भोजन उदकपान यांचा समय नेमून त्यांस अन्यथा होऊं न द्यावें. उन्मत्त द्रव्य सर्वथैव भक्षूं नये. जवळील सेवकांस भक्षूं देऊं नये. सार्वकाळ हत्याराव्यतिरिक्त खालीहात राहूं नये. हत्यारमात्राची भेजणूक विद्या संपादून वरचेवरी वर्जीस करीत जावी. हत्ती घोडे फेरणें या श्रमास अंतर न करावें. तीर कमाना बंदुखादि हत्यारें नूतन करणें, बाण भरणें, भांडीं वोतवणें, सुरंग लाऊन मोर्चे चालवणें व जीन खोगीर बखतरादि मुस्तैद करावयाचें संपूर्ण हुनर अवगत करून ठेवावें. येणेंकडून ज्याणे जो श्रम केला त्याचा गुण कळोन तदनुरूप त्याचे श्रमाचें सार्थक करिजेतें. अन्यथा न्यून जालियाने कृतघ्नता येते, विशेष दिधलियाने गाफिली दिसते. याकरितां हें लिहिलें.

सकल शिल्पाचें हुंनर अवश्यमेव अवगत करून ठेवावें. परंतु हे श्रमावह धंदे स्वांगें करीत न जावे. काये म्हणोन कीं, या व्यसनीं गुंतलियाने, अथवा यामुळें यखादा शरीरोपद्रव जालियाने, राजकार्यास अंतर पडतें. राजे लोकांस मुख्य साधनीय तो कारभार आहे, त्यास विक्षेप पडों न द्यावा. कलावंत, धाडी, गुणिजन यांचें नृत्यगायन मोहोत्सवाविरहित दरबारीं करूं नये. त्यांतहि आपण बसते ठाईं न करावें. बाहेरील मजलसींत करवावें. स्वतां श्रवणावलोकन करूं नये. काये म्हणोन कीं, या प्रसंगीं चित्त आसक्त जालें नाही तोंच बरें. कांही येक आसक्ति जाहलियाने चित्त आवरीन म्हणतां आवरलें जात नाहीं. तेंव्हा

व्यसन प्राप्त होऊन राजकार्यें अंतरतात. किंबहुना आणखीहि यामुळें दोष घडतात. याकरितां कोण्ही येक यैसें दुर्व्यसन याची संभूति होऊं देऊं नये.

कवीश्वरामुळें कीर्ति प्रसरते. त्यांणी केले श्लोक सुभाषित कवित्वें यामुळें शांति राहते. याकरितां कवीश्वर गुणी शास्त्रज्ञ प्रमाणिक निर्व्यसनी यैसे पाहून त्यांचा आपल्या सामर्थ्यानुरूप संग्रह करून त्यांचें यथायोग्य बहुमानपुरःसर चालऊन ते संतोषरूप राहून स्वउद्योगीं तत्पर राहत तें करावें. परंतु केवळ स्वस्तुतिप्रिय होणें हाहि दोषच आहे. याकरितां कारभार अंतरून त्याच भरीं भरूं नये. तैसेच भाटहि मजलसींत स्वारीमध्यें पूर्वील जाले राजे यांणी संरक्षिले आहेत. याकरितां थोडे बहुत गुणी पाहून त्यांचाहि संग्रह करावा. परंतु हे लोक कारभाराचे समयीं आणूं नयेत. काये म्हणोन कीं, कारभारियाविरहित रिकामे लोक कारभारांत असलिया कितेक कार्यें प्रगट बोलावयाचीं, कितेक गौप्य करावयाचीं आहेत, त्यास कारभारी लोकांस इतर लोकांचा संकोच प्राप्त होऊन अंतर पडतें. याजकरितां कारभारांत इतर लोकांचा प्रवेश होऊं न द्यावा.

राजेलोकांस विनोदाचें व्यसन येकंदर नसावें. सुहृद जाले तरी सेवक लोक; मर्यादा राहत नाहीं. ते आपली अमर्यादा आपण करून घेतली यैसें होतें. यखादे समयीं क्रोध आलियाने त्यांचा घात होऊं शके. याकरितां विनोदप्रवृत्ति नसावी. आणि आपले शाहणपणाचीच रीझ चित्तांत आणूं नये. चित्तांत आले कार्यभागाचे गुणदोष स्वतां शोधून पाहावे. कार्यभागीं बुद्धिमंत

असतील त्यांस पुसावे. आणि ज्याची जे अधिक बुद्धि असेल ते घेऊन जेणेकडून योजिलें कार्य सिद्धीस जाय तें करावें. आपलेच युक्तीचा आग्रह करून असलिया सेवकांच्याने कार्याचे गुणदोष परिच्छिन्नवादें बोलवत नाहींत, त्यामुळें चाकर लोकांची बुद्धिविशेषता प्रत्ययास न येतां त्यांचा गुणलोप होतो; आणि कार्यहि नासतें.

तैसेंच संपादिले वैभवावरी कृतकार्यता मानलियाने पुढें उद्योग राहतो. समयीं शत्रु प्राप्त जालियाने आहे राष्ट्र यावरीच संकट पडतें, यैसें होऊं न द्यावें. संपादिलें पाठीसी घालोन नित्य नूतन संपादावें, हाच उद्योग करावा. आयव्यय विचार पाहून जेणेकडून दिवसेंदिवस राज्यांत खजाना होय तें करावें. खजाना म्हणजे राज्याचें जीवन. पडले प्रसंगीं खजाना असलियाने सर्व संकटांचा परिहार केला जातो. याकरितां हा अर्थ अगोधर चित्तांत आणून खजाना संग्रह करावयाची बरी नजर धरावी.

सेवक लोकांचीं वेतनें नेमस्त करून बिलाकुसूर पाववावीं. कार्यविशेष केलिया अथवा कुटुंबस्त असलिया कांही बक्षीस म्हणोन द्यावें. परंतु ज्या हुद्यावर जे वेतनाची मोईन असेल त्याच हुद्यावर कार्य विशेष केल्याने अधिक वेतन न करावें. काय म्हणोन कीं, येकाचें वेतन अधिक केलियाने त्या प्रतीचे वरकड सेवक आहेत ते आपले अधिक वेतनाचे मुद्दे घालितात; दिलगीर होतात. कदाचित् येकाचे भिडेने त्यास अधिक केलियाने, सारेच चाकर त्या प्रतीचे येकासारखे येक आहे , तेव्हा तितकियांसहि अधिक वेतन करावें लागेल. मग साराच बंद ढासळोन जातो.

हे गोष्टी बरी नव्हे. याकरितां कोण्ही येका कार्यास जो मोइनेचा बंद केला असेल त्यास न्यूनाधिक सर्वथैव करूं नये. कार्यकर्ते मनुष्य आणि कार्यविशेष केलें, यैसें जाहलियाने त्या थोर हुद्दा सांगोन त्याचें चालवावें. इतकियाने मनुष्य उमेदवार असतें. कार्यावर बक्षीस दिल्ह्याने दुसरियाच्याने आड घालवत नाहीं. दुसरी गोष्ट : बक्षीस न दिल्हे म्हणोन, जैसें वेतनाकरितां चाकर लोकांस रुसावयास जागा आहे, तैसें बक्षीस द्यावेंच म्हणून बोलावयास जागा नाहीं. आणि कार्यावर धणी बक्षीस देतो या उमेदीवर वरकड चाकर जिवाची तमा न पाहतां स्वामिकार्यावर अंगेजणी करितात. याकरितां सिरस्तेप्रमाणें वेतन करून कार्यावर बक्षीस द्यावें. परंतु जे मोईन असेल त्यास न्यूनाधिक्य सर्वथैव न करावें.

स्वशौर्यपराक्रम प्रगट करण्याचें साधन व सैन्यादिदेशदुर्गांचे संरक्षणाचें आदिकारण तें हुजरात आहे. जे जे राजे व सेनानायक मागें होऊन गेले व वर्तमान आहेत, त्यांणी आधी हुजरात सजोन त्या बळावर पुढे साधीत साधीत विशेष जमाव मेळविले; देशकोश संपादिले. ज्यांचे पदरीं हुजरात बळकट नाहीं ते सत्तापराधीन. त्यांच्याने कोण्हा येका कार्याचा स्वता अंगेज करवत नाहीं. त्यामुळें केवळ सेवकाधीन होऊन राहावें, म्हणतील तें उगेच यैकावें. कार्यभागी लोक व सरदार योजिले कार्यांत मनःपूर्वक प्रवर्तत नाहींत, तेणेंकडून कार्यनाश होतो. यैसें जालियाने राज्याभिवृद्धि काय होणें आहे? याकरितां जो स्वतां उद्योगी शूर, ज्यास नित्य नूतन संपादीन हे हिंमत, त्याणी आधी हुजरात सजावी. लस्कर हशम आडाव बंदुखी तिरंदाज करोल

यैसा पंचरूढ जमाव ठेवावा. हुजरातींत माणूस ठेवावें तें परम शूर, आस्कारियाचें, निवडक, निव्वळ हुकूमबारदार, ज्याचें नांव यैकिलियाने लस्करांत व मुलकांत सकलहि पसंद करीत, समयीं दहशत वागवीत; तर्‍हेवाईक सरेखोर अमर्याद बालभाष्य व्यसनी कुचोद्य, कुचाळ्या करणार, एका धण्यापासून हरामखोरी करून आला असेल, यैसा लोक हुजरातींत येकंदर ठेऊंच नये. काये म्हणोन कीं, हुजरातीचे भरवसियावर सकलविषयीं निश्चित असावें लागतें, समयीं जिवावर होड करावी लागते, वरकड सरदारांस मर्यादेने ठेविजेतें. यैसे रीतीचे लोक असलिया इतकियाहि गोष्टी अनुकूल पडणार. नाही तर अंतर पडलिया शासन करावेंच लागतें; तेव्हा इतर सोबती दिलगीर होतील, किंवा हत्यार धरलियावर कामाचीं माणसें त्यावरी घालावीं लागतील, जायां होतील, किंबहुना खाशांवरिहि बनों शके, याकरितां यैसे लोकांचा संग्रह हुजरातींत सर्वथैव न करावा. लक्षणीक मनुष्य एकावच्छेदें मिळतात यैसें नाहीं. याकरितां देशांत, लष्करांत, गडकिल्ले यांत फिरतां मनुष्यांची आस्था धरून कारभारियांविरहित जेथें जें उत्तम मनुष्य आढळेल तें रूमागमें घेऊन माया लाऊन परीक्षा करून मग हुजरातींत ठेवावें.

यैसा जो जमाव ठेवावा त्यास रात्रदिवस दरबारच्या चौक्या पाहरे नेमून देऊन त्याप्रमाणे त्यांची नित्य हजिरी पाहत जावी. येक वेळ हजीर न जाला तरी समजाऊन सांगावें, मागती अंतर पडलें तर दटाऊन सांगोन जागा करावा. इतकियावरहि मोइनेप्रमाणे चौकीपाहरा न राखेच तरी त्यास परिच्छिन्न दूर करावें. शासनायोग्य अन्याय केलिया तेच क्षणीं यथायोग्य शासन

करावें. भीड धरूं नये. मुळी हुजरातींत मर्यादा न चाले तरी मग बाहेर काय चालों पाहते ? याकरितां हुजरातींत बेबंद सर्वथैव होऊं देऊं नये. त्यास जे मोईन केली असेल ते बिलाकुसूर पाववावी. त्याची समजावीस दुसरियावर न टाकितां आपले मायेचे, इतर आर्जव न जाणत यैसे सबनिसाचे विद्यमानें आपण स्वतां करीत जावी. लोभ करून रसिकतेने मनुष्यमात्र आपले मायेंत बरें आणावें. सकळापेक्षां हुजरात बरी ताजी राखावी. आणखी कोण्ही फितावलियानी हा निर्वाह इतर स्थळीं होणार नाहीं, यैसें त्याचे प्रत्ययास येऊन कोण्हाचे फितवियांत न मिळेत ऐसें करावें.

तरवारा कटारा तीरकमाना बंदुखादि हत्यारें, बखतरें घुग्या टोप चिलखतें पाखरा ताज हुके दारूगोळी बाणादि सामान बरें संपादून मजबूत असावें. लिहिलेप्रमाणे जमाव व सामान हमेशा जवळ व स्वतां उद्योगशील यैसें असलियाने मग काये न्यून पडों पाहतें ? बाहेरील फौजा व सरदार हुकूम मानितात; आपणास हरयेक कार्याची हिंमत असते. आत्मसंरक्षणाची निश्चिती होऊन इतर कार्यास बुद्धि चालते. जे समयीं जें करीन ऐसें चित्तांत आणिल्यास तें अनुकूल होतें. पराधीनता न घडतां शासन अव्याहत चालतें. आपले शूरत्वाचा व उद्योगाचा आसक्कारा वाढतो. शत्रु आदिकरून सकलहि वचक मानोन हलखुद असतात.

याकरितां हुजरातीची उपेक्षा न करितां सकल राजकार्यांत हें अग्रसर कार्य जाणून हुजरातींत सिलेदार येकंदर न ठेवितां लिहिलेप्रमाणे हुजरात सजावी.

(श्लोक) त्यजेत् स्वामिनमत्युग्रमत्युग्रात्कृपणं त्यजेत् ।
कृपणादविशेषज्ञं ततोऽपि कृतनाशनम् ॥ १

हे गुण व मनुष्याचे दाटीचा कंटाळा व मनुष्यासी बोलण्याचा अभाव, हे गुण सर्वथैव असों नयेत. येणेंकडून स्वामिसेवकांचें चित्तयैक्य न होतां सेवक लोक पडदियाने राहून निखाळसपण पडत नाहीं. मनुष्याचे गुणदोष ध्यानांत न येतां मनुष्यसंग्रह होत नाहीं. याकरितां या गुणांचा परिच्छिन्न परित्याग करून जेणेंकडून निखालसपणे मनुष्यसंग्रह होय तें करावें. जाल्या मनुष्यसंग्रहांत येथाधिकारें सर्वांची भीड वागवीत जावी. थोर मनुष्यास साधारण मनुष्याबरावर होऊं न देतां येकाचा येकापासोन उपमर्द होऊं न द्यावा. आपल्या हितकार्यावर दृष्ट ठेवून साधारण मनुष्य आणि कार्यकर्तें असलिया त्यास नवाजोन त्याची भीड स्वतां वागऊन त्याणे केला अर्ज चालऊन त्यास भारी करून दाखऊन जेणेंकडून आपलें हितकार्य होय तें करावें. कोण्ही येक चाकर नूतन ठेवणें, त्याचें ठिकाण, भाऊबंद, पहिली चाकरी संपूर्ण पुसोन जर लबाड लच्याळ, अथवा परक्रियाकडील पाळती, खुनी शराबी बदअमली, केवळ वृद्ध, कार्यांतून गेला, यैसा नसेल, बरा मर्दाना पाहून त्यास चाकरीस ठेवावें. परंतु कोण्ही येक चाकर जामिनाविरहित न ठेवावा. चोरीमारी हरामखोरी करून पळोन गेला तर जामिनास तगादा करावा. मुलाहिजा न करावा. म्हणजे माणूस खबरदार असतें. बेलगाम होत नाहीं, सांगितली चाकरी दुरुस्त करितें.

राजेलोकीं परिमित बोलत जावें. कार्याविरहित हरकोण्हासी तरी भलत्याच गोष्टी बोलत बैसों नयेत. यैसें बोलों लागलियावरी

मनुष्य सलगेचें होऊन अमर्याद होतें. राजकारणप्रसंग-कार्याकार्य-विचार, प्रसंगाचे गुणदोष ज्या लोकांसी बोलणें तें आधी त्यांचें प्रत्योत्साहन प्रगल्भपणे अगत्याअगत्य करून त्यांजकडूनच बोलवावें. आपण चित्त देऊन यैकावें. आपले युक्तीस समर्पक आलें तरी उत्तम म्हणोन मान्य करावें. आपले विचारास त्या लोकांची नजर पावली नसली तरी आपण त्यांची अवहेलना न करितां स्फुटवक्तेपणें साहित्य योजोन उतावळी न दर्शवितां सावकाश संपूर्ण कार्यविवेचना गुणदोष बोलावे. त्या लोकांचे प्रत्ययास आणून द्यावे. वरकड नित्यकार्यें साधारण सेवकास सांगणें तें प्रायशा इशारतीनेच सांगत जावें. इशारत म्हणोन सार्वकाळ मुखनेत्रहस्तपादादि अंगविकार चांचल्य सर्वथैव न दाखवावें. बैसले ठाईं स्थाणु किंवा मेरु, यैसा आसनजय बरा अभ्यासावा.

राजेलोकीं लहान अथवा थोर कोण्ही येक सेवकाचा दोष मुखें उच्चारीत जाऊं नये. आढळल्या दुसरेयाजवळ बोलों नये. आपल्याच चित्तांत ठेऊन त्याचे परिहाराचा उपाय योजीत जावा. कोण्ही येक पडिलें अंतर धण्यास कळलें नाहीं इतका पर्दा आहे तोंच बरें. इतकियाने माणूस मर्यादवंत असतें. किंबहुना या प्रकारविषयीं सावध राहतें. तेणेमुळें त्याचा प्रतिकार करावया आपणास सुलभ पडतें.

राजे लोक जाले तरी अवगुणांचा त्याग व गुणांचा संग्रह येकदांच होतो यैसें नाहीं. याजकरितां राजकुमाराजवळील शिक्षा करणार सभ्य मनुष्यें येक दोन च्यार यैसीं ठेवावीं. नित्य त्यांचेच सहवासें वर्तवावें. शास्त्राभ्यास लेखनाभ्यास अनालस्यपणें

निष्ठुरवादें करवावा. तैसेंच भेजणें परजणें कुस्ती घेणें ताळीम करणें या विद्येचे राजगुरु जेठी व पइलवान व बांकाईत पटाईत दांडाईत आदिकरून या विद्येंत निपुण यैसे पाहून ठेवावे. त्यांकडून त्या त्या विद्येचा अभ्यास करवीत जावा. माया धरून अभ्यासास अंतर करूं नये. किन्निमित्त कीं, ईश्वर सर्व जनाचा गुरु, सकलांचे कल्याणाकल्याणाचा इंदु नृपति कल्पिला आहे; तो सगुण असला तरी बहुतांचे कल्याण, अवगुणी जाहलियावरी बहुतांचें अकल्याण. अतयेव 'राजा कालस्य कारणम्!' याकरितां राजेलोकीं बहुत सगुण असावें लागतें.

यद्यपि सर्व विद्या अधीत, सर्वगुणसंपन्नता जाहली, श्रीकृपें राज्यहि प्राप्त जालें, सर्वजण स्तुतिहि करितें, तथापि त्यावर न जावें. नित्यानित्य स्वकीय गुणदोषविचारणा करीतच असावी. किंबहुना येकदोन सभ्य मनुष्य, भिडेचे विचारवंत प्रमाणिक सुज्ञ यैसे नित्य सहवासीं वागवावे. त्यांणी वरचेवर पडले अंतरविषयीं सावध करीत असावें. त्यांसी यैसी परिच्छिन्न आज्ञा करावी. त्यांस वडीलपणासारिखा मान देऊन त्यांची भीड बहुत वागवावी. सावध करितील त्यांचा वीट न मानितां ते समयीं त्यांचे प्रोत्साहनानिमित्त संतोषी होऊन त्यांची खुशामत करीत जावी. म्हणजे ते लोक चित्तप्रशस्ततेने अंतर पडिलें सांगत जातील. त्या त्या अंतराचा परित्याग करावा. म्हणजे जैसें वृक्षाचें मूळ दृढ भूमींत तो वृक्ष विस्तारातें पावतो, तद्वत् राज्यमूळ तो नृप, तो गुणवंत असतां तें राज्य विस्तारातें पावतें.

राजेलोकीं बहुत सोसक असावें. किन्निमित्त कीं, बहुत जनांचा

स्वामी राजा, चांगले गुण सर्वांत सारखेच असतात यैसें नाहीं. कोण्हांत कांही तरी दोष असतच आहे. किंबहुना गोरगरिबापासोन सरकारकूनपर्यंत समयीं संतापहि पावतात, संतापळेपणें अवाच्यवाद कार्यें कर्म करितात. ते समयीं शांतता धरून त्यांचे संतोषास्तव कांही हास्यवदन होऊन त्यांवर जाला अन्याय बरा चित्तांत आणून यथोचित पारपत्य करावें. म्हणजे उत्तर काळीं शाहणें मनुष्य आपणच शरमिंदें होतें. तें धणियाचें कृतोपकारी होऊन फिरोन तैसा अवगुण करीत नाहीं. इत्यादि सेवक लोकांपासोन दोष सांडवावयाच्या युक्ति सहिष्णुपणाविरहित होत नाहींत.



प्रकरण ४

*विविध प्रकारचीं नृपकार्यें केवळ नृपानेच करीन म्हणतां होणें शक्य नाही. तेव्हा राज्यभार चालविण्यासाठी प्रधान करावे लागतात.-प्रधान हेच राज्यलक्षणगृहाचे स्तंभ आहेत, हें पूर्ण चित्तांत आणून त्यावर संपूर्ण राज्यभार ठेवावा.—प्रधान म्हणजे सरकारकून. आपले शासनाप्रमाणे त्याचें शासन सकळांवर चालवावें. मनुष्यपरीक्षा करून नियोजित-कार्यधुरंधर पाहून मग सरकारकुनी सांगावी—नृपगुणतुल्य सरकारकुनाचे गुण असावे: कुलीन, कृतकर्मे, राजधर्मविशारद, पापभीरु इ०. सन्मान्य परंपरागत सेवकांच्या कुळांतला असून जर अवगुणी असेल तर त्यास नेमू नये--एकदा नेमल्यानंतर त्याची अवगणना कधींहि करू नये. कांही दोष घडल्यास त्याची वाच्यता न करितां युक्तीने दोष सांडवावा --सरकारकुनास मुतालीक देणें तेहि त्याच गुणांनीं संपन्न असावेत— संपूर्ण राज्यभार, देशदुर्गांचा अखत्यार सरकारकुनाचे हातीं द्यावा. सेनानायक त्या अधीन करावे.--केवळ सरकारकुनाच्या ओंजळीने पाणी न पितां राज्यकारभारविषयक वर्तमान स्वतंत्र आणवीत जावें— केवळ एकाचेच हातीं सर्व कारभार असू नये. अनेक सरकारकून व अनेक सेनानायक ठेवावेत.*

राज्यामध्यें हुजरात गड किल्ले लस्कर हशम यांचा नियम करणें, प्रजा संरक्षणें, धर्माधर्म विचारून पाहणें, यथाकालीं दान देणें, सेवक लोकांचीं केलीं वेतनें पाववणें, समयाचे समयीं

प्रजेपासून करभार घेणें, संपादिले पदार्थांचा संग्रह करणें, नित्यानित्य राज्याचा आयव्यय पाहणें, स्थूल सूक्ष्म अतीत अनागत कार्य सुचोन त्या त्या कार्यानुरूप अगोधर त्याचा विचार योजणें, न्याय अन्याय पाहून यथाशास्त्र शासनाचा निश्चय करून शासन करणें, परचक्रादि अरिष्टाचा परिहार योजणें, देशोदेशीं वार्तिक प्रेरून वर्तमान आणवणें, समयविशेषें शत्रूस संधिविग्रहउपेक्षा जें कर्तव्य त्याचा यथोचित विवेक करून तदनुरूप प्रवर्त करणें, आहे राज्य याचें संरक्षण करून नूतन संपादणें, अंतःपुरादि नाजूक नियम ते यथोचित रक्षणें, संभावितांचे मान वाढवून क्षुद्रांस नियमावरी ठेवणें, दैवतें व दैवतैकनिष्ठ सुब्राह्मण यांचे प्रसाद संपादणें, अधर्मप्रवृत्ति मोडून, धर्माभिवृद्धि करून शाश्वतलोकाश्रयित होणें, इत्यादि हीं नृपकार्येंच आहेत. परंतु केवळ नृपाने स्वतांच इतकाहि धंदा करीन म्हणतां होतो यैसें नाहीं. याकरितां हा सकल राज्यभार चालवावयाकारणें आपले प्रतिनिधि प्रधान करावे लागतात. प्रधानाविरहित राज्यभार चालत नाहीं.

मागें जे जे राजे जाले त्यांणी स्वहित चित्तांत आणून राज्यभारार्थ प्रधान निर्माण केले. त्यांचें आपणासारखे बहुमान वाढऊन राज्यभार चालविले. प्रधान म्हणजे राज्यलक्षणगृहाचे स्तंभ आहेत. राज्य यथोचित संरक्षून नूतन निर्माण करणें याचें मुख्य कारण प्रधान. प्रधान म्हणजे नृपसत्ताप्रसारक; प्रधान म्हणजे धर्मसंरक्षणाचे अध्यक्ष; प्रधान म्हणजे राजमदजनित अन्यायसागराची मर्यादा; प्रधान म्हणजे हत्तीचे अंकुश; किंबहुना प्रधान म्हणजे यहलोकीं राज्यकृत्यसंपादनामुळें नृपाची विश्रांति, धर्मप्रतिपालनमुळें परलोकपंथींची दीपिका. प्रधानापेक्षां

राजे लोकांस इतर आप्त व अधिकोत्तर किमपि नाहीं. सकल सेवकांपेक्षां प्रधानाचा बहुमान विशेष आहे. प्रधान हेच राजेलोकांची बाजू, प्रधान हेच राजबंधु, यैसें राजेलोकीं पूर्ण चित्तांत आणून लक्षणीक प्रधान पाहून करावे. त्यांवरी सर्व राज्यभार ठेवावा.

प्रधान म्हणजे सरकारकून. त्याची भीड सकलांपेक्षां अधिकोत्तर वागवावी. आपले शासनाप्रमाणेंच त्याचें शासन सकलांवरी चालवावें. लहान थोर राज्यकृत्य त्याचेच विचारें करावें. सकलांमध्यें त्याचें थोरपण वाढलें पाहिजे, याकरितां समयविशेषें आपला आग्रह सोडून त्याचा शब्द चालविलासा करावा. स्वल्प गोष्टीनिमित्त त्यास दिलगीर न करावे. पांचा टक्क्यांचे प्याद्यापासून सरकारकूनपर्यंत भिडेचा शिरोभाग, तो सरकारकून. हे भीड येकायेकीच वाढते यैसें नाहीं. पर्यायें चढत चढत बहुताश्रमें हे भीड वाढली असते. ते स्वल्प कार्यास्तव प्रमाद करून सर्वसाधारण लोकांमध्यें अवाच्य संभाषण अथवा चालत आले बहुमान अंतरें तोडिली तऱ्ही पुन्हा तें पाणी चढतें यैसें नाहीं; तेंव्हा इतर लोक त्याची भीड कसी वागवितील ? त्याची भीड नाहीं तेंव्हा त्याचें म्हटलें कोण यैकतो ? त्याचें म्हटलें यैकत नाहीं, तेंव्हा यथोचित राज्यकारभार कसा चालतो ? इतर साधारण अप्रसिद्ध मनुष्य या महत्कार्यांत घातलिया त्याची भीड वाढवावयास बहुत दिवस लागतील. तों कितेक कार्यें नाश होणार. याकरितां आधी सरकारकुनी देणें ते बहुत विचारून, मनुष्यपरीक्षा करून, केले कर्मामध्यें फिरोन आपणांस संकट न पडे यैसें बरें शोधून, सलक्षणीक मनुष्य वाढवीत वाढवीत कार्यधुरंधर पाहून, मग सरकारकुनी सांगावी.

सरकारकून पदवी सामान्य नव्हे. नृपपदवीउपरी सरकारकुनाची पदवी. तदनुरूपच यथोक्त नृपगुणतुल्य सरकारकुनाचे गुण असावे. सरकारकून म्हणजे कुलीन, कृतकर्मे, कार्याकार्यविचक्षण, शास्त्रज्ञ, राजधर्मविशारद, पापभीरु, स्वामिसेवकभाव जाणोन वर्तते, दैवतैकनिष्ठ, दर्शनीय, सद्रूप, सधैर्य, समंजस, स्फुटवक्ते, निरालस्य, निराग्रही, निर्व्यसनी, निःपाप, पुण्यशील, उद्योगशील, अतीत-अनागत-कार्यकर्ते, अलालुची, अहिंसक, साम दाम भेद दंड संधि विग्रह मित्रभेद मित्रसंधानादि अनेक उपायें शत्रुसाधनीं चतुर, इत्यादि उत्तमगुणसंपन्न यैसे पाहून त्यांसी सरकारकुनी सांगावी. या गुणांस विपरीत, अंगहीन, चोरी करणार, यैशास इतर मामले न सांगावे; तेथें सरकारकुनी तरी महत्पद, तें नच सांगावें यदर्थीं संशय काय आहे? कुलीन, सामान्य अथवा थोर, परंतु बहुत दिवसांचा परंपरागत सेवक, ज्याचे वडिलींहि सेवा बहुत केल्या आहेत, यैशास नवाजावें हें उचित आहे. परंतु तो जर दुराग्रही, म्हटली गोष्ट सोडावयाचा नव्हे, अथवा व्यसनी, अथवा येकाचे बहुमानें दुःख पावणार, ईर्ष्या करणार, यैसा असला तरी जैसे कंटकपुष्पवृक्षाचीं पुष्पें मात्र घेऊन कंटकांचा परित्याग करिजेतो या न्यायें त्याचा परित्याग करावा. त्यास परिच्छिन्न घरीं बसऊन त्याचे भावाबंदांत जो योग्य सुबुद्ध असेल त्यास हातीं धरावें. सर्वगुणसंपन्न मनुष्य आणि साधारण हुद्दा करितें त्यास गुणविशिष्टतेकरितां येकायेकी सरकारकुनी सांगों नये. गुणविशिष्ट असलिया त्यासी क्रमेंकरून वाढवीत वाढवीत सरकारकुनी सांगावी.

सरकारकुनी सांगितल्यानंतर क्षणक्षणा त्याची अवगणना, अपमान सर्वथा न करावा. कदाचित् समयाचे गुणें सरकारकुना-

पासोन यखादें जाणत नेणत अनुचित कर्म होत असिलें तरी ते गोष्ट चित्तांतच ठेऊन त्याचा ऐब इतर लोकांत न बोलतां, ते गोष्ट आपणांस कळली यैसेंहि त्यास अथवा वरकड सेवकांस कळों न देतां, युक्तीचे वाटेने पर्यायेंकडून त्यापासून तो दोष सांडवावा. सरकारकुनादि सेवक येकायकीं त्यासारिखे मिळणें कठीण. यास्तव त्या लोकांचे बहुमानविषयीं बहुत सावध असावें. तरीच चित्तप्रशस्ततेने यथोचित राज्यभार चालवितात, उमेदवार होऊन जाले श्रम चित्तांत न आणितां अधिकोत्तर संपादितात.

सरकारकुनास मुतालिक देणें तेहि सर्वोत्कर्षगुणसंपन्न, ज्या त्या मामलियाचा सांग निर्वाह करीत आणि आपले वोढीचे, यैसे पाहून द्यावे. त्यांचे हातून सरकारकुनांनी त्यांसी वैषम्य न करितां मामला घेत जावा. सरकारकुनाचे निसबतीचे लोक आणि कार्यकर्ते मनुष्य असलिया धण्यांनी प्रत्यकवादें त्याचे स्वरूपायोग्य मामले सांगोन सेवा घ्यावी. ज्याचे निसबतीचें जें मनुष्य त्यासी त्याचेच मामलियांत सर्वथैव न ठेवावें.

देशदुर्गाचें संरक्षण, नूतनदेशसंपादन योद्धे लोकांविरहित होत नाहीं, तथापि तो यख्तियार केवळ त्याच लोकांचे हातीं दिधलियाने ते लोक युद्धाचे प्रयोजनाचे. पुण्यपापाचें भय धरून स्वामिसेवकभावें वर्तोन इतरांस वर्तवणें, यथान्यायें मुलकाचा बंदोबस्त करणें, शास्त्रन्यायें अन्याय शोधून पारिपत्य करणें, हीं कार्यें सरकारकुनाचीं आहेत. याकरितां संपूर्ण राज्यभार व देशदुर्गाचा यख्तियार सरकारकुनाचे हातीं द्यावा. सेनानायक त्याआधीन करावे. येणेंकडून समयीं सरकारकुनापासोन अंतर

पडल्या शासनविषयीं संकटहि पडत नाहीं. किंबहुना सकल कार्यभागांत येकास येक मुदई होऊन असतात. यामुळें आपण लाऊन दिल्ही मर्यादा येकाचे भयें येक सुरळीत चालवितात.

राज्याचा यखतियार सरकारकुनावर द्यावा, तथापि त्यांणी सांगावें तेंव्हाच आपणास कळावें, यैसें सर्वथा न करावें. आणखी आपले मायेचा विश्वासू मनुष्य त्यासमागमें देशांत व गडकिल्ले यांत व सेनेंत ठेऊन त्यांचे हातें किंबहुना वार्तिकमुखें वरचेवरी वर्तमान मनास आणून खबरदार असावें. यामुळें त्यांणी केली सेवा व कार्यविशेष, व देशांत जाला न्यायान्याय, आपणांस छन्न होऊं न पावतां तत्क्षणीं कळतो. तदनुरूप पारपत्य केलें जातें. अन्यायी अनायासेंच शासन पाऊन हालखुद राहतात.

त्यास, संपूर्ण राज्यभार व देशोदेशीचें पारपत्य यकाचेच स्वाधीन करणें परम अनुचित. प्रत्यक प्रत्यक सरकारकून, प्रत्यक प्रत्यक सेनानायक यांसी त्यांचे त्यांचे आटोपानुरूप प्रत्यक प्रत्यक कार्यें सांगावीं. तितक्यांचा स्वतां परामर्ष करावा. कार्यभागपरत्वें लागलें उपसाहित्य तें आपण वरचेवरी अनुकूल करून द्यावें. केले कार्यानुरूप त्याचा बहुमान करीत जावा, म्हणजे उमेद वाढून येकाचे इर्षेने येक असाध्य कर्म तेंहि साधितात. दिनप्रतिदिनीं प्रतिपच्चंद्रन्याय राज्याभिवृद्धि करितात. येकाचेच हातें राज्यकारभार असल्यावर, इतर तत्समान जे आहेत ते राजकार्यविषयीं उदासीन होतात, किंबहुना जो पुढें होतो त्याचे व त्याणे केले कार्याचे अपकारास प्रवर्ततात. येणेमुळें राज्यभार नाश होतो. याकरितां बुद्धिमंत नृपतीने हे गोष्टी सहसा न करावी.

प्रकरण ९

*साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. याकरितां साहुकारांचा बहुमान चालवावा आणि त्यांना संतुष्ट राखून सर्व प्रकारच्या वस्तूंचा व्यापार राज्यांत चालवावा.–फिरंगी, इंगरेज, फरासीस इ० टोपीकर हेहि लोक सावकारी करितात. पण ते इतर सावकारांसारखे नव्हेत. आपलें राज्य वाढवावें, स्वमत प्रतिष्ठावें हा त्यांना पूर्णाभिमान. तेव्हा त्यांना जागा देऊं नये; खाडीचे तोंडीं तर मुळीच देऊं नये.—गनिमाचे मुलखांतील सावकार सापडले तर त्यांना खंड करून त्यांचा बहुमान राखावा. त्यांना शासन करूं नये.*

साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराकरितां राज्य अबादान होतें. न मिळे तें वस्तुजात राज्यांत येतें. राज्य श्रीमत् होतें. पडिले संकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहार होतें. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फाइदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोण्हेविषयीं त्यावरी जलल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठांपेठांत दुकानें वखारा घालोन हत्ती, घोडे, नरमिना, जरबाब, पशमी आदिकरून वस्त्रजात व रत्नें व शस्त्रें आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूरबाजारामध्येंहि थोरथोर सावकार आणोन ठेवावे. वर्षसंबंधें तैसेंच

लग्नादि महोत्सवीं त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलाऊन आणून वस्त्रेंपात्रें देऊन समाधान करीत जावें. परमुलकीं जे जे सावकार असतील त्यांचीं समाधानें करून ते आणावे. त्यांसी अनुकूल न पडे तरी असतील तेथेच त्यांचें समाधान रक्षून, आपली माया त्यांस लाऊन, त्यांचे मुतालिक आणून त्यांस अनुकूल ते जागा, दुकानें देऊन ठेवावें. तैसेच दर्यावर्दी सावकार यांसहि बंदरोबंदरीं कौल पाठऊन आमदरफ्ती करवावी.

सावकारांमध्यें फिरंगी इंगरेज वलंदेज फरासीस डिंगमारादि टोपीकर हेहि लोक सावकारी करितात. परंतु ते वरकड सावकारांसारिखे नव्हेत. त्यांचे खावंद प्रत्यक प्रत्यक राज्यच करितात. त्यांचे हुकमाने त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं सावकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं यैसें काय घडों पाहतें ? तथापि टोपीकरांचा या प्रांतें प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमत्त प्रतिष्ठावें, हा पूर्ण अभिमान. तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्यहि जाले आहेत. त्याहिवरी हट्टी जात, हातास आलें स्थळ मेलियानें सोडावयाचे नव्हेत. यांची आमदरफ्ती आले गेले ऐसीच असों द्यावी. त्यांसी केवळ नेहमी जागा देऊं नये. जंजिरेयासमीप या लोकांचें येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित् वखारेस जागा देणें जालेंच तर खाडीचे सेजारीं समुद्रतीरीं न द्यावा. तैसे ठाईं जागा दिधल्यावरी आपले मर्यादेने आहेत तों आहेत, नाहीं ते समयीं आरमार, दारूगोळी हेंच त्यांचें बळ, आरमार, पाठीसीं देऊन त्याचें बळें त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार, तेव्हां तितकें स्थळ राज्यांतून गेलेंच. याकरितां जागा देणेंच तरी खाडी लांब, गांव दोन गांव राजापुरासारखी

असेल, तेथे फरासीसांस जागा दिल्हा होता, त्या न्यायें दोन च्यार नामांकित थोर शहरें असतील त्यांमध्ये जागा द्यावा. तोहि नीच जागा, शहराचे आहारीं, शहराचा उपद्रव चुकऊन नेमून देऊन वखारा घालवाव्या. त्यासहि इमारतीचें घर बांधों देऊं नये. याप्रकारें राहिले तरी बरें, नाहीं तरी यांविणहि प्रयोजन नाहीं. आले गेले असोन त्यांचे वाटे आपण न वजावें, आपले वाटे त्यांणी न वजावें, इतकेंच पुरे.

गनिमाचे मुलकांतील गनिमाचा मुद्दक मारिल्यामुळें अथवा दर्यावर्दीमुळें साहुकार सांपडेल तरी मवसर पाहून त्यांसी खंड करावा. खंडाचा वसूल घेणें तोहि त्यांस राखून घ्यावा. खंड फारीख जाहलियावरी थोडीबहुत त्यांची मेहमानी करून बहुमानें त्यांसी त्यांचे स्थळास पावऊन द्यावें. गनिमाकडील सेवक लोकांस जे शासनें आहेत ते साहुकार लोकांस उचित नव्हे.

## प्रकरण ६

*राज्यांतील वतनदार देशमुख, देशकुलकर्णी व पाटील आदिकरून हे राज्याचे दायादच होत. राजाशीं निष्ठेने वर्तावें ही यांची बुद्धि नाही. वतनलोभाने हे परसत्तेचा देखील आश्रय करितात.—या दोषांकरितां यांचा द्वेष करून वतनें बुडवावीं म्हटल्यास तोहि अन्याय. तेव्हा आहे वतन तें चालवावें, पण त्यांत जास्त बिलकूल होऊं देऊं नये.—भाऊबंद अथवा निसबतीचे लोक एकाच वतनावर ठेवू नयेत. उच्छृंखल वतनदारांस कठीण कार्यावर पाठवून त्यांचा नाश झाल्यास पाहावा.—वतनदारांस बाह्यतः खूश ठवावें. पण मधूनमधून द्रव्यादिग्रहणें त्यांना हलकें करीतच असावें.—वतनदारांमध्ये कार्यकर्ता आणि प्रामाणिक असेल तर त्याचा अत्यादरें संग्रह करावा.*

**राज्यांतील वतनदार, देखमुख व देशकुलकर्णी पाटील आदिकरून यांसी वतनदार म्हणोन म्हणावें, हे प्राकृत परिभाषा मात्र आहे. ते स्वल्पच परंतु स्वतंत्र देशनायकच आहेत. सार्वभौमापासून बलन्यूनतेने उतरती परंपरा बलिवंत राखोन दुर्बल वर्ततच आहेत, परंतु त्यांस साधारण गणावें यैसें नाहीं. हें लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत. आहे वतन इतकियाचवर कालक्रमणा करावी, सर्व देशाचा स्वामी म्हणजे राजा, त्यासीं निष्ठेने वर्तावें, कोण्हाचा अन्याय न करावा, हे यांची बुद्धि नाहीं. नूतन संपादावें, बळकट**

व्हावें, बळकट जालें म्हणजे येकाचें घ्यावें, दावे दरवडे करावे, हा यांचा सहज हव्यास. राजशासन होईल हें जाणोन अगोधर दुसरियाचा आश्रय करितात, स्थळें बांधितात, त्या बळें वाटा पाडितात, देश मारितात. समयीं जीवाचीहि तमा धरीत नाहींत. परचक्र आलें म्हणजे वतनाचे आशेनें अगोधर सल्ख करितात; स्वतां भेटतात, तिकडील भेद इकडे, इकडील भेद तिकडे करून राज्यांत शत्रूचा प्रवेश करितात. मग तेच राज्याचे अपायभूत होऊन दुःसाध्य होऊन जातात. याकरितां या लोकांचें संरक्षण परम युक्तिजन्य आहे.

इत्यादि दोष या लोकांत आहेत म्हणून केवळ यांचा द्वेष करावा, वतनें बुडवावीं, म्हणतां हाहि परम अन्याय. अन्याय विशेष अनर्थांचेंच कारण; तें न होतां यांसी केवळ मोकळी वाग देईन म्हणतां, यांची निजप्रकृत तेंव्हाच प्रगट होणार, याकरितां या दोन्ही गोष्टी कार्यास येत नाहींत. यांस स्नेह आणि दंड यांमध्यें संरक्षून ठेवावे लागतात. आहे वतन तें चालऊन प्रजेवरी यांची सत्ता असों न द्यावी. हक्क इनाम आज्ञेविरहित घेऊं न द्यावा. जें चालत आलें असेल त्याहून जाजती जवभर लाजिमा तोहि होऊं न द्यावा, आणि देशाधिकारियांचे आज्ञेंत वर्तावें.

सात पांच भाऊबंद अथवा निसबतीचे लोक यैसे येकजमावें वतनावरी राहूं न द्यावे. शोध करून जे भाऊबंद व निसबतीचे लोक असतील त्यांस दूर प्रदेशीं त्या त्यांचे कर्तेपणायोग्य कामें सांगोन कबिलेदेखील प्रत्यक प्रत्यक ठेवावे. वतनावरी गुंज होऊं न द्यावी. कदाचित् वतनदारांत कोण्ही उन्मत्त उच्छृंखळ

यैसा कोण्ही असला तरी त्यास नवाजून जें कठीण कार्य असेल तैसे कार्यावरी त्यास पाठवावा. त्यामध्यें कार्य अथवा त्याचा नाश हीं दोन्ही स्वकार्येंच आहेत. वांचला तर आणखी कठीण कार्य सांगावें.

वतनदारांचा परस्परें कलह होऊं न द्यावा. वतनदारांची खुशामत बरी करीत जावी. परंतु त्यांस वर्तवावयाचा पाइंडा आहे, त्या चालीस तिळतुल्य जाजती होऊं न द्यावें. अंतर पडल्या तात्काळ शासन करावें. वतनदार पाहून वर्षां दो वर्षां कांही समर्पक अंतर स्थापून अल्पस्वल्प द्रव्यादि-ग्रहणें हलके करीतच असावें. ज्याजवळोन अंतर पडिलें नसेल तैसा वतनदार जवळ असतां इतर सेवकांजवळ हे वतनदार बहुत भले, प्रमाणिक, आमचे मायेचे, इत्यादि त्यांस प्रोत्साहन होय, यैसीं वचनें बोलत जावीं.

वतनदारांमध्यें कार्यकर्ते आणि प्रमाणिक मनुष्य असल्या तैसे सेवक मिळणें परम कठीण. आधी वतनदार हा येक विश्वास, ततोपि प्रमाणिक, म्हणजे सोनें आणि सुगंध! याकरितां त्याचा अत्यादरें संग्रह करावा, मेहमानी करावी, बहुमान वाढवावा, हुजूर-सेवा सांगावी, किंबहुना जें नाजूक कार्य असेल तैसे कार्यावरी ठेवावे.

● ●

## प्रकरण ७

*वृत्तिलोप करणें हें परम पातक आहे. वृत्तिवंताने महदपराधहि केला तरी इतर शासन करावें; वृत्त्यपहार करूं नये.—सेवक लोकांनी सेवा उदंड केली तरी त्यांस नूतन वृत्ति करून देऊं नये. दिवाण महसुलांत वृत्ति करून दिली तर महसूल वंशपरंपरेनें न्यून होतो. रयतेवर हक्क करून दिला तर रयत पीडा पावते. वृत्ति ज्यास दिली त्याचे वंशज हरामखोर निघाल्यास राज्यास अपाय होतो. तेव्हा नूतन वृत्ति कोणास करून न द्यावी.—भूमि इनाम करून देणें हा तर परम अन्याय. राज्य आहे तेथवर कार्यें आहेतच. तेव्हा विशेष कार्य अथवा सेवा याकरितां भूमि इनाम देऊं नये. भूमि गेल्यावर राज्य कशाचें करणार ?—धर्मार्थ भूमि देणें याचें पुण्य अनंत आहे. पण धर्माधर्माचा सूक्ष्म विचार करून देशकालपात्र पाहून विद्वान ब्राह्मणांना किंवा थोर देवस्थानें अथवा सत्पुरुषांचे मठ यांना भूमि देणें ती द्यावी.—एकदा दिल्यावर मात्र प्राणान्त संकट पडलें तरी दिलेल्यामध्ये आचमनभर उदक तेंहि अभिलाषूं नये.*

लहान अथवा थोर परंतु प्राचीन परंपरागत वृत्ति चालत आल्या असतील तो वृत्तिलोप केलियाने परम पातक आहे. येकाची वृत्ति येकास सर्वथैव न द्यावी, स्वतां अपहार न करावा. कदाचित् वृत्तिवंतानें अपराध केला तथापि त्यास यथाशास्त्र शासन करावें. परंतु वृत्त्यपहार करावा हें विहित नव्हे. वृत्त्यपहार ५

करावा यैसा महदपहाराधर्म केला असिला, तरी शास्त्र काढून शास्त्रावरी भार ठेऊन शास्त्रीं सांगितलें असेल तैसें करावें. मुख्यार्थ हाच कीं, न्याय न पाहतां अन्यायें दुसरियाचा वृत्यपहार करावा हे क्षुद्र बुद्धि सहसा धरूं नये.

तैसेंच सेवक लोकीं अथवा वृत्तिवंतांनी सेवा उदंड केली तरी त्यांसी द्रव्य अश्व गज वस्त्र भूषणादि द्यावीं; योग्य पाहून थोर सेवा सांगावी, परंतु नूतन वृत्ति करून देऊं नये. किंनिमित्त कीं, जरी दिवाण महसुलांत वृत्ति करून दिधली तरी तितका महसूल वृत्ति-वंशपरंपरेनें न्यून होतो. महसूल न्यून होणें हेच राज्याची शीर्णता, राज्याची शीर्णता तोच राज्यलक्ष्मीचा पराभव. याकरितां राजकुलीं निर्माण जालियाने कोण्हाचे खुशामतीवर न जातां, मोह न पावतां, महसूल न्यून पडों न द्यावा. जरी रयतेवरी हक करून दिल्हा तरी नूतन कानूमुळें रयतीवरी जलल होऊन रयत पीडा पावते, श्रमी होते. येकाचे सुखानिमित्त बहुतांस श्रम करावे या कर्मामध्यें दुसरा शाप द्यावाच नलगे. बहुतांचा शाप यहलोकीं परलोकीं बाधक. तैसेंच ज्यासी वृत्ति द्यावी त्याचसारिखे त्याचे वंशज होतील ऐसें नाहीं. कदाचित् त्याचे वंशजांनी त्यामागें हरामखोरीची नजर धरली तरी त्यास त्याच वृत्तीचें बल होणार. तेव्हा विशेष अमर्याद होतो. मग आपण होऊन राज्याचें शाश्वत अकार्य करून ठेविलें यैसें होतें; अथवा केल्या अन्यायास्तव आपले वंशजांनी ते वृत्ति दूर केली तरी स्वदत्तापहारदोष आपले वंशजांवरी येतो. तैसेंच या कलियुगीं दिवसेंदिवस पाप अधिकच होणार, प्रस्तुत होत चाललेंच आहे; ततोपि वृत्तिवंतास तों पापाचें भयच नाहीं. कदाचित् त्याच वृत्तीवर होत होत, ज्यासी वृत्ति

द्यावी त्याणे अथवा त्याचे वंशजांनी दस्युभाव धरून देशास पीडा करूं लागले, तरी तो दोष वृत्ति देणारावरी येतो. इत्यादि दोष बरे चित्तांत आणून नूतन वृत्ति कोण्हास करून न द्यावी.

तैसेंच सेवक अथवा वृत्तिवंत यांसी हरयेक कार्यप्रयोजनामुळें भूमि इनाम देणें हा परम अन्याय. जो राजा होत्साता राज्याचा शत्रु असेल त्याणे भूमीवर उदार व्हावें. 'राजा भूपति' यैसें भूमीकरितां म्हणावें, ते भूमीच गेलियावरी राज्य कशाचें करणार? पति कोण्हाचा होणार? कदाचित् विशेष सेवा केली म्हणोन ग्राम अथवा भूमि द्यावी तरी राज्य आहे तेथे वंशपरंपरेने कार्यें आहेतच. सेवकहि कार्यें करणार आहेत. तेव्हा ज्या समयीं जे सेवक कार्यें करतील त्यांस भूमि देत असावें, यैसें देतां देतां संपूर्ण राज्य भरीस घालावें यैसें होतें. वरकड एतद्विषयींचे विशेष दोष वृत्तीच्या विषयांत लिहिले आहेत तेहि अवश्यमेव प्राप्त होतात. याकरितां जो राजा राज्य करणार, राज्य वाढवणार, नीतिवंत म्हणोन कीर्ति संपादणार, त्याणे सर्वथैव मोह न पावतां यवोदर-प्रमाण भूमि तेहि इनाम देऊं नये. सेवकलोकीं वंशपरंपरेने उपयोगास येई यैसी सेवा केली तरी त्यांस वंशपरंपरेने चाले यैसें द्यावें म्हणावें, तर जेव्हा मान्य करून सेवक जाला, वेतन घेतो, तेव्हा त्याणे पडेल तैसें जीवाभ्य श्रमसाहस करून स्वामिकार्य करावें हा सेवकाचा सेवाधर्मच आहे. तथापि येखादी उत्कृष्ट सेवा जे कोण्हाच्याने नव्हे यैसी केली तर त्यास येखादी सेवा मुशारे-याची वेतन करून देऊन, रयतीवर जलल अथवा महसुलांत न्यून न होय यैसें करावें.

धर्मार्थ भूमिदान देण्याचें पुण्य अनंत आहे. परंतु धर्मांत अधर्म, अधर्मांत धर्म, हे धर्माची सूक्ष्मता बरी शास्त्रतः विचारून धर्मार्थ भूमि देणें ते देश काल पात्र पाहून द्यावी. जोगी जंगम वेशधारी इत्यादि जे स्वसामर्थ्यें मेळवावयास सामर्थ्य धरितात, ज्यांस भिक्षार्थ फिरावयास कार्यास येतें, यैशांस, अथवा ज्यांचे वंशज दुष्ट दुराचारप्रवर्तक होऊं शकेत यैशांस, तैसेंच स्वधर्मविरोधी, पाषांडी, यांस ग्राम अथवा भूमि न द्यावी. जे श्रोत्री कुटुंबवत्सल वेदशास्त्रसंपन्न अनुत्पन्न, ज्यांणी घर सोडून भिक्षेस जातां ज्यांचा कर्मलोप होतो, यैसे सद्ब्राह्मण पाहून पाहून पर्वादि पुण्यकाळीं अथवा महाक्षेत्रीं सदक्षणिक धारादत्तें ग्राम अथवा भूमि देणें, ते द्यावी. तैसींच थोर थोर जागृत देवतायतनें, सत्पुरुषांचे मठ, समाधिस्थानें जेथें पूजा नैवेद्य यात्रादि अन्नशांति नियमित आहे यैसे स्थळींहि ग्राम अथवा भूमि देणें ते द्यावी.

आणि दिधलियावरी कैसाहि आपत्काल पडो, प्राणपर्यंत संकटें घडोत, परंतु यहलोकीं सुख क्षणैक आहे हें जाणून, परलोकभय संपूर्ण चित्तांत आणून दिधलियामध्यें आचमनभर उदक तेंहि लीलाप्रसंगेंकडूनहि अभिलाषूं नये. यैसे जे धैर्य पापभीरु राजे आहेत त्यांचें संकट तो ईश्वरच परिहार करितो. यद्यपि होणार तें पापबुद्धि धरलियाने चुकतें यैसें नाहीं, किंबहुना पापबुद्धीने विघ्नाचीच अभिवृद्धि होते. याकरितां हा लिहिला अर्थ बरा चित्तांत आणून याप्रमाणे वर्तणूक करावी.

● ● ●

प्रकरण ८

संपूर्ण राज्याचें सार तें दुर्ग.–हें राज्य थोरले कैलासवासी स्वामींनी गडावरूनच निर्माण केलें. आणि औरंगजेबाच्या आक्रमणसमयीं किल्ले होते म्हणून अवशिष्ट तरी राज्य राहिलें.–गडकोट म्हणजेच राज्यलक्ष्मी, गडकोट हेच प्राणसंरक्षक, हें पूर्ण चित्तांत आणून असतील त्यांचें संरक्षण करावें व नूतन बांधण्याचा हव्यास करावा.—गडकोट संरक्षणाचें कार्य फार नाजूक. दगा झाला तर स्थळासहित तितकें राष्ट्र हातीचें गेलेंच. तेव्हा गडकोटांची उस्तवारी आणि शासन यांस तिळतुल्य अंतर पडों न द्यावें.—किल्ल्यावरील अधिकारी, मुख्य म्हणजे हवालदार व सदरसरनोबत, तसेच सबनीस व कारखांनीस, त्याचप्रमाणें तटसरनोबत, बारगीर, नाईकवाडी, रजपूत हे सर्व परमविश्वासू, कबीलदार, अलालुची, कार्यतत्पर असे ठेवावे.–किल्ल्यामध्यें मनुष्यें ठेवणें तीं चालक, चोर, व्यसनी, फितवेखोर अशीं सर्वथा ठेवूं नयेत सर्व मामलेदारांना ठरीव मुदतीनंतर काढून तशा गुणसंपत्तीचे दुसरे अधिकारी पाठवावे.—संबंधी लोकांना जवळजवळच्या किल्ल्यांवर मामले सांगूं नयेत. किंवा किल्ल्याखालच्या मुलखांतील वतनदारांना त्या समीपच्या किल्ल्यावर सेवा सांगूं नये.—किल्ल्यावरील कोणा अधिकाऱ्याने कांहीं गुन्हा केल्यास त्यास ताबडतोब काढावें. कोणी दगा करण्याची दुर्बुद्धि धरल्याचें कळल्यास त्यास ताबडतोब काढून त्याची चौकशी करून आरोप खरा ठरल्यास त्याचा बेमुलाहिजा शिरच्छेद करावा. निरापराध ठरल्यास त्याचें अन्यमार्गें समाधान

करावें, पण फिरून त्याला त्याच मामल्यावर पाठवू नये.–किल्लयाला गनिमाचा वेढा पडल्यास तो लढविण्याची शिकस्त करावी. निदान येऊन पडलें तर एकवट होऊन प्राणार्पण करावें. परंतु किल्ला स्वाधीन करून आपला जीव वाचवावा असें कदापि करूं नये. असें करणाऱ्याचें धन्यानें तोंड देखील पाहूं नये.—कोणी मामलेदार जीव वाचवून गनिमाकडे गेला तर त्याला हस्तगत करावा किंवा उपायें करून मारवावा. त्याचे लोक गुलाम करावे, बायका बटकी कराव्या.—किल्ल्याची सेवा परम कठीण. ज्यांच्याबद्दल भीड पडेल असे लोक किल्ल्यावर कधी नेमूं नयेत.—किल्ल्यासमीप दुसरा पर्वत त्याच्यापेक्षा उंच असा असू नये. तट, बुरूज इ० मजबूत बांधावे. अनेक दरवाजे, तशाच चोरदिंड्या ठेवाव्या.–भुईकोट असेल तर त्याभोवती रुंद व खोल खंदक खणावा. गडास यावयाचे मार्ग झाडी वगैरे लावून दुर्गम करावे. गडाभोवती गस्त घालवावी.—गडावर टाकीं तळीं बांधून पाण्याची व्यवस्था उत्तम करून ठेवावी.—गडावरील राजमंदिर उत्तम बांधून त्यावर दाट चुन्याचा गिलावा करावा. त्यांत सर्व काळ वस्ती करून तें नीटनेटकें राखावें. गडावर कोठेहि केर साचूं देऊं नये.—धान्याचीं कोठारें आग व उंदीर इ० चा उपद्रव होणार नाही अशीं बांधावीं. तेलातुपासासाठी टांकीं करावीं, किंवा रांजण गाडावे.—दारूखाना घराच्या वाऱ्याखाली नसावा. तळघरांत गची करून त्यांत ठेवावा. त्यावर सख्त पाहरा ठेवावा.—किल्ल्यावर तटाबुरजांवर योग्य त्या जागीं तोफा व बंदुखा व त्यांचा सरंजाम कोणत्याहि क्षणीं लढाईस तयार अशा स्थितींत ठेवावा.—पर्जन्यकाळीं तोफांना व दरवाजांना तेल मेण देऊन ठेवावें. गडावर इमारतीचा कारखाना ठेवून सर्व बांधकाम दुरुस्त राखावें.—गडावरील झाडझाडोरा राखावा व वाढवावा.—गडोगडीं ज्योतिषी, वैदिक, सर्व प्रकारचे वैद्य, पंचाक्षरी, लोहार सुतार पाथरवट चांभार इत्यादि ठेवावे.—वर लिहिलेंप्रमाणे गडाची सर्व उस्तवारी करावी.

संपूर्ण राज्याचें सार ते दुर्ग. दुर्ग नसतां मोकळा देश परचक्र येतांच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उद्वस होतो. देश उद्वस जाल्यावरी राज्य यैसें कोण्हास म्हणावें ? याकरितां पूर्वी जे जे राजे जाले त्यांणी आधीं देशामध्यें दुर्ग बांधून तो देश शाश्वत करून घेतला, आलें परचक्रसंकट दुर्गाश्रयीं परिहार केलें.

हें राज्य तरी तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामींनी गडांवरूनच निर्माण केलें. जो जो देश स्वशासनवश्य न होय त्या त्या देशीं स्थळविशेष पाहून गड बांधिले, तैसींच जलदुर्गें बांधिलीं; त्यावरून आक्रम करीत करीत सालेरी अहिवंतापासोन कावेरीतीरपर्यंत निष्कंटक राज्य संपादिलें. औरंगजबासारिखा महाशत्रु चालोन येऊन विजापूर भागानगरासारिखीं महासंस्थानें आक्रमिलीं, संपूर्ण तीस बत्तीस वर्षेपर्यंत या राज्यासी अतिशय केला, त्याचे यत्नास असाध्य काय होतें ? परंतु राज्यांत किल्ले होते म्हणोन अवशिष्ट तरी राज्य राहिलें. पुढें पूर्ववत् करावयास अवकाश जाहला.

या उपरिहि ज्यास राज्य संरक्षण करणें आहे, त्यापेक्षां अधिकोत्तर साधणें, त्याणे स्वतां गडकोटांची उपेक्षा न करितां, परम सावधपणें, असतील गड किल्ले त्यांची यथोक्त मजबुदी करावी. नूतन देश साधणें त्या देशांत जीं स्थळें असतील तीं महत् यत्नें हस्तगत करावीं. ज्या देशांत गडकोट नसतील त्या देशांत आपले राज्याचे सरदेपासून पुढें जबरदस्तीने नूतन स्थळें बांधून, बांधीत बांधीत तो देश आक्रमावा. त्या स्थळांचे आश्रयीं सेना ठेऊन त्यापुढील देश स्वशासनवश्य करावा. यैसें करीत करीत राज्य वाढवावें. गडकोटाचा आश्रय नसतां फौजेच्याने परमुलकीं टिकाव

धरून राहवत नाहीं. फौजेविरहित परमुलकीं प्रवेश होणेंच नाहीं. इतकियाचें कारण तें गडकोट. गडकोटाविरहित जें राज्य त्या राज्याची स्थिती म्हणजे अभ्रपटलन्याय आहे. याकरितां ज्यांस राज्य पाहिजे त्यांणी गडकोट हेंच राज्य, गडकोट म्हणजे राज्याचें मूळ, गडकोट म्हणजे खजीना, गडकोट म्हणजे सैन्याचें बळ, गडकोट म्हणजे राज्यलक्ष्मी, गडकोट म्हणजे आपले प्राणसंरक्षक, यैसें पूर्ण चित्तांत आणून कोण्हाचे भरवसियावर न जातां आहे त्याचें संरक्षण करणें व नूतन बांधणें, याचा हव्यास स्वतांच करावा, कोण्हाचा विश्वास मानो नये.

गडकोटसंरक्षणाचें कार्य परम नाजूक आहे. स्थळास मामलेदारादि जे लोक ठेवावे त्यांणी यखादा भेद केलियामुळें अथवा शत्रु चालोन आला असतां नामर्दी केल्यामुळें अथवा त्यांचे गाफिलीमुळें स्थळास दगा जाला तरी स्थळसहित तितकें राष्ट्र हातींचें गेलें. उरल्या स्थळास व राष्ट्रास उपसर्ग लागला, शत्रु प्रबळ येऊन पावला असतां जो गेला किल्ला, त्या किल्लेकराची सवे इतर राहिले किल्लेकरांस लागोन तेहि स्थळास अपाय योजतात. म्हणजे येकेक राज्यासच धक्का बसतो. या कारणें किल्ले कोट जतन करणें हे गोष्ट सामान्य आहे यैसें न समजतां तेथील उस्तवारी व शासन यांस तिळतुल्य अंतर पडों न द्यावें.

त्यास आधी किल्ल्याचा जीव तो किल्ल्याचा हवालदार, तैसाच सदर सरनोबत, हे निःस्पृह, कोण्हाचे निसबतीचे अथवा येकाचे आर्जवामुळें ठेवावे यैसें नाहीं, जे कुळिवंत मऱ्हाटे आणि शिपाई जे शरम धरीत असतील, कबीलदार, विश्वासू, उद्योगी,

अलालुची, अनिद्र, सकल लोकांचें समाधान रक्षून यथोचित रीतीने सर्वांपासून स्वामिकार्यें घेत, हें स्थळ म्हणजे धण्याने हे आपली परमप्रिय ठेव दिल्ही आहे, आपले प्राणान्त यास दगा होऊं नये, यैसें पूर्ण चित्तांत आणून जे धण्यांनी लाऊन दिल्ही मर्यादा त्यास तिलांश अंतर पडों न देतां, दिवसाचा उद्योग दिवसा, रात्रीचा उद्योग रात्रीं, निरालस्यपणें करून सर्व प्रेत्नें स्थळ जतन करीत, यैसे ठेवावे. तैसेच सबनीस व कारखानीस हे कारकून धण्यांनी लाऊन दिल्हे मर्यादेचे प्रेरक, सकल उचितानुचित कार्याचे सूचक; जैसे हवालदार सरनोबत खावंद, तैसेच हेहि खावंद, यांणींही त्याच न्यायें सकलांस वर्तऊन आपण वर्तावें लागतें. याकरितां तेही याच गुणाचे आणि लिहिणार, अमीन, निर्भीड यैसे पाहून ठेवावे. तैसेंच तटसरनोबत, बारगीर, नाईकवाडी, रजपूत ठेवणें ते बरे मर्दाने कबीलदार, विश्वासू यैसे पाहून नजर–गुजर करून ठेवीत जावे. किलियास दाहा टक्क्यांचा प्यादा ठेवणें तोहि हुजूरचे सनदेखेरीज न ठेवावा.

किलियामध्यें मनुष्य ठेवणें तें चाळक, चोर, खुनी, तऱ्हेवाईक, भ्याड, आवाई खाणार, सरेखोर कैफी, फितवेखोर, असे सर्वथाहि ठेऊं नये. जे ठेवणें ते परीक्षा करून ठेवीत जावें. त्यांतहि तीन वर्षांनी हवालदार काढावा, चहूं वर्षांनी सरनोबत काढावा, पांचा वर्षांनी सबनीस, कारखानीस काढावे; आणि त्या मामल्यावरी त्या त्या मामल्यायोग्य आणखी मामलेदार पाठवावे. जे काढावे त्यांचेंहि त्याचे स्वरूपानुरूप समाधान करून कांही येक दिवस समागमें वागऊन स्वामिसेवकभावाची त्यांची बुद्धि कांही मलिन जाली असली तरी सहवासामुळें पुन्हा सोज्वळ करून, श्रमी होऊं न

देतां, त्यांचे आटोपानुरूप आणखी मामले सांगावे. तैसेंच तटसरनोबत, बारगीर हेहि नवे जुने करीतच असावें. नाईकवाडी, रजपूत, अन्यायी अथवा कार्यकर्ता असलिया त्यास काढून ज्यास जें शासन अथवा सर्फराजी करणें ते करीतच जावी.

किल्ल्याचा हवाला व सरनोबती करीत असतां तो मृत्यु पावला तरी तो मामला त्याचे पुत्रास अथवा भावाबंदास न सांगावा. त्याचे पुत्र अथवा भाऊबंद असतील त्यांचें समाधान करून त्यांचे स्वरूपानुरूप आणखी उद्योग सांगोन चालवावें. लस्करचे सरदाराचे भावाबंदांस अथवा त्याचे निसबतीचे लोकांस परिच्छिन्न किल्ल्याचा मामला सांगू नये. तैसेंच येका घरचे भाऊबंद येक दोन तीन आहेत, आणि इतकेहि गडवई, तर त्यांस किल्ल्याचे मामले अवश्यमेव सांगावेच लागतात. काय निमित्त कीं, किल्ल्याचे कामाचें माणूस मिळणें परम कठीण आहे. परंतु त्यांस समीप समीपच किल्ल्यांवर न ठेवावें. दूर दूर किल्ले, येकाचा हात यकास न पावे, मध्यें आणखी किल्ले असतील यैशा किल्ल्यांचे मामले सांगोन सेवा घ्यावी. किल्ल्याखालील मुलकांतील देशमुख देशपांडे पाटील कुलकर्णी चौगुले आदिकरून मिरासी वतनदार यांस त्यांसमीपच्या किल्ल्यावरी सेवा न सांगावी. त्यांचे वतनापासोन दहा पांच गावें दूर किल्ले असतील तैशा किल्ल्यांस ठेवावे. तेच वतन आणि समीपतेची सेवा जाहल्यावरी चाकरीवरी दुरुस्त न राहतां क्षणक्षणा घरास जाणार, किंबहुना समयविशेषें वतनाचे आशेने स्थळास भेद करून दगाहि करणार, याकरितां किल्ल्याजवळील लोक किल्ल्यावर न ठेवावे.

किल्ल्याचे मामले करीत असतां चोरीमारी, कचकलागत, सुस्ती—नाकाबिली, इत्यादि अन्याय असलिया, सिरिस्त्याप्रमाणे मुदतीचा मार्ग न पाहतां त्यांस काढून आणावे. अन्याय पाहून शासन करावें. त्या मामल्यावरी त्या मामल्यायोग्य दुसरें मनुष्य मर्दानें पाहून पाठवावें. गडकोटचे मामलेदाराने अथवा हरएकाने स्थळास दगा होये यैसी दुर्बुद्धि धरली आहे यैसें वर्तमान आलें तरी आधी प्रमाणाप्रमाण न पाहतां, प्रलापावरी न घालितां, त्यास सावध होऊं न देतां, तत्क्षणीं काम हातीचें न जाय यैसा उपाय योजोन, कोण्हास कळों न देतां त्यास काढून आपणाजवळ आणावें. हुजूर आल्यावर रास्ती न्याय करून अन्याय खरा जाला, तरी तात्काळ बेमुलाहिजा त्याचा शिरच्छेद करावा; आणि तें मस्तक गडोगडीं फिरवावें. यैसें जो करील त्यास हा नतीजा म्हणोन धांडोरा पिटवावा. वाजवी न्याय करितां निरपराध जाला तरी त्याचें, आपणास काढून आणिले हा डाग चित्तांतून जाय, यैसें बहुता रीतीने समाधान करावें. परंतु फिरोन त्याचे मामलियावरी त्यास न पाठवावें. रोजमरा चालऊन सहा च्यार मास हुजूर ठेऊन मग त्यायोग्य आणखी मामला असेल त्यावरी पाठवावें. तैसेंच आणखी खरी अथवा लटकी बदलामीमुळें ज्या स्थळींहून मनुष्य आणावें, रोहपोहमुळें दुरापराध जाला तरी फिरोन त्याचे मामल्यावरी त्यास न पाठवावें. अन्याय खरा जाल्यावरी परिच्छिन्न त्या त्या अन्यायानुरूप शासन करावें.

स्थळास गनिमाचा वेढा आला तरी सामान व उपराळा आहे तों गडवईंतून रोज जुंझोन स्थळ जतन करावें. सामान सरलें, उपराळा राहिला, निदान येऊन पडिलें, तरी धण्यांनी हरउपायें

मामलेदारादि लोक काढून आणून वांचवावे. धण्याचा हात पावेना यैसें जालें तरी परिच्छिन्न मामलेदारादि लोकीं यका करून मरावें. त्यांचे मुलालेंकरांचें धण्यांनी सर्व प्रकारें चालवावें. परंतु लिहिलेप्रमाणे निदान येऊन पडलें तरी सला करून स्थळ देऊन आपला जीव वांचवावा, यैसें सर्वथा न करावें. जो मामलेदार यैसें करून तोंड घेऊन येईल त्याचें मुखावलोकन न करितां फिरोन सेवा न सांगतां त्यास घरींच बसवावें. फिरोन त्याचेविसीं कोण्ही अर्ज करील तरी त्यास अर्ज करूं न देतां लिहिलेप्रमाणे त्यास ठेऊन, स्थळाचा तगादा लाऊन विलाज करवावा. तो श्रम करीत असतां स्थळाचा उपाय न होय, तेणेमुळें शरमिंदा होतो, भय वागवितो, यैसें प्रत्ययास आलें, तरी मग कोण्हीहि सरकारकून अर्ज करितील त्याचे भिडेने अर्ज कबूल केला यैसें करून, त्यास दर्शन देऊन हुजूरचा मामला सांगावा. मग वाढवीत वाढवीत वाढवावा.

कदाचित् कोण्ही मामलेदार स्थळास संकट जालें म्हणोन स्थळ गनिमास देऊन आपला जीव वांचऊन तो गनिमाकडे गेला, तरी तो यत्नेंकडून हस्तगत होय ते गोष्ट करावी. कदाचित् हातास न लागे तरी त्याचे लेक गुलाम करावे, बायका बटकी कराव्या, त्यासहि विष अथवा मारेकरी घालोन हरप्रयत्नें तेथील तेथे मारवावा. जर सामान सरलें, उपराळा राहिला, धण्याचा हात न पावे, यैसें जाहलियावरी निदानीं मामलेदारांनी गड गनिमास देऊन गनिमाकडे गेला तरी त्याचे कबिल्यास तैसाच निबंध करावा. पहिले लिहिलेप्रमाणे सकल निर्वाह करावा. जर कौल घेऊन आला तरी त्याचीं मुलेंलेंकरें सोडावीं, त्यास घरीं

बसवावा. स्थळाचा उपाय करील तरी करून घ्यावा. पर्यायेंकडून कितीका दिव ंउपरी हरयेक मामला सांगावा.

किल्ल्याची सेवा पर.. कठीण, शासन परम उग्र. शासन न करितां किल्ल्याचें काम सर्वसाधारण होऊन जाणार, यैसें सर्वथा न करावें. शरीरसंबंधी आप्तविषयी अथवा त्यांचे निसबतीचे लोक, अंतर पडलिया ज्यांस शासन करितां आपणास संकोच, यैसे लोकांस किल्ल्याचे मामले सर्वथा न सांगावे. शासनास अंतर जाल्या दुसरियास अर्ज करावयास जागा होतो. भिडेने भीड वाढते; केली मर्यादा तुटोन जाते. मर्यादाभंग तेंच राज्यनाशाचें कारण. याकरितां मर्यादाभंग सहसा होऊं न द्यावा.

राज्यसंरक्षणाचें मुख्य कारण तें किल्ले; ते देशोदेशीं स्थळें पाहून बांधावे. किल्ल्यासमीप दुसरा पर्वत किल्ल्यासमुदयीं असों नये. कदाचित् असला तरी सुरंग लाऊन पाडून गडाचे आहारीं आणावा. सुरंगास असाध्य असला तर तोहि जागा मोकळा न सोडितां बांधोन मजबूद करावा. गडाची इमारत गर्जेची करूं नये. तट बुरूज, चिलखतें पाहरे पडकोट, जेथे जेथे असावे ते बरे मजबूद बांधावे. नाजूक जागे असतील ते सुरंगादि प्रेत्नें अवघड करून पक्की इमारत बांधोन गडाचा ऐब टाळावा. दरवाजे बांधावे, ते खालील मारा चुकऊन, पुढें बुरूज देऊन, येताजाता मार्ग बुरूजाचे आहारीं पडोन दरवाजे बांधावे. किल्ल्यास येक दरवाजा हा ऐब थोरलाच आहे, याकरितां गड पाहून, येक दोन तीन दरवाजे, तैशाच चोरदिंड्या करून ठेवाव्या. त्यामध्यें हमेशा राबत्यास पाहिजेत तितक्या ठेऊन वरकड दरवाजे व

दिंड्या चिणून टाकाव्या. इमारतीवर मामलेदार गौडे आदिकरून ठेवणें ते बरे शाहणे, कृतकर्मे निरालस्य पाहून ठेऊन गडाची इमारत मुस्तैद करावी.

कितेक किल्ले प्रत्येक पर्वतच आहेत. कितेक पर्वत थोर, त्याचा यखादा कोन उपराची जागा पाहून बांधावा लागतो. त्यास दरवाज्यापुढें अथवा तटाखालें मैदानभूमि लागते, म्हणजे तो गड केवळ भुईकोटादाखल जाहला. आला गनीम त्याणे दरवाज्यास अथवा तटास लागावें यैसें होतें, हे गोष्ट बरी नव्हे. याकरितां ये जातीचा जो किल्ला असेल त्यास आधी सर्व प्रेत्नें दरवाज्यापुढें तटाखालें जितकें मैदान असेल तितका खंदक खोल आणि रुंद खाणून तटाचे पायीं दुसरा पडकोट मजबूद बांधोन त्यावरी भांडीं, जंबुरे ठेऊन, खंदकाचे कडेस येकायेकीं परकी फौज येऊं न पावे यैसें करावें. गडास यावयाचे मार्ग असतील ते सुगम नसावे. सुगम असिले तरी ते मोडून त्यावरी झाडी वाढऊन आणखीकडे परके फौजेस जातां कठीण यैसे मार्ग घालावे. याविरहित बलिकुबलीस चोरवाटा ठेवाव्या. त्या सार्वकाळ चालों देऊं नयेत. समयास तेच दिंडी अथवा दरवाजा याचा राबता करून सामान सर्वदा नेत जावें. गडाची राखण म्हणजे कमरग्याची झाडी, ते झाडी प्रयत्नें वाढवावी. त्यामध्यें एक काठी तेहि तोडूं न द्यावी. बलकुबलीस त्या झाडीमध्यें हशम बंदुखी घालावयाकारणें जागे असों द्यावे. गडासभोंवती नेहमी मेटें असावीं. घेरियाची गस्त करीत जावी. गस्तीचा जाब मेटकरी यांणी देत जावा. गडाखालतें इमारतीचें घर किंवा घराभोंवतें दगडाचें कुसूं सर्वथैव असों न द्यावें.

तैसेंच गडावरी आधी उदक पाहून किल्ला बांधावा. पाणी नाहीं आणि तें स्थळ तों अवश्यक बांधणें प्राप्त जालें तरी आधी खडक फोडून तळीं टाकीं पर्जन्यकाळपर्यंत संपूर्ण गडास पाणी पुरे यैसीं मजबूद बांधावीं. गडावरी झराहि आहे, जैसें तैसें पाणीहि पुरतें, म्हणोन तितक्याचवर निश्चिंती न मानितां उद्योग करावा. किंनिमित्य कीं, जुझामध्यें भांडियांचे आवाजाखालें झरे स्वल्प होतात आणि पाणियाचा खर्च विशेष लागतो, तेव्हा संकट पडतें. याकरितां तैसे जागां जकेरियाचें पाणी म्हणोन दोन च्यार तळीं टाकीं बांधून ठेऊन त्यांतील पाणी खर्च होऊं न द्यावें. गडाचें पाणी बहुत जतन राखावें.

गडावरी राजमंदिराविरहित थोर इमारतीचें घर बांधों नये. राजमंदिरास चुना दाट गचच द्यावा. घरांत कोठे उंदीर विंचू किडा मुंगी राहे यैसी दरज न ठेवावी. घरास कुसूं पाहिजे तें निर्गुंडी आदिकरून झाडांचें पातळ घालावें. गडकरी यांणी राजमंदिर म्हणोन खाली न ठेवावें. सार्वकाळ वस्ती करून धूम्रें करून घर साबूत राहे, जीवजंतु राहों न पावे तें करावें. धणी गडावरी येतात यैसें कळतांच अगोधर दोनच्यार दिवस मामलेदाराने येऊन, खासा उभा राहून, संपूर्ण घर सारऊन, रांगोळी आदिकरून घालऊन, धणी गडावरी येईतों त्याच जागां सदर करून बसत जावें. गडावरी व मार्गामार्गावरी व बाजारांत तटोतट केर कसपट किमपि पडों न द्यावें. ताकीद करून केर गडाखालें न टाकितां जागां जागां जाळोन ते राखहि परसापरसांत टाकऊन घरोघर होतील भाजीपाले ते करवावे.

गडावरी धान्यगृहें आहेत त्यांस अग्नी उंदीर किडा मुंगी वाळवी यांचा उपद्रव न बाधी यैसे भूमीस दगडांची छावणी करून गच्च बांधावी. ज्या किल्ल्यास काळा खडक दरजेविरहित असेल तैसे ठाईं तेलातुपास टाकी करावी. स्वल्प मात्र दरज असेल तरी चुना कमावलेला लाऊन पाझर न फुटे यैसें करावें. गच्चीस घर चांगला यैसी भोंई असेल तेथे गच्चीघर करून थोर थोर काचेचे मर्तबान झोळमाठ मडकीं आणून त्यांस मजबूद बसका करून त्यांत तेल तूप सांठवावें.

दारूखाना घराजवळ घराचे वारियाखालें नसावा सदरेपासून सुमारांत जागा पाहून भोंवतें निर्गुडी आदिकरून झाडाचें दाट कुसूं घालून बांधावा. त्यांत तळघर करावें तळघरांत गच्च करावा त्यांत माच घालून त्या घरीं दारूचे बस्ते मडकीं ठेवावीं. बाण होके आदिकरून मध्यघरांत ठेवावे. सरदी पावों न द्यावी. आठ पंधरा दिवसीं हवालदाराने येऊन दारू बाण होके आदिकरून बाहेर काढून उष्ण देऊन मागती मुद्रा करून ठेवीत जावें. दारूखान्यास नेहमी राखणेस लोक ठेवावे. त्यांणी रात्रदिवस पाहरियाप्रमाणे जागत जावें. परवानगीविरहित आसपास मनुष्य येऊं न द्यावें.

किल्लासंरक्षणाचें कारण तें भांडीं व बंदुखा. याकरितां किल्ल्यास हशम ठेवावे ते बरकंदाज ठेवावे. तटसरनोबत, बारगीर, सदर-सरनोबत, हवालदार यांसहि बंदुखीचा व तोफा गाडावयाचा अभ्यास असावा. संपूर्ण हशमांनी तरवार टांकणी हेंहि हत्यारें बाळगावीं. गड पाहून, गडाचे नाजूक जागे पाहून, त्या त्या

जागां व गडाचे उपराचे जागां त्यासारिखीं भांडीं जंबुरे चरक्या आदिकरून यंत्रें बुरजाबुरजास तटोतट टप्पेमुजरे साधून ठेवावीं. भांडियांचे गाडे, चरक, भांडें पाहून मजबूद लोखंडी कट देऊन त्यावरी ठेवावीं. दारूच्या खलित्या व गंज व भांडें निववावयाच्या कुंच्या, गोळे आदिकरून रेजगारीसुद्धा सुपारीप्रमाणे लहान थोर नदींतील खडे, बाणाच्या पलाखा, जामग्या, तरफा, काने दुरुस्त करावयाचे सामते, आदिकरून हा जिन्नस भांडियाचा भांडियाजवळ हमेशा तयार असावा. दगडी जिन्नस दारूचे अंतरें ठेवावे. होके बाण हेहि पाहरेपाहरेयास तयार असों द्यावे. दरम्यान मुलकांत गमीन कोठें आहे, येईल ते समयीं कोठींतून आणून तयारी करीन म्हणेल, तो मामलेदार नामाकूळ आळसी, तैशास मामला सांगों नये. येक वेळ केली आज्ञा त्याप्रमाणे अंधपरंपरेने निरालस्यपणें उगेंच वर्तावें. तरीच समयीं दगा होत नाहीं, लाऊन दिल्हा काइदा अव्याहत चालतो.

पर्जन्यकाळीं भांडियांस व दरवाज्यांस तेल मेण देऊन भांडियांचे काने मेणाने भरून भांडियांवर भांडियांपुरती आघोडी घालोन जायां होऊं न द्यावीं. वरकडहि जिन्नस सरदी न लागे यैसा अबादान ठेवावा. इमारतीचें काम आदिकरून तयार जालेंच असतें. तथापि तट पाहरे बुरुज कोट कांही जायां होतच आहेत, ते वरचेवरी मजबूद करावे लागतात. तटास झाड वाढतें तें वरचेवर खाणून काढावें. तटाचें व तटाखालील गवत जाळून गड नाहणावा लागतो. या कामास गडोगडास गड पाहून इमारतीचा कारखाना नेहमी ठेऊन मुद्राधारी याचे स्वाधीन करावा. तैसेंच गोलंदाज विश्वासू कबीलदार नेहमी लागा

दुरुस्त मारणार यैसे मर्दाने, गड व गडाचीं भांडीं पाहून जितके लागत असतील तितके ठेवावे.

गडावरील झाडें जीं असतील तीं राखावीं. याविरहित आंबे फणस चिंचा वड पिंपळ आदिकरून थोर वृक्ष व निंबें नारिंगें आदिकरून लहान वृक्ष, तैसेंच पुष्पवृक्ष व वल्ली, किंबहुना प्रयोजक अप्रयोजक जें झाड होत असेल तें गडावरी लावावें, जतन करावें. समयीं तितकेंहि लाकडें तरी प्रयोजनास पडतील.

गडोगडीं ब्राह्मण ज्योतिषी वैदिक व्युत्पन्न, तैसेच रसायने वैद्य व झाडपाल्याचे वैद्य व शस्त्रवैद्य, पंचाक्षरी व जखमा बांधणार, लोहार सुनार पाथरवट चांभार यांच्याहि, गड पाहून, येक येक दोन दोन असाम्या संग्रहीं ठेवाव्या. लहानशा गडास या लोकांचीं नित्य कामें पडतात यैसें नाहीं. याकरितां त्या त्या कामाचीं हत्यारें त्याजवळ तयार असों द्यावीं. जे समयीं काम पडेल ते समयीं काम करितील; नाहीं ते समयीं आदिकरून तहसील तलब चाकरी घ्यावी. रिकामे न ठेवावे. गडोगडीं तनखा, दास्तान, इस्ताद आदिकरून गडाच्या प्रयोजनाची वस्तुजात गडास संग्रह करून ठेवावेंच लागतें. याविरहित गड म्हणजे आपले कार्याचे नव्हेत, ऐसें बरें समजोन आधी लिहिलेप्रमाणे गडाची उस्तवारी करावी.

## प्रकरण ९

ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र. याकरितां आरमार अवश्यमेव करावें. मध्यम आकाराच्या गुराबा शस्त्रास्त्रें व शूर माणसें यांनी उत्तम सजवाव्या. मोठीं जहाजें बांधावयाचें प्रयोजन नाही.— आरमारास तनखा मुलकी कारभारांतून नेमून द्यावा. पैदास्तीवर नेमणूक करून देऊं नये. तसें केल्यास साहुकारी बुडेल व गरिबांस त्रास होईल. सावकारी वाढवावी.— आरमाराने हमेशा दर्यांत फिरून गनिमाचा बंदोबस्त करावा.—दर्यांत कोणी सावकारांचे वाटेस जाऊं नये. गनिमाच्या मुलकाचीं गैरकौली सावकारांचीं तरांडीं बंदरास आणून त्यांचें सर्व प्रकारें समाधान करावें.—गनिमाचे मुलकांतील सावकारी तरांडीं दर्यांत असल्यास कस्त करून घ्यावीं व त्यांतील माल जप्त करावा.—आरमाराची गनिमाशीं गाठ पडून झुंज मांडलें तर गनीम दमानी घालून झुजावें. आपण दमानी पडलों तर गनिमाशीं गाठ न घालतां आपल्या जंजिऱ्याच्या आश्रयास यावें. आपणास राखून गनीम घ्यावा. गनीम आपण जेर झालों असें दाखवून दगा करूं पाहतो; तेव्हा त्याचा विश्वास न मानितां दुरूनच कौल द्यावा.—आरमाराची छावणी करणें ती उघड्या मानीं न करावी; तर प्रतिवर्षीं नूतन बंदरीं अथवा आडखाडीस खाडींत करावी.—आरमारास मोठमोठीं लाकडें लागतात, तीं राज्यांतील अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत त्यांचीं हुजूरचे परवानगीने तोडून न्यावीं. रयतांनी लाविलेलीं आंबे फणस इत्यादि झाडें लाकडाकरितां तोडून रयतेला दुःख देऊं नये.

आरमार म्हणजे स्वतंत्र येक राज्यांगच आहे. जैसें ज्यास अश्वबळ त्याची पृथ्वी प्रजा आहे, तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र. याकरितां आरमार अवश्यमेव करावें. चालीच्या गुराबा बहुत थोर ना बहुत लहान, ऐशा मध्यम रीतीने सजाव्या. तैसींच गलबतें करावीं. थोर बरसे फरगात जे वाऱ्याविणें प्रयोजनाचेच नव्हेत यैसे करावयाचें प्रयोजनच नाहीं. कदाचित् येक दोन सलाबतीमुळें केले तरी जें आरमार करावें त्यावरी मर्दाने मारक माणूस, भांडीं जंबुरे बंदुखा दारूगोळा होके आदिकरून आरमारी प्रयोजनसामान येथेष्ट बरें संजुतें करावें. त्याचे प्रत्यक प्रत्यक सुभे करावे. दर सुभेयास पांच गुराबा, पंधरा गलबतें करून द्यावीं. इतक्यांस एक सरसुभा करावा, त्याचे आज्ञेंत सर्वांनी वर्तावें.

आरमारास तनखा मुलुकांत नेमून द्यावा. पैदास्तीवरी नेमणूक सहसा न करावी. पैदास्तीचे नेमणुकेमुळें सावकारांस उपद्रव होऊन सावकारी बुडते. बंदरें राहिलीं पाहिजेत. प्रयोजनिक वस्त ते परस्थळीहून आणावी तेव्हा येते, यैसें जाल्यामध्यें राज्याचा श्रम काय उरला? तैसेंच जकाती आदिकरून हसीलहि बुडाला. लुटीमुळें गोरगरिबांचा सत्यानास होऊन अपरिमित पापहि वाढलें. आरमारकरीहि बेलगाम होऊन मनःपूत वर्तों लागले. तरी नेहमी तनखा मुलकांतून देणें घडतें, तरी इतका अनर्गल प्रसंग न होता. कदाचित् आरमारास सारा नेहमी तनखा कैसा अनुकूल पडतो म्हणावें तरी जितका अनुकूल पडेल तितकेंच आरमार सजावें. सावकारी वाढवावी. सावकारीमुळें जकातीचा हसील होईल. तितक्यावरी कितेक आरमार करूं येईल. या रीतीने आरमार सजीत सजीत सजावें.

आरमारकरी यांणी हमेशा दर्यांत फिरून गनीम राखावा. जंजिरियाचें सामान व दारू वरचेवरी पाववीत जावी. येविसीं जंजिरेकरी याचा बोभाट हुजूर येऊं न द्यावा. सार्वकाळ दर्यावर्दी गनिमाचे खबरींत राहून गनिमाचा मुल्क मारावा. हवी पाळती घालोन गनिमाचे स्थळाचे लाग करावे.

दर्यांत कोण्ही सावकारांचे वाटे जाऊं नये. त्यांस कोण्हाचा उपद्रव लागत असेल तरी तो परिहार करावा. गनिमाचे मुलुकाचीं व विदेशींचीं गैरकौली यैसे सावकारांचीं तरांडीं येतां जातां आलीं, तरी तीं परभारें जाऊं न द्यावीं. अभय देऊन दिलासा करून, त्यांचे दसोडीस हात न लावितां, बंदराबंदरास घेऊन यावें. बहुता प्रकारें मुल्कगिरीचे कारभारी यांणी जाऊन त्यांचें समाधान करावें. लांकडें पाणी घेतील तें घेऊं द्यावें. नारळाचें शाहळें आदिकरून जें त्यास पाहिजे तो जिन्नस असेल तो विकत अनुकूल करून द्यावा. याविरहित आणखी खरेदी फरोख्त आत्मसंतोषें करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करू द्यावा. थोर मनुष्य सावकार कोण्ही असला तरी त्याचे योग्यतेनुरूप दिवाणचे तर्फेने त्याची थोडीबहुत मेहमानी करावी. तो खर्च दिवाणांतून मजरा घ्यावा. कोण्हे येक प्रकारें त्या परकी सावकारास सौख्य दिसे, माया लागे, राज्यांत आमदरफ्ती करीत, ऐसें करावें. गनिमाचे मुलकांतील सावकारी तरांडीं दर्यांत असल्या कस्त करून घ्यावीं, धरून बंदरास आणावीं. मालांत काडीइतकी तसनस न करितां तमाम माल जप्त करून महालचे कारकुनांनी व आरमारकरी यांणी हुजूर लेहून पाठवावें. आज्ञा होईल तैसी वर्तणूक करावी.

आरमारास व गनिमास गांठ पडोन जूझ मांडलें तरी सर्वांनी कस्त करून येक जमावें. गनीम दमानी घालून जुंझावें. वारियाचे बळें गनीम दमानी न येतां आपण दमानी पडलों, आपलें गलबत वारियावरी न चले यैसें जाहलें, तरी कैसेंहि आपलें बळ असो, तऱ्ही गनिमासी गांठ न घालितां, गांठ तोडीत तोडीत आपले जंजिरियाचे आश्रयास यावें. तरांडियांस व लोकांस सर्वथा दगा होऊं देऊं नये. आपणास राखून गनीम घ्यावा. गनीम दमाने पडोन हारीस आला, जेर जाला, तरी येकायकीं उडी घालों नये. दुरून चौगीर्द घेरून भांडियांचा मार देत असावें. दगेखोर गनीम आपण जेर जालों यैसें जाणून दगाबाजीने कौल घेतो, म्हणोन जवळ बोलाऊं नये. आपले जवळ बोलाविल्याने पायाला आगी टाकून तरांडें जाया करितो. याकरितां त्याचा विश्वास न मानितां, कौलास आला तरी दुरूनच कौल देऊन, त्याचेच बतेल्यावरून सरदारदेखील लोक आपणाजवळ आणावे. मग त्याचे तरांडेयावरी आपले लोक चढवावे. नाहीं तरी मालशांतीची तमा न धरितां भांडियाचेच माराखालें तरांडें फोडून टाकून सलाबत पाडावी.

आरमारची छावणी करणें ते दर्या तुफान होणार तों आठ-पंधरा दिवस अगोधर करावी. तेहि प्रतिवर्षीं येकाच बंदरीं अथवा हरयक जंजिरियाखालीं किंवा उघड्या मानीं सर्वथा न करावी. प्रतिवर्षीं यक्याच बंदरीं छावणी केल्याने, आरमारचे लोक बारगल, ताकीद केली तरी कांही येक मुलकास उपसर्ग होतच आहे तो येकाच मुलकास होणार, यैसें होऊं न द्यावें. उघड्या मानीं आरमारची छावणी केली तरी छावणी करणें तें आरमार

धड्यावर वोढावें लागतें. वरती छावणी, तशामध्यें दंगेखोर गनीम चोरीछपीने तत्काळ अग्नीचा दगा करणार, यैसेंहि होऊं न द्यावें. केवळ किल्ल्याचेच बंदरांत छावणी करावी, तर आरमारचें मनुष्य बहुवस, प्रायशा अविंध आणि उन्मत्त, यखादे बोलीचालीमुळें कचकलागत होऊन लोक जायां होणार! कदाचित् परस्परें संकेतें स्थळांत फितवा होऊं शके! हें बरें नव्हे. याकरितां आरमारची छावणी करणें तें प्रतिवर्षीं नूतन बंदरीं, ज्या बंदरीं मोहारी किल्ला, किल्ल्याचे दहशतीने गनीम खाडी उतरों न शके, अथवा आडखाडी, यैसे खाडींत आरमारची छावणी करावी. तेंहि सारें आरमार येकाच जागे न ठेवावें. जागा जागा छावणीस ठेवावें. रात्रीस खाडींतील गस्त व खुष्कीची गस्त आरमारासभोंवती करवीत जावी. सुबेदारानी आपला कबिला देखील दोन महिने त्याच जागां ठेऊन, आरमारची रातबिरात चाकरी करून, लागेल सामान तेविषयीं हुजूर लेहून विल्हे करून घ्यावी. मुलकांत आवाडाय सर्वथा होऊं न द्यावी.

आरमारास तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लाकूड असावें लागतें. तें आपले राज्यांत अरण्यामध्यें सागवानादि वृक्ष आहेत त्यांचें जें अनुकूल पडेल तें हुजूर लेहून हुजूरचे परवानगीने तोडून न्यावें. याविरहित जें लागेल तें परमुलकीहून खरेदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे फणस आदिकरून हेहि लाकडें आरमारचे प्रयोजनाचीं, परंतु त्यांस हात लाऊं न द्यावा. काये म्हणोन कीं, हीं झाडें वर्षा दों वर्षांनी होतात यैसें नाहीं. रयतेने हीं झाडें लाऊन लेंकरांसारखीं बहुत काळ जतन करून वाढविलीं. तीं झाडें तोडिलियावरी त्यांचे दुःखास

पारावार काये ? येकास दुःख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारासहित स्वल्पकालेंच बुडोन नाहींसेंच होतें; किंबहुना धण्याचेच पदरीं प्रजापीडणाचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावें हानिहि होते. याकरितां हे गोष्ट सर्वथा होऊं न द्यावी. कदाचित् यखादें झाड जें बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असेल, तरी त्याचे धण्यास राजी करून, द्रव्य देऊन, त्याच्या संतोषें तोडून न्यावें. बलात्कार सर्वथा न करावा.

## लेखनालंकार

याप्रमाणे हुजरात, गड किल्ले आदिकरून परम सावधतेने वर्तत, मातुश्रीसाहेब यांचे सेवेसी कोण्हेहि अर्थें अंतर न पडे तुम्ही केले सेवेचा मुजरा होय आणि या दिग्मंडलामध्यें यशास तुम्ही पात्र होऊन स्वामींनी जो तुम्हावरी संपूर्ण यख्तियार दिल्हा आहे, आणि स्वामींची जे अनुपम दया तुम्हांवरी आहे, ते दिनप्रतिदिनीं अभिवृद्धीस पावे ते गोष्टी करणें. तों योजिला संपूर्ण उद्योग सिद्धीस पावऊन सत्वरीच स्वामीचें आगमन ते प्रांतें होत आहे. तदोत्तर तुमच्या विचारें आणखीहि कितेक नाजूक धंद्याचे नेम परंपरेनें राज्याभिवृद्धीस उपयुक्त आणि येहलोक-परलोक-साधन, ज्यांत संपूर्ण कीर्ति, ते सर्वहि यथान्यायें करून दिल्हे जातील. जाणिजे. लेखनालंकार.

• • •

## टीपा

१.१ स्वस्ति. शुभसूचक अव्यय सं. राज्याभिषेक शके. ज्येष्ठ शु. १३ शुक्रवार शालिवाहन शके १५९६, ता. ६ जून इ. स. १६७४ या दिवशी शिवाजी राजे यांना राज्याभिषेक झाला; त्या दिवसापासून त्यांनी नवी कालगणना सुरू करून त्याला 'राज्याभिषेक शक' असे नाव दिले. स्वतःचे सामर्थ्य आणि अधिकार यांच्या निदर्शक अशा ज्या स्वयंप्रज्ञतेच्या गोष्टी शिवप्रभूंनी केल्या, त्यापैकी नूतन शकाची स्थापना ही होय. यामुळे भारतीय परंपरेत युधिष्ठिर विक्रम शालिवाहनादि जे शतकर्ते राजे झाले त्यात राजांचे नाव सामील होऊन अजरामर झाले. पुढे पेशवे आदिकरून मराठी राज्याच्या विस्तारकांनी हा शक वापरात ठेवला नाही, त्यामुळे तो मागे पडला. मन्मथनाम संवत्सरे. भारतीय ज्योतिषात साठ वर्षांचे कालचक्र मानिले असून त्यापैकी प्रत्येक वर्षाला विशिष्ट नाव दिलेले आहे : प्रभव, विभव, शुक्ल इ. यापैकी मन्मथ हे २९ वे होय.

१.२ चतुर्थीला गुरुवार येत नाही, शनवार येतो. वार खरा मानायचा झाल्यास द्वितीया येईल. पहा उ. ३९. क्षत्रियकुलावतंस. छत्रपतींचे बिरुद, त्यांच्या नावे निघणाऱ्या राजकीय पत्रव्यवहारात वापरले जाई.

१.३ शंभुछत्रपति. पहा उ. १०, १३, १४. समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि. छत्रपतींकडून निघणाऱ्या अधिकृत पत्रांमध्ये सर्व अष्टप्रधानांना हे उपपद लावीत असत. त्यात अमात्यांना इतरांहून अधिक गौरविले आहे अशातला भाग नाही.

१.४ पंडित हे 'पंत' या मराठीचे सं. रूप. पूर्वी ब्राह्मण गृहस्थ व अधिकारी यांना पंत हे उपपद लावण्यात येई. संस्कृतप्रचुर प्रौढ भाषा लिहिण्याकडे त्या काळात विशेष कल होता, या प्रास्ताविक भागाच्या लेखकाचा तर विशेषच

होता. अमात्य. अष्टप्रधानांपैकी क्रमांकाने दुसरा. पंतप्रधान, पंतअमात्य, पंडितराव, सेनापती, मंत्री, सुमंत, सचिव आणि न्यायाधीश ही शिवछत्रपतींच्या अष्टप्रधानांची पदे. हुकुमतपन्हा. हुकूमत-सत्ता, राजसत्ता; पनाह--संरक्षक. राजसत्तेचा संरक्षक, सत्ताधीश.

१.५ **स्वामी.** पहा उ. १२, १४, ३८.

१.७ **विज्वर.** दुर्धर, संकटमय. हा शब्द त्यावेळी वापरात होता. विशेषण ज्वरः ( पीडा, त्रास ) यत्र.

१ ८ **कुंठितबुद्धि व हतधैर्य.** बहुव्रीही समासात्मक संस्कृतप्रचुर रचना करण्याची या लेखकाला बरीच हौस दिसते. असेच शब्द पुढे पुष्कळदा तो वापरतो. पहा, २.१६; ३.४.

१.१० **नाम्ना** याचा अर्थ नावलौकिक, कीर्ती, असा दिला जातो. पण तो बरोबर नसून मोठा हुद्दा, अधिकारपद असा इथे अर्थ दिसतो. वचन आणि संदर्भ यावरून हे स्पष्ट होते. सं. 'नामन्' याची तृतीया विभक्ती, अशी याची व्युत्पत्ती सांगितली जाते. पण 'नम' धातूचे प्रयोजक नाम 'नामन' (नमविणे, इतरांवर अधिकार गाजविणे) यापासून हा आला असावा. सं. तून मराठीत शब्द येताना पुष्कळदा लिंगात बदल होतो.

१.११ **परिच्छिन्न.** संपूर्ण, अजीबात, एकदम.

१.१३, १४ **येक राज्य, येक मर्यादा.** राज्यातील एकोपा व शिस्त कायम राहिली पाहिजे याविषयीचा कटाक्ष लेखकाने इथे व्यक्त केला आहे. यावरून हा मजकूर शाहूच्या सुटकेनंतर छत्रपतीच्या राज्याची दोन शकले झाली त्यापूर्वी लिहिला असावा असे दिसते. पहा उ. ५०, ५२.

२.१ हा लेखक पुढील राजनीती भागाचे शब्दात, अर्थात पुष्कळदा अनुकरण करतो. ही ओळ १५.२ शी ताडून पहा.

२.४ **कृतकर्मे.** कर्तृत्ववान, ज्यांनी थोर कार्ये पार पाडली आहेत असे. त्या काळी हा शब्द पुष्कळ प्रचलित होता.

२.५ **मनोधारण करावें.** अनुकरण. पहा १४.१४.

२.८ **क्षुद्रोपद्रव.** पहा पुढे ६. १६. अनुप्रासाच्या हौसेमुळे हा शब्द बनविलेला दिसतो. 'एकेक प्रसंग अनर्थाचेंच कारण' असे हा पुढे म्हणतो. मग उपद्रव क्षुद्र कसा ?

२.१२ अवरंगजबासारिखा. मराठ्यांचे राज्य आणि विजापूर भागानगर येथील शियापंथी मुसलमानी राज्ये नष्ट करून सबंध दक्षिण आपल्या साम्राज्यात सामील करण्याच्या उद्देशाने औरंगजेब इ. स. १६८२ च्या मार्च महिन्यात दक्षिणेत आला. तो पुढे एकसारखी पंचवीस वर्षे दक्षिणेतच होता. हा सर्व काळ महा अनर्थ माजवून नगरजवळ भिंगार येथे २१ फे. १७०७ रोजी तो मरण पावला.

२.१५ निर्फळ. निष्फळ याचे असे रूप त्या काळी प्रचलित होते.

२.१७ चौपन्न पादशाहीचा धणी. खूप मोठेपण दर्शविण्याकरिता चौपन्न ही बहुसंख्या घातलेली दिसते. यापेक्षा तीत अधिक मतलब नसावा. जसे, 'बावन्न बिरुदांचा धणी' इ०. चौपन्न पादशाह्या होतील इतक्या मोठ्या साम्राज्याचा धणी, असा अर्थ. राजवाडे खंड ८ ले. ४९ (बावडा दप्तर भाग १, ले. ४२) यात दिलेल्या राजांच्या यादीशी याचा काही संबंध असेल हे शक्य वाटत नाही कारण तेथे औरंगजेब धरून ५३ आहेत.

२.१९ 'दिल्लीश्वरो वा...' हे वचन पुढील श्लोकातले आहे.

दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान्पूरयितुं समर्थः।
अन्यैर्नृपालैर्बहु दीयमानं शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात् ॥

हा जगन्नाथपंडिताच्या नावावर आहे. पंडितराज दिल्लीच्या बादशहाच्या (अकबर किंवा शहाजहान ?) पदरी होते. तेथून कोणा एका राजाने आपल्याकडे आश्रयार्थ पाचारण केले असता त्यांनी हे श्लोकात्मक उत्तर त्याला पाठविले. अर्थ: "मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ असा एक दिल्ली बादशहा किंवा दुसरा परमेश्वर; इतर राजांनी आपल्याकडून पुष्कळ जरी दिले तरी ते मीठभाजीपुरतेच!" हा श्लोक वास्तविक गौरवात्मक आहे. प्रस्तुत लेखक संस्कृतप्रचुर प्रौढ भाषा लिहिणारा खरा, पण त्याला तारतम्य जरा कमी असावे. औरंगजेबाच्या शक्तिवैभवाचे वर वर्णन केले ते ठीक. पण औदार्ययुक्त सामर्थ्याचे द्योतक सुभाषित त्याच्या बाबतीत वापरणे हा अप्रयोजकपणाच.

२.२०–२४ भाषा कशी अतिरिक्त संस्कृत शब्दांनी लदलेली आहे! पुढे ३.३–१० यात असाच प्रकार आहे.

३.१,२ एक सुभाषित. "मुनि आणि योगीसुद्धा ज्या गतीला जाऊं शकत नाहीत, त्या गतीला स्वामिकार्यात मृत्यु पतकरणारे सेवक जातात."

३.६ देशदुर्गें. हा सामासिक शब्द या लेखकाचा आवडता दिसतो. प्र. १,२ मध्ये हा अनेकदा येतो. प्र. ८ हे वास्तविक याच विषयावर असून त्यात देशदुर्गे शब्द येत नाही. गडकोट किंवा किल्ला हेच शब्द तिथे सररास वापरले आहेत. दुर्ग याचे नपुंसकलिंग सं. प्रमाणे.

३.८ स्तोमें. लहान लहान सत्ताकेंद्रे.

३.९ शामल. सिद्दी. हे मुळात आफ्रिकेतील हबसाणातून इकडे आले. काळेरोम असल्यामुळे मराठे यांचा उल्लेख 'शामल' या नावाने करीत. दंडाराजपुरी नजीकच्या बेटावर बळकट जलदुर्ग बांधून त्याच्या आश्रयाने यांनी आपले संस्थान वाढविले आणि सागरी सत्ता मिळविली. हे आपणास मोगलांचे अंकित म्हणवीत. शिवाजी महाराजांचे दर्यावर्दी व्यापाराकडे आणि आरमारी सत्तेकडे लक्ष फार होते. त्यांच्या मनातून खरोखर सिद्दीला 'निर्नाम' करायचे होते. पण त्यांच्या अनेक उद्योगांमुळे एका सलग काळात त्याचा समाचार घेण्याचे जमले नाही. अखेरपर्यंत हा काटा सलतच राहिला.

३.१० उद्वस. उध्वस्त या सं. चे मराठी रूप.

३.१३ प्रतिपच्चंद्र....अनुकरण, पहा ३२.१९.

३.१५ संभावित. मूळ सं. अर्थ इथे अभिप्रेत आहे. श्रेष्ठ योग्यतेचा, सन्मान्य.

३.२१ स्वास्ता. स्वास्थ्य यापासून लिंगात बदल होऊन. उत्पन्न, निर्वाहाचे साधन.

३.२२ पंधरा वर्षांचें वय. महाराजांनी इ. स. १६४५ साली रोहिडेश्वरापुढे हिंदवी स्वराज्य स्थापन करण्याची शपथ घेतली. तो प्रसंग लक्ष्य आहे अशी कल्पना केल्यास स. १६३० मध्ये जन्म आणि १५ व्या वर्षी उद्योगास सुरवात, हे सुरेख जमते आणि प्रमाणित जन्मतिथीचा पाठपुरावा होतो.

४.१–३ "आयुष्य आपल्या नाजूक जागांचे रक्षण करते; आयुष्यच अन्न देते. (नेमलेले आयुष्य असेल तोपर्यंत आपल्याला प्राणघातक इजा होत नाही व आपली उपासमार होत नाही.) म्हणून अर्जुनाचा अभिप्राय (पाठांतरीं, दोन प्रतिज्ञा) असा आहे की माणसाने (अन्नासाठी) लाचारी पत्करू नये आणि (युद्धातून) पलायन करू नये." पूर्वार्धाचा अर्थ निराळ्या प्रकारे दिलेला

आढळतो तो बरोबर नाही. 'रक्षंति' हा पाठ बरोबर नाही, पण तो स्वीकारून अर्थ तदनुसार दिला नाही, असेही आढळते.

**४.६ स्वांगें.** हा शब्द मार्मिक आहे. अत्यंत बिकट व धाडसाचे काम असेल तेथे सर्वांआधी आपण पुढे व्हायचे असा महाराजांचा स्वभाव होता. अशाच स्वामीला स्वामिकार्यांत उत्साहाने प्राण टाकणारे बाजी-तानाजीसारखे सेवक मिळतात.

**४.७ नूतनच सेवक.** उ. ५०, ६२ पहा. **नवाजून.** पालनपोषण करून, उत्कर्षास चढवून. हा फा. नवाझ (पोशिंदा) यापासून आलेला दिसतो.

**४.१२, १३ मोगल येकेक सुभा लक्ष लक्ष स्वारांचा.** ही अतिशयोक्ती आहे, पण कदाचित सभासदाचे विधान मनात वागत असेल. शाइस्तेखानास शिवाजीवर पाठवायचा विचार करताना औरंगजेब "कुल वजीर उमराव बोलावून आणून एक लाख सुभा फौज घोडा राजियावर दक्षणेस रवाना करावा" म्हणून विचार करितो. (सभासद ३१).

**४.१५ पाळेगार.** कर्नाटक प्रांतातील सरंजामी युगातील स्वतंत्रपणे वागणारे देशनायक; बंडखोर सरदार.

**४.१६–१७** या नावांच्या माळिकेला पद्धत आहे. **वरघाटे** म्हणजे घाटावरील; तेथपर्यंतचे सगळे घाटमाथ्याखालचे, म्हणजे कोकणच्या बाजूचे. चंदरराव जावळीचे, सुरवे शृंगारपूरचे, शिर्के त्यांचे कारभारी, दळवी तिकडचेच. सावंत कुडाळचे. भालेरावाचा पत्ता लागला नाही. **कांटक.** याचा अर्थ निरनिराळ्या रीतीने देण्यात येतो. हस्तलिखितात का वर अनुस्वार आहे हे लक्षात घेता कंटकस्वरूपी, काट्याप्रमाणे सलणारे, असा अर्थ असावा किंवा दरवडेखोर, 'दावे दरवडे करणारे' (३७.१) म. श. को. **सजुते.** मूळ शब्द संजीदा फा. त्यावरून संजुदा, संजुता, सजुता अशी रूपे मराठीत झाली. जय्यत, सर्व सामग्रीनिशी तयार.

**४.१८ सामानपूर.** असेच सदयपूर, खजानपूर इत्यादि शब्द लक्षात ठेवावे. हा एक प्रकारचा देशी बहुव्रीही समास. सामान (युद्धसामग्री) पुरते आहे ज्याच्यापाशी असा.

**४.१९ ते ५.३** शिवरायाच्या पराक्रमांचे हे अनामरूप वर्णन मोठे सुंदर आहे. यात महाराजांचे एकंदर १३ प्रकारचे पराक्रम वर्णिले आहेत. प्रत्येक प्रकाराची

अनेक सनामरूप उदाहरणे आढळतील. इथे फक्त एकदोन उदाहरणे देण्याचा प्रयत्न केला आहे. (१) तुंबळ युद्ध. ही तर अनेक केली. आणि त्यात शत्रुपक्षाचे कित्येक सेनानी रणास आणिले (ठार केले.) स. १६५६ मध्ये खळद बेलसर येथे विजापूरचा सरदार फत्तेखान याच्याशी मोठी लढाई झाली व तीत मुसेखान मारला गेला. मुधोळवर चालून जाऊन बाजी घोरपडे यास मारले (१६६४). १६७२ मध्ये झालेल्या साल्हेरच्या युद्धात बहलोलखान कामास आला (यात प्रत्यक्ष राजे नव्हते). (२) छापे. जुन्नर व नगरवर छापे घातले (१६५७). (३) परस्परें कलह. शहाजादा मुअझ्झम औरंगाबादेस असता त्याच्या असंतोषाचे भांडवल करून त्याच्यात व औरंगजेबात कलह निर्माण केला (१६७०). (४) मित्रभेद. शृंगारपूरचे सुरवे यांचे कारभारी शिर्के यांच्याशी भेद करून शृंगारपूर घेतले. (१६६१). (५) डेरियांत सिरोन मारामारी. शाइस्तेखानाचा प्रसंग सर्वांस माहीत आहे. (६) येकांगी. एकट्याशी सामना. "खासा खान (अफझलखान) राजियाने एकांगी करून मारिला." सभासद (१६५९.) (७) स्नेह. गोवळ-कोंड्याच्या कुतुबशहाशी मैत्री जोडली (१६७७). दक्षिणेस चंदीचा किल्ला घेतेवेळी फ्रेंचांशी मैत्री जोडली. (८) दर्शनास गेले. औरंगजेबाच्या भेटीसाठी दक्षिणेतून उत्तरेकडे गेले (१६६६). (९) आपले दर्शनास आणिलें. इंग्रजांची राजापूर येथील वखार लुटल्यानंतर त्यांच्या वकिलाला आपल्याकडे येण्यास भाग पाडले (१६७४ सुमार). (१०) परस्परें दगे करविले? (११) इतर प्रयत्नें... आकळिले. जावळीच्या चंद्ररावाच्या राज्यात प्रतापगड किल्ला बांधला. दंडाराजपुरीच्या उरावर पद्मदुर्ग बांधून इतर उपायांना दाद न देणाऱ्या सिद्दीला दहशत उत्पन्न केली. (१२) नूतन जलदुर्गें निर्माण. सिंधुदुर्ग व खांदेरी हे जलदुर्ग बांधून मुंबईच्या व राजापूरच्या इंग्रजांना धाकात ठेवले. (१३) नौकामार्गें प्रवेशले. स. १६६५ मध्ये दक्षिण कानडा जिल्ह्यातील बसनूर बंदरावर आरमारी स्वारी केली.

५.४,५ साल्हेरी अहिवंत. साल्हेर हा सह्याद्रीच्या दक्षिणोत्तर घाटमाथ्या-मधील उत्तरेकडील जवळ जवळ शेवटचा किल्ला. (उंची ५२९५ फूट.) बागलाण प्रांत हा दक्षिणच्या पठारावर येण्यासाठी प्रवेशद्वारासारखा असल्यामुळे त्यातील साल्हेर मुल्हेर या किल्ल्यांचे पूर्वीच्या काळात सांग्रामिक दृष्ट्या फार महत्त्व होते. अहिवंत हा किल्ला बागलाणच्या दक्षिणेस सह्याद्रीपासून पूर्वेकडे फुटलेली जी चांदवड डोंगरांची रांग आहे, त्यात सप्तशृंगच्या पश्चिमेस सुमारे ४/५ मैल आहे.

उंची ४०१४ फूट. राजांच्या राज्याची उत्तर सीमा दर्शवणारा म्हणून साल्हेरीला जे महत्त्व आहे, तसे अहिवंताला नाही. सभासदानेदेखील राज्यविस्तार सांगताना 'सालेर किल्ल्यापासून' अशीच सुरवात केली आहे. अहिवंताचा तिथे उल्लेख नाही. प्रस्तुत लेखकाने मात्र 'सालेरी अहिवंतापासून' हा जणू एक मंत्रच केला आहे. चंदी कावेरी. चंदी उर्फ जिंजी हा अतिशय बिकट दुर्भेद्य किल्ला पूर्वकिनाऱ्यावरील (फ्रेंचांच्या) सुप्रसिद्ध पांडिचरी (फुलचरी) शहरापासून पश्चिमेस सुमारे ४० मैल आहे. राजांनी १६७७ साली हा मसलतीने जिंकला. कावेरी नदी इथून दक्षिणेस सुमारे १०० मैल आहे. 'सालेरी अहिवंतापासून चंदी कावेरी तीरापर्यंत निष्कंटक राज्य' या विधानात अतिशयोक्ती खूपच आहे, पण शिवप्रभूंच्या वर्णनात ती खपून जाण्याजोगी आहे.

५.९ शहाण्णव कुळीचे मराठे. क्षत्रिय मराठ्यांच्या शहाण्णव कुळी म्हणजे घराणी (आडनावे) पूर्वीपासून चालत आली असून संस्कृत ग्रंथात वर्णिली आहेत. उद्धार केला म्ह० प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, भाग १८, 'मराठे' हा लेख पहा.

५.११ षट्कर्मे अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा। दानं प्रतिग्रहश्चैव षड्विधं ब्रह्मलक्षणम् ॥ अध्ययन, अध्यापन, स्वतः यज्ञ करणे, दुसऱ्याकडून यज्ञ करवणे, दान देणे व घेणे दान ही सहा ब्राह्मणांची कर्मे. या तीन जोड्यातली पहिली इतर वर्णांनादेखील सांगितली आहेत म्हणूनच वर्णविभागें 'वर्णधर्माने लावून दिलेल्या व्यवस्थेनुसार' असे पुढे म्हटले आहे.

५.१३, १४ एकरूप अव्याहत. सर्वांस सारखे, एकतंत्री आणि ज्याला कुठेही बाध नाही असे जबरदस्त. शिवराज्याचे हे इथे सांगितलेले विशेष मार्मिक व यथातथ्य भासतात.

## प्रकरण २

या प्र. च्या अभ्यासासाठी उपोद्घाताचे विभाग १ व ४ आणि विभाग ७ मधील 'वाङ्मयीन समालोचन—प्रास्ताविक भाग' हा पोटविभाग लक्षपूर्वक वाचावेत. त्यातील विवेचनाची होता होई तो पुनरुक्ती न करिता इथे भाषा-शब्द-साम्य आणि काही अस्पष्ट गोलमाल विधाने दाखवून देऊन, शेवटी शब्दांचे स्पष्टीकरण देण्याचे योजिले आहे.

### भाषा-शब्द-साम्य

प्रथम या प्रकरणातील संदर्भ, नंतर या प्र. तील शब्द वा मजकूर आणि त्यानंतर ज्याच्याशी साम्य आहे त्या स्थळाचा संदर्भ, याप्रमाणे क्रमव्यवस्था पुढील उदाहरणात आहे. एक उदाहरण संपले की त्याच्यापुढे उभी रेघ दिली आहे.

६.३ रणासी आणिले ४.१९ । हतदर्प...पराङ्मुख २.१६ । ६.८ विज्वर १.७ । ६.९ देशदुर्गें ३.६; ३१.१६, २१ इ. । ६.१४ विस्खलित ३.१८ । ६.१६ क्षुद्रोपद्रवांमुळे २.८ । ७.२ राजसत्ताच अवघी उडोन गेली १.१४ व ३.१० । ७.२३ समाधानें केलीं १.६; २.५ । ७.२३ नूतनच सेवक कार्यकर्ते नवाजिले ४.७ । ७.२४ सकलांचीं चित्तें हातीं घेऊन २.५ । ८.१ राजकार्यास प्रवर्तविले २.७ । पुढे ८.६–१० हे हुजरात सजविल्याचे वर्णन पुढील पृ. २०,२१ वरील वाक्यखंड आणि शब्द घेऊन तयार केले आहे. ८.६––२०.१३, १४ । ८.७––२०.२४ । ८.७,८––२१.२ याप्रमाणे साम्यें आहेत. १०.२ स्तोमें बद्धमूल ३.८.९ । १०.४ साल्हेरी अहिवंतापासून चंजी कावेरीतीर पर्यंत ५.४,५.

या साम्यासंबंधी पर्यायी अनुमाने दोन : १. एकाच लेखकाच्या लेखनात स्वाभाविकपणे जे साम्य येते तशापैकीच हे होय; २. हे साम्य अनुकरणजन्य असून या भागाचा लेखक प्र. १ आणि प्र. ३ ते ९ यांच्या लेखकांहून भिन्न असावा. प्र. १. च्या पूर्वार्धात पृ. १ ते ३ मध्ये जो आशय आहे, साधारणपणे तोच, परंतु निराळ्या रीतीने प्र. २ च्या पूर्वार्धात सांगितलेला आढळतो, यावरून दुसरे अनुमान अधिक संभवनीय वाटते. एकच लेखक आपल्या आशयाची पुनरुक्ती इतकी लागोपाठ करणार नाही. भाषासाम्यही इतक्या प्रमाणात येणार नाही.

### संदिग्ध गोलमाल विधाने

यासंबंधाने पुष्कळ विवेचन उपोद्घातात केले आहे. इथे पुरवणीदाखल आणखी काही विधाने नमूद करावयाची आहेत. इतर कित्येक संपादकांनी यातल्या काही विधानातून काही अर्थ काढण्याचे प्रयत्न केले आहेत. पण मुख्य प्रश्न असा आहे की उद्दिष्ट अर्थ स्पष्टपणे लक्षात उतरेल अशी विधाने करायला लेखकाला अडचण कोणती होती? प्रत्यक्ष शब्दार्थ आणि मागचा पुढचा संदर्भ

यांचा त्याग करून, कल्पनाशक्तीला कष्ट देऊन काही तरी अर्थ काढावा, तरी-देखील एकीकडे जोडायला जावे तो दुसरीकडे फाटावे, अशी स्थिती व्हावी! त्यापेक्षा आम्ही जो काढला आहे तो निष्कर्ष अंतिम शहाणपणाचा होय की नव्हे हे अभ्यासू वाचकांनी ठरवावे.

६.५–८ मुख्य शत्रु...कथाशेष जाला. संभाजीचा वध, रायगडचा पाडाव इ० गोष्टींचा उल्लेख मराठ्यांना अत्यंत दुःखप्रद असल्यामुळे त्यांचे अप्रत्यक्ष सूचन ६ व्या ओळीत केले असे जरी मानले तरी मुख्य शत्रूचा स्थळोस्थळी झालेला अपमान हा तर मराठ्यांना गौरवास्पद होता ना? मग त्याचे स्पष्ट निर्देशासह वर्णन का केले नाही? कथाशेष जाला म्हणजे काय? 'मेला' किंवा 'पराभूत झाला' असे काही मानिले तर पुढे त्याच मुख्य शत्रूने मांडिलेल्या अनर्थांचे व तन्निवारणाचे भरघोस वर्णन आहे व त्याचा स्पष्ट उल्लेखही पुढे आहे (९.१. ११.२), त्याची काय वाट? 'मग ही पुढची गोष्ट अगोदर सांगितली,' किंवा 'मागच्या कथानकाचा धागा पुढे हातीं घेतला' असे काही तरी समाधान करायचे. पण का?

७.९–१४ इथेदेखील तसाच प्रकार. मोकळा देश म्हणजे कोणता? तो प्रांत म्हणजे नक्की कोणता प्रांत? १३ व्या ओळीचा अर्थ काय? मनात निश्चित असे काय उतरते?

यानंतर पृष्ठ १० पासून पुढच्या मजकुरात तर अशी स्थळे पावलोपावली आहेत. एकदोन ठिकाणांचाच उल्लेख करू. १०.११ तुमुल युद्धप्रसंग म्हणजे कोणता? ११.२ मुख्य शत्रु म्हणजे कोण? औरंगजेब अशक्य. निजाम उल्मुल्क म्हणावा तर तेही तितकेच अशक्य. त्याला इथले वर्णन मुळीच लागू पडत नाही. शिवाय त्याच्याशी तर शंभुछत्रपतीने मैत्री जुळविली. आणि सर्वांत मुख्य गोष्ट ही की या शत्रूचा स्पष्ट उल्लेख करण्यास हरकत कोणती होती? ११.१२ तमाम त्या प्रांतीचे रजपूत एकत्र करविले. तो प्रांत म्हणजे कोणता विशिष्ट प्रांत? आणि रजपूत का? या स्वामीला मराठी लोक लढायला मिळत नव्हते काय?

शब्दार्थ

८.३ अनर्गल उत्पाती. कसलेच बंधन न मानिता दंगाफिसाद माजविणारे. ८.९ हुकूमबारदार. आज्ञावाहक (बर्दार–वाहणारा). ८.१४ इराखी. इराक

देशातील. ताजी. ताजीक (सध्याचे ताजिकिस्तान) देशातील. ८.१५ आस्कारा. प्रसिद्धि, योग्यता. आढाव. लहान हत्यारांनी लढणारे पायदळ शिपाई. हा शब्द मुक्तेश्वर इ० जुन्या काव्यात येतो. ८.१६ इटेकरी. ईट म्ह० एक प्रकारचा भाला, तो वापरणारे पठाईत. दांडपट्ट्याने लढणारे. बांकाईत. बांक म्ह० खंजीर त्याने लढणारे. दुरुस्तंदाज. अचूक नेम मारणारे. हे बंदुखीचे विशेषण. ८.१७ तोरसाली. याचा नीट अर्थ लागत नाही. तेरेखोल खाडी किंवा तोरगल या स्थलांशी संबंध लावण्याचा कित्येकांनी प्रयत्न केला आहे, पण तो समाधानकारक नाही. जांगडे. याच्यासंबंधाने नाना कल्पना झाल्या आहेत. कोणी शब्दातच 'रांगडे' असा बदल कल्पून मेवाडातील किंवा माळव्यातील लोक असा अर्थ देतात. पण हे बंदुखी याचे विशेषण असून जांघेत बंदुकीचे आपल्याकडचे टोक धरून बंदूक मारणारे असा कदाचित अर्थ असावा. बंदूक मारण्याचा नेहमीचा प्रकार खांद्याच्या हाडावर बंदुकीचा शेवट दाबून धरून मारण्याचा असतो. ८.१८ हे लहान आकाराच्या तोफांचे प्रकार देऊन पुढे थोरथोर गाड्यांवरील भांडी असा मोठ्या तोफांचा उल्लेख केला आहे. दुराटी लांब पल्ल्याची लहान तोफ. फिलनाळा. हत्तीवरील तोफा. पील--हत्ती फा. सुतरनाळा. उंटावरील तोफा. शुतुर--उंट फा. भांडी. तोफा. हा जुन्या गद्यातील शब्दार्थ पक्का लक्षात ठेवला पाहिजे. ९.८ उपराळा. दारुगोळा वगैरेची भरपूर तरतूद, युद्धसामग्रीचे साहाय्य. ९.२१ परनिग्रह. शत्रूचे दडपण, पीडा. ९.१४ दळवटणें. तुडवून चेंदामेंदा करणे. ९.१७ येलगार. चढाई, निकराचा हल्ला. ९.१८ आक्रमिलीं स्थळें. हे वर्णन बिनबुडाचे आहे. इ. स. १७३३ मध्ये श्रीपतराव प्रतिनिधीने जिंकून घेईपर्यंत रायगड शामलाच्या ताब्यात होता. राजपुरी. जंजिरा नावाचा जो बळकट जलदुर्ग त्याच्याजवळ पण मुख्य भूप्रदेशावर राजपुरी उर्फ दंडाराजपुरी हे सिद्दीचे ठिकाण आहे. ते इ. स. १७१५ पर्यंत कधीच मराठे आक्रमू शकले नव्हते. १०.५ भागानगर. सध्याच्या आंध्र प्रदेशाची राजधानी हैदराबाद याचे जुने नाव. त्याच्या पश्चिमेस चारपाच मैलांवर गोवळकोंडा ही कुतुबशाहीची राजधानी. सांनिध्यामुळे जुन्या मराठी लिखाणात या शाहीला भागानगरचे राज्य असे म्हटलेले आढळते. १०.९ अनुपदें. मागाहून, पाठोपाठ. १०.१० गुल्म. (शत्रूचे) बलिष्ठ सत्ताकेंद्र. मूळ अर्थ शरीरातील गाठ किंवा गळू. १०.२१

हिंदुराजकार्यधुरंधर. नेहमी वापरण्यात येणारे अष्टप्रधानांचे ब्रिरुद 'समस्त-राजकार्यधुरंधर' यात समस्तऐवजी हिंदु घालून हे तयार केले आहे. हा फरक का केला असावा ? १०.२२ अंगेजणी. कर्तबगारी, पराक्रम. ११.२ अवाई खाणें. धाकणे. धास्त खाणे. ११.३ बंदेज. बंदोबस्त. ११.४ नयभयें. नयाने किंवा भयाने म्ह० मनवळवणीने किंवा धाकाने. ११.८ कसाला. संकट, अनर्थ. ११.९ सलाबत. धाक, वचक. ११.१० द्विधाभाव. या प्र. मध्ये जुन्या राजनीतीचा भास उत्पन्न करणारे शब्द जमतील तिथे घालून देण्याचा लेखकाचा प्रयत्न दिसतो. स्थलिक, मांडलिक, नयभये, द्विधाभाव हे अशा तऱ्हेचे होत. राजनीतीत ६ राजगुण सांगितले आहेत त्यापैकी द्वैधीभाव (डळमळीत मनोवृत्ती) हा एक आहे. 'संधी विग्रह यान आसन । द्वैधीभाव आश्रय जाण । हेची साही राजगुण । विचक्षण बोलती ।।' मुक्तेश्वर, सभापर्व ३.४१. १२.९ देशाधिकारी व पारपत्यगार. पूर्वीच्या देशमुख देशकुलकर्णी इ० मोठ्या वतनदाऱ्या शक्य तो कमी करून महालोमहाली एकसूत्री अंमल चालू व्हावा या दृष्टीने देशाधिकारी, देशलेखक, पारपत्यगार हे अधिकारी नेमण्याचे शिवाजी राजांनी धोरण अवलंबिले. देशाधिकारी देशमुख किंवा पाटील यांच्यासारखा परगण्याचा मुख्य अंमलदार. पारपत्यगार हा त्याचा मदतनीस. याची कर्तव्ये इतकी स्पष्ट नाहीत पण ती काहीशी मॅजिस्ट्रेटसारखी असावीत.

## प्रकरण ३

१४.५ धर्मपथप्रवर्तक. धर्माच्या मार्गाने जाणारी. प्रवर्तक हा शब्द इथे प्रवृत्त या अर्थी वापरलेला दिसतो. १४.८ राज्यमदारूढ. राजेपणाच्या गर्वाने युक्त. याच्या उलट लगेच पुढे 'अप्रमत्त'. १४.१३ यथान्यायें यथाधिकारें यथोचित. फार मार्मिक शब्दयोजना. सेवक लोकांचे मनोधारण करावे खरे; पण ते न्याय्य किंवा रास्त असेल तेवढ्या प्रमाणात, ज्याच्याशी प्रसंग आहे त्याचा अधिकार पाहून त्या मानाने आणि अखेर स्थलकालादिकांचे औचित्य लक्षात घेऊन ! १५.६ नेमीत आहे. निश्चयेकरून होणारी आहे. १५.७–९ समर्थांनी स्थापिलेल्या चाफळच्या श्रीरामाच्या पूजा–अर्चा–महोत्सवाकरिता शिवाजी राजांनी ज्या जमिनी दान दिल्या त्यांचे इथे स्मरण होते. १५.१० मोईन. ठरीव रकमेची नेमणूक किंवा वृत्ती. १५.११ वैदिक शास्त्रज्ञ निःस्पृह. ही तीन ब्राह्मण याची

विशेषणे. पुढील सर्व शब्द नामे समजावीत. १५.१५–१८ धर्मांच्या नावाखाली बुवाबाजी, अद्भुत चमत्कार, जादूटोणा असल्या गोष्टींचे बंड माजू नये याविषयीची ही दक्षता लक्षात घेण्याजोगी आहे. १५.२० परामर्ष. समाचार, योग्य ती तजवीज. १६.१ निदान महत्त्वाचा व सूचक शब्द. १६.२ पाकालय... महाल. यातून विषप्रयोग वगैरे होण्याचा संभव असतो म्हणून हे नाजूक. महाल म्ह० खाते. बारा महाल आणि अठरा कारखाने फारसी राजनीतीतून वर्णिलेले असतात. सभासदानेही दिले आहेत. त्या नाममालिकेत सर्वत्र व्यवस्थितपणा असतो असे नाही. सभासदाने दिलेल्यात फलस्थान दिसत नाही. १६ ४ पारंपर्यसेवक. पिढ्यानपिढ्या सेवा करीत आलेले १६.१७ इंगितसंज्ञा. गुप्त बेत किंवा मनोदय कळविण्याच्या खुणा. १६.१८ होत असतां. युक्त असून. १६.२३ धण्याचे संनिध ऊर्मी. मालकाच्या सांनिध्यामुळे आलेला अत्युत्साह. १७ २ सर्फराजी वढती, उत्कर्ष. १७.४ उन्मत्त द्रव्य. मादक पदार्थ. १७.५ सार्वकाळ. नकारार्थक वाक्यात याचा अर्थ 'कधीही' असा होत असतो. १७.६ भेजणूक. मोठा सुंदर शब्द बनविला आहे. हत्यार शत्रूवर फेकायचे किंवा घालायचे असते. भेजणे याचा तोच अर्थ आहे. वर्जीस. अभ्यास, प्रॅक्टीस. १७.९ बखतर. चिलखत. मुस्तैद. सिद्ध, तयार, मजबूत, पक्का. १७.१४ शिल्प. जिला हस्तकौशल्य व तांत्रिक ज्ञान लागते अशी कला. हुन्नर. कसब, कौशल्य. १७.१८ कलावंत. नाट्य नृत्य वगैरे करणारे. धाडी शिक्षकाजवळ गाणे न शिकलेला गवई. म. श. को. पहा. गुणिजन. कलावंत धाडी. यातील गुणिजन, असा अर्थ. सामान्य, फालतू असेल तर त्यास दरबारात प्रवेशच मिळू नये. १७.२० मजलस सभा, सभागृह. १८.१ व्यसन. इथे आणि १७.१६, १८.२, १८ मध्ये हा शब्द नाद, छन्द या मराठी अर्थाने वापरला आहे पण ३.५ येथे संकट या संस्कृत अर्थाने वापरला आहे हे लक्षात ठेवण्याजोगे आहे. १८.४ कवित्वें. हा विशिष्ट काव्यप्रकार आहे. सामान्यतः काव्य असा याचा अर्थ नाही. याचे हिंदीत 'कबित्त' असे रूप आहे. कबित्त म्ह० पोवाड्यासारखी स्तुतिपर, घनाक्षरीसारख्या मोकळ्या छंदातील रचना. १८.१८ विनोद. चेष्टा, थट्टामस्करी; 'टवाळां आवडे विनोद' या रामदासी वचनाचे इथे स्मरण होते. येकंदर. मुळीसुद्धा. पहा पुढे २२.२२. १८.२२ रीझ. पसंती, प्रीती. १९.८ राष्ट्र. एका राज्यशासनाखाली असलेला देश अशी स्थूल कल्पना

राष्ट्र शब्दात इथे दिसते. १९.१५ नेमस्त. ठरीव, नियमबद्ध. मुक्तेश्वरी, रामदासी वाङ्मयात हा शब्द येतो. अलीकडे या शब्दाला निराळा अर्थ प्राप्त झाला आहे. बिलाकुसूर. चूक हयगय न करिता. १९.१७ मोईन. ठरीव आकडा, रकम. २०.४ उमेदवार. आशावान, उत्साही. १९.१५—२०.१२ सेवकाच्या वेतनासंबंधाने या परिच्छेदात जे विचार सांगितले आहेत ते सरंजामशाही पद्धतीस सोडून आणि आधुनिक शासनपद्धतीला अनुसरून आहेत. दुसरी गोष्ट: कोणताही मुद्दा किंवा विचार पुढे आला असता त्याचे जितके म्हणून पर्याय आणि पैलू मानवी बुद्धीला सुचणे शक्य आहे, तितके सर्व पुढे मांडून त्यावर आपला निर्णय स्पष्टपणे सांगणे, हे आज्ञापत्र-कर्त्यांचे एक वैशिष्ट्य आहे. बुद्धीची कुशाग्रता आणि विशदता या गुणांचा हा परिपाक होय. वेतनात जास्त करण्याचा विचार जर पुढे आला तर काय करावे असा इथे प्रश्न आहे. आवश्यकता वाटेल तर कार्यावर बक्षीस द्यावे, विशेष थोर कार्य केले असेल तर दुसरा मोठा हुद्दा द्यावा, पण त्याच हुद्याचे वेतन काही केल्या वाढवू नये. हा विवरणाचा सारांश आहे. पण मूळ विषयाचे किती पापुद्रे काढून त्याची छाननी केली आहे पहा. असे एक लहानसे उदाहरण मागे १६.१०–१५ इथे आले आहे. अशी उदाहरणे पुढे किती तरी आढळतील ४९ वरील परिच्छेद किंवा ५० वरील दोन्ही परिच्छेद ही मोठी लक्षात ठेवण्याजोगी उदाहरणे आहेत. २०.१४ हुजरात. हुजरात आणि सैन्य यांच्यात इथे फरक केला आहे. हुजूरच्या म्हणजे राजाच्या खास अधिकारा-खालची जी फौज ती हुजरात. वस्तुतः राजांचे धोरण राज्यातील एकूण एक लढाऊ व्यक्ती एकतंत्री राष्ट्रीय सैन्याची घटक असावी असे होते. पण ही गोष्ट एकदम साध्य होण्याजोगी नव्हती. काही तरी सैन्य बाहेरचे राहतच असे. त्याचा स्पष्ट उल्लेखही पुढे २२.१५ मध्ये केला आहे. पण हुजरातीवर त्यांनी केवढा भर दिला आहे हे २०–२२ या एकंदर वर्णनावरून दिसते. इतर सैन्याच्या संरक्षणाचे आदिकारणदेखील हुजरातच आहे असे येथे बजाविले आहे. २०-२४ हशम. शिपाई, प्यादा. बंदुखी. बंदूकधारी पायदळ शिपाई. करोल. बंदूक-स्वार. लस्कर हा शब्द सप्तम्यन्त मानून 'लस्करामध्ये...असा पंचरूढ (पाचांनी युक्त) जमाव ठेवावा.' २१.४ सरेखोर. दारूबाज, मद्यपी. (सरा–मद्य). बालमात्र मूर्त, पोरकट. २१.५ कुचोद्य. कुचेष्टा करणारा, टवाळ. २१.८ होड.

पैज. २१.१२ हत्यार धरलियावर. एखादा अमर्याद किंवा हरामखोर असला आणि त्याने शस्त्र उपसून मारामारी सुरू केली तर. २१.१५ लक्षणीक. सुलक्षणी, चांगल्या गुणांचा. २२.४ समजावीस. योग्य पगार देऊन संतोष राखणे. २२.५ सबनीस. लष्करचा पगार चुकविणारा आणि त्याचे हिशेब लिहिणारा कारकून. २२.११ घुगी. डोक्यावर घालावयाची बुरणुसाची खोळ. टोप. शिरस्त्राण (कदाचित घोड्याचे असेल). २२.१२ पाखर घोड्याच्या अंगावरील चिलखत. ताज. टोप. हुका. तोफेचा गोळा, बॉंब, दारूने भरलेले अस्त्र. २२. २० हलखुद. आहे त्या स्थितीत, ठायीचे ठायी. २३. १,२ "स्वामी अति उग्र असेल तर तो त्यजावा; अत्युग्रापेक्षाहि, कृपण असेल तर तो अधिक त्याज्य; केलेल्या कामांतलें मर्म ज्याला समजत नाही तो कृपणापेक्षाहि अधिक त्याज्य; त्यापेक्षाहि केलेल्या कामाचा विध्वंस करणारा जो असेल, त्याच्या तर वाऱ्यासहि उभें राहूं नये." हे सुभाषित इथे किती उचित आहे ! यात सांगितलेल्या चारी गुणांच्या (म्ह० अवगुणांच्या) उलट गुणांचे प्रतिपादन या प्र. त पूर्वी आले आहे, हे पाहणाऱ्यास दिसेल. पहिल्या प्रथम 'सेवक लोकांचें मनोधारण करून वर्तावें' हे सांगून उग्रत्वाचा निषेध सुचविला. 'योगक्षेमविषयी अपेक्षा न पडे' (१६.९) इ० अनेक प्रकारे कृपण होऊ नये हे सुचविले, 'संपूर्ण हुंनर अवगत करून ठेवावें' (१७.१९) इ० विस्तरशः सांगून राजाने विशेषज्ञ होण्याची आवश्यकता प्रतिपादिली, केलेल्या कामाचा नाश न करिता त्याचे चीज होईल असे करावे हेही अनेक स्थली (१९.२–६, २०.८–१०) अप्रत्यक्षतया सुचविले ! २३.५ निखालसपण. निःशंक मोकळेपणाचा संबंध. २३.९ भीड वागविणें. मोठा सुंदर शब्दप्रयोग. पुढे अनेकवार आला आहे. २३.१७ बदअमली. वाईट वर्तणुकीचा, छिनाल. २४.१ राजकारणप्रसंग–कार्याकार्यविचार. राजकारणी घडामोडींच्या संबंधाने आपण काय करावे आणि काय करू नये याबद्दलची मसलत. २४.३ प्रत्योत्साहन...करून. उद्दिष्ट कार्याविषयी त्यांच्या मनात उत्साह उत्पन्न व्हावा यासाठी अत्यंत मनःपूर्वक आस्था दाखवून. २४.६ नजर पावली नसली. आपले विचार त्यांना पूर्णपणे आकलन झाले नसले २४.७ स्फुटवक्तेपण साहित्य योजोन. (आपल्या विचारांची) कारणे, त्यांचे आधार वगैरे स्पष्ट, विशद करून सांगून. २४.८ कार्यविवंचना गुणदोष. काय करायला पाहिजे यासंबंधाचे साधकबाधक विचार आणि त्यांचे गुणदोष. २४.१६ पडिलें अंतर. घडलेला

दोष, झालेली चूक. २४.२२ शिक्षा करणार. हे सं. अर्थी म्हणजे शिक्षण देणार या अर्थी इथे वापरले आहे. २५.२ जेठी. मल्लविद्येचा गुरु, उस्ताद. २५.३ दांडाईत. सोट्यासारख्या हत्याराने लढणारे. २५.४ त्यांकडून. राजगुरु जेठी इ० पासून. (राजकुमाराकडून हे अध्याहृत घ्यायचे). २५.५ पूर्वीच्या विधानाचे कारण पुढील वाक्यात दर्शवावयाचे असते तेव्हा मध्ये 'किंनिमित्त कीं' अथवा 'काय म्हणोन कीं' असे घालण्याची या लेखकाची लकब आहे. हे शब्दप्रयोग राजनीतिविभागात पुष्कळदा येतात. प्रास्ताविक विभागात त्यांचा एकदाही आढळ होत नाही. २५.६ 'ज्याप्रमाणे ईश्वर सर्व जनाचा गुरु त्याप्रमाणे नृपति सकलांचे कल्याणाकल्याणाचा इंदु कल्पिला आहे,' असा अन्वय. इथे फलज्योतिषातील कल्पना फार मार्मिक रीतीने आणलेली दिसते. मनुष्याचे भाग्य, आरोग्य इ०वर निकटत्वास्तव चंद्राची सत्ता इतर ग्रहांच्या मानाने अधिक चालते असे ज्योतिषशास्त्र मानते. चंद्र शीतल, आल्हाददायक; राजा तसाच असावा, हाही आणखी त्यात ध्वनी. गुरु आणि चंद्र हे दोघेही पुण्यग्रह मानिले आहेत. रवी हा उग्र किंवा पापग्रहांपैकी मानिला असल्यामुळे त्याची उपमा दिली नाही. गुरु माणसाच्या नशिबाचे दीर्घ-कालीन नियोजन करतो व तो खूप लांब आहे; चंद्र जवळ असून सामान्यतः तात्कालिक फले देणारा. हे गुणसाम्य ईश्वर व राजा यांच्यामध्ये कल्पिलेले दिसते. अशा रीतीने जितका विचार करावा तितके अनेक सुंदर ध्वनी या (रूपकवजा) उपमेतून निघतात. राजांना चंद्राची कल्पना प्रिय होती असे 'प्रतिपच्चंद्रलेखेव' ही आपल्या मुद्रेला त्यांनी उपमा दिली त्यावरून दिसते. २५.८ कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम्। इति ते संशयो मा भूद् राजा कालस्य कारणम्॥ हा पूर्ण श्लोक हा महाभारतात आहे. २५.१७ प्रोत्साहनानिमित्त. दोषांबद्दल इशारा देण्या-बरोबरच हे थोर लोक पुढे सुधारणा करण्याबद्दल प्रोत्साहन देणारच. २५.१९ चित्तप्रशस्ततेने. मोकळ्या व संतुष्ट मनाने, खुल्या दिलाने २६.६ पारपत्य. शासन (त्यांच्यावर अन्याय करणाराचे). २६.९ युक्ति. वर (२६.४-८) सांगितलेली युक्ती अत्यंत नामी असून ती सर्वांनी, विशेषकरून मोठी कामे ज्यांनी हाती घेतली आहेत त्यांनी, अवश्य आचरणात आणण्याजोगी आहे.

## प्रकरण ४

२७.२ **विचारून पाहणें.** मनन करून ठरविणे. विचारणे याचा अर्थ जुन्या गद्यात विचार, मनन करणे असा होतो; प्रश्न करणे असा नाही. २८.५ **वार्तिक.** बातमीदार, हेर. २८.६ **संधि विग्रह उपेक्षा.** तह, युद्ध किंवा दुर्लक्ष. २८.७ **प्रवर्त.** उपक्रम, प्रत्यक्ष कार्याची सुरवात. २८.८, ९ **अंतःपुरादि नाजूक नियम.** पूर्वी अनेकपत्नीत्व सरास असल्यामुळे राजांना अनेक राण्या—व संभवतः उपपत्न्या—असत. तेव्हा अंतःपुर किंवा राणीवसा किंवा दरुणी महाल हे राज्यकारभारातले एक मोठे प्रकरण असे. त्याच्या व्यवस्थेचे नियम फार 'नाजूक' असणार हे उघडच आहे. मल्हार रामराव चिटणीसकृत राजनीतीत यासंबंधाचे निरूपण पृ. ५७ वर थोडेसे आहे. २८.१२ **नृपकार्यें.** या वाक्यात एकंदर १८/१९ नृपकार्यें वर्णिली आहेत. पुढे प्रधानाला राजाचा प्रतिनिधि असे म्हटले आहे, त्यावरून वरच्यापैकी जी पडतील ती कामे प्रधानाने केली पाहिजेत अशी कल्पना दिसते. केवळ राजाकरिता काही विशिष्ट कार्यें राखून ठेवायची, असे दिसत नाही. राजा आणि त्याचे प्रधानमंडळ मिळून दोघांवर सर्व कार्यांची संयुक्त जबाबदारी. २८.१५ **प्रधान.** हा शब्द अमात्य किंवा minister किंवा मंत्री या अर्थी पूर्वीपासून चालत आला होता, तो महाराजांनी घेतला. ११/१२ व्या शतकातील कलचूरींच्या साम्राज्यात 'मंत्रिप्रधान' किंवा 'प्रधानामात्य' हा मुख्य मंत्र्यासारखा असे. कल्याणीच्या चालुक्यांमध्ये (१२।१३ वे शतक) मुख्य मंत्र्याला 'महाप्रधान' म्हणत, हे अगदी स्पष्ट उदाहरण आहे. पण स्थलकालदृष्ट्या अगदी निकटचा असा उल्लेख मुक्तेश्वराच्या काव्यात आढळतो. 'आज्ञा कीर्ति द्विजपालन। दान भोग मित्रसंरक्षण। साहीं गुणी तव प्रधान। साळंकार असती कीं ॥' सभापर्व ३.२० २८.२२, २१. **प्रधान म्हणजे राजमद...अंकुश** या दोन विधानातील उपमाने जरी भिन्न असली तरी त्यांचा अर्थ एकच दिसतो. पण सूक्ष्मतेने पाहिले असता फरक आढळेल व त्यातच लेखकाची मार्मिकता आहे. सागर खवळला तर एखादे समयी वेळा—मर्यादा—देखील उल्लंघून तिला आपल्या पोटात घेतो वेळा केवळ निश्चल आणि जड. तेव्हा राजमदाला ताळ्यावर आणणारा म्हणून अंकुश (म्ह० अंकुशधारी महात) याची उपमा अधिक चांगली

राजाप्रमाणे हत्तीलादेखील 'मद' येतो, तेव्हा तेही साम्य जुळले. असे जर आहे तर सागर आणि मर्यादा यांची उपमा दिलीच कशाला? तर त्यात एक प्रकारची भव्यता आहे. महात हत्तीच्या डोक्यावर चढतो, हाही राजा-प्रधान पक्षी दोष आहे. दोन्ही उपमांच्या सांगडीमुळे अयोग्य अर्थांचे ध्वनी टळून योग्य अर्थांची छटा शिल्लक राहते. २९.५ **प्रधान.** हा सं. शब्द या अर्थी अस्तित्वात असला, तरी महाराष्ट्रातील राजकीय व्यवहारात सरकारकून हा फा. शब्दच त्या काळात सररास प्रचलित होता. फा. बद्दल संस्कृत शब्द प्रचारात आणायचे हा महाराजांच्या ध्येयदृष्टीचा भाग. यासंबंधी उपोद्घातातील विवेचन पहा २९.१० **टक्का.** बहुतकरून रुपया या अर्थी. शिवाय टका म्ह० हलक्या दर्जाचे नाणे असून त्याची किंमत वेगवेगळी असे : १६ शिवराई पैसे, १ आणा इ० (म. श. को.) २९.११ आम्ही स्वीकारलेल्या हस्तलिखित प्रतीत जसे आहे तसेच इथे छापले आहे. पण इथे लेखकप्रमाद उघड असून इतर प्रतींप्रमाणे **सरकारकूनपर्यंत भिडेची परंपरा, सकल भिडेचा शिरोभाग, तो सरकारकून** असा मजकूर असायला पाहिजे. सारखा शब्द थोड्या अवकाशात पुन्हा आला तर नकलकाराची नजर चळते आणि मधले शब्द गळतात, या प्रकाराचे हे उदाहरण आहे. २९.१४ **अवाच्य संभाषण**. अनादराचे उद्गार. २९.१५ **बहुमान अंतरें.** पूर्वीपासून चालत आलेल्या त्याच्या मानसन्मानात कमीपणा करून. २९.२३ **सलक्षणीक.** याचा आणि 'लक्षणीक'चा अर्थ एकच. २९.२४ **कार्यधुरंधर पाहून.** कार्ये उत्तम रीतीने पार पाडतो असे दिसून आल्यास. ३०.१ **नृपपदवीउपरी.** वर्ण्य विषयाचे गौरव करण्याच्या भरात इथे थोडी अतिशयोक्ती केली आहे. ३०.३-७ ही जी अपेक्षित गुणांची यादी आहे तिच्यात **पापभीरु दैवतैकनिष्ठ सदयपूर निःपाप पुण्यशील अहिंसक** ही विशेषणे एका दृष्टीने विशेष महत्त्वाची आहेत. धार्मिकता ईश्वरनिष्ठा पुण्यशीलता दयाळूपणा अहिंसा इ० आध्यात्मिक गुणांसंबंधी या राजनीतिकर्त्याचा केवढा कटाक्ष होता हे यावरून दिसून येते. हा कटाक्ष सर्व ग्रंथभर जिथे प्रसंग येईल तिथे व्यक्त होतो. ३०.७ **अतीत-अनागत-कार्यकर्ते.** राज्यकारभारात किंवा कोणत्याही मोठ्या कारभारात सर्वच कामे वेळेवर पार पडतात असे नाही. काही शिल्लक राहून जातात (work in arrears) त्याचप्रमाणे ज्या कामांची ठरलेली वेळ अद्याप आलेली नाही अशी कामे किंवा यांचा काही अंश काही विशेष कारणास्तव अगोदर उरकावा लागतो

(work in anticipation). अशी दोन्ही प्रकारची, म्हणजे शिल्लक पडलेली आणि आगाऊ करावयाची कामे कोणची आहेत, याचे बरोबर स्मरण ठेवून ती कामे उरकणारे. या प्रबंधाच्या कर्त्याची नजर किती सूक्ष्म होती आणि कारभाराचा अनुभव त्याला किती निकटचा व साक्षात होता, याचा हा शब्द एक पुरावा आहे. हा अर्थ लक्षात घेतला म्हणजे कर्ते याऐवजी सूचक हा पाठ बरोबर नव्हे हे लक्षात येते. ३०.७-८ साम...मित्रसंधानादि अनेक उपायें. प्राचीन राजनीतिग्रंथांमध्ये शत्रुसाधनाचे, म्हणजेच शत्रूला अनुकूल करून घेण्याचे उपाय सांगितले आहेत. त्यांची संख्या चार, सात, आठ अशी भिन्न भिन्न आढळते. म. रा. चिटणीस कृत राजनीतीत (पृ. ५६) साम, दाम, दंड, भेद हे चारच सांगितले आहेत. महाभारतात त्यांची संख्या ७ आहे. 'कच्चिद्राजगुणैः षड्भिः सप्तोपायांस्तथानघ । बलाबलं तथा सम्यक् चतुर्दश परीक्षसे ।।' म. भा. सभापर्व ५.२१. सप्तोपायांचे मुक्तेश्वरोक्त विवरणः— 'साम दान दंड भेद । इंद्रजाळ मंत्रौषध । सप्तोपाय ऐसे सुबुद्ध । पंडितवर्य बोलती ।।' सभा. ३.४२ प्रस्तुत स्थली एकंदर आठ उपाय सांगून याखेरीज आणखीही आहेत असे 'आदि' पदाने सूचित केले आहे. पहिले चार तर सर्वत्र तेच आहेत. पुढच्या चारांपैकी दोन मुक्तेश्वराने गुणात समाविष्ट केले आहेत. 'संधी विग्रह यान आसन । द्वैधीभाव आश्रय जाण । हेचि साही राजगुण । विचक्षण बोलती ।।' सभा. ३.४१. मित्रभेद—शत्रूच्या मित्रांमध्ये फूट पाडणे. मित्रसंधान--शत्रूच्या मित्राला आपल्याकडे वळवून घेणे. ३०.१७ कंटकपुष्प...करिजेतो. वृक्ष=कुल, घराणे. कंटक=दुराग्रही, व्यसनी, मत्सरी मनुष्य. पुष्प=त्याच्या भावाबंदातील योग्य, सुबुद्ध मनुष्य. ३१.२ ऐब. दोष, चूक. ३१.९ मुतालीक. नायब, उपमन्त्री. ३१.१२ निसबतीचे. संबंधाचे, नात्याचे, तर्फेचे. ३१.१७ यख्तियार. सध्याचे रूप अखत्यार. सोपविलेला अधिकार, मुखत्यारी. ३१.२०-२३ उ. १८ पहा. ३२.२ मुदई. आरोप करणारा, विरोधक. ३२.९ छद्म. छपलेला, गुप्त राहिलेला. ३२.१४ आटोप. सामर्थ्य, आवाका. ३२.१६ उपसाहित्य. उपयोगी सामग्री. ३२.८ ईर्षेने. स्पर्धेने, चढाओढीने. ३२.१२-१२ या परिच्छेदात सरकारकून अनेक असावेत असे सांगितले आहे. पण त्यातील मुख्य मुद्दा एकमेकांमधील चढाओढीने कामे अधिक चांगली होतील हा दिसतो. राज्यकारभाराचे (स्थूल मानाने) भिन्नभिन्न विभाग (खाती) असावे

व प्रत्येक विभागास जबाबदार एक मंत्री असावा आणि असे मंत्री आठ असावे, या अष्टप्रधान पद्धतीतल्या मुख्य बीजांचा इथे मागमूस दिसत नाही. उ ३५ पहा.

## प्रकरण ५

**३३.१ साहुकार.** पेढीवाला, भांडवलदार, मोठा व्यापारी. साधु या सं. पासून साहु झाले असावे. पण साधुकार अथवा साहुकार असा शब्द या अर्थी संस्कृतात वापरलेला दिसत नाही. साहुकार आणि सावकार एकच. ३३.१० पासून पुढे सावकार हाच शब्द वापरलेला दिसतो. **राजश्री.** राजवैभव. **३३.२ करितां.** सुळे. **वस्तुजात.** नपुं. वस्तुसमूह. **३३.६ जलल.** जुलूम. जबरदस्ती. मूळ शब्द जलाल; आरबी. **३३.८ नरमिना.** उंची रेशमी कपडा. **जरबाब.** जरतारी वस्त्र. **पशमी.** लोकरी कापड. (फा. पश्मीना) **३३.९ हुजूरबाजार.** मुख्य पेठ. **३४.७ कौल.** परवाना, अभयपत्र. **आमदरफ्ती.** दळणवळण, अनिर्बंध येजा. **३४.९ वरकड.** इतर, बाकीचे. **३४.१० खावद.** स्वामी, मालक. **३४.१४ स्वमत्त प्रतिष्ठावें.** आपल्या धर्मांचा प्रसार करावा. **३४.८–१६** टोपीकर उर्फ युरोपीय लोक यांचे खरे स्वरूप व हेतु आज्ञापत्रकाराने बरोबर हेरले होते, याची साक्ष देणारा हा मजकूर लेखकाच्या मर्मभेदी प्रतिभेचा दर्शक आहे. हे लोक दिसतात तसे नसून यांचे उद्देश फार निराळे आहेत, हा भाव स्पष्टपणे व्यक्त केला आहे. दोन प्रकारचे उद्देश इथे उल्लेखिले आहेत : (अ) या प्रांतें राज्य वाढवावें, आणि (आ) स्वमत्त प्रतिष्ठावें. राज्य मिळविण्यासाठी पोर्तुगीज आणि इंग्रज या दोहोंचा पूर्वी झालेला व त्यावेळी चाललेला उद्योग राजांना दिसतच होता. तसेच 'स्वमत्त प्रतिष्ठिणे' म्ह० धर्मप्रसार यापासून इंग्रज अलिप्त असले तरी पोर्तुगीजांनी या बाबतीत कहर चालविला होता, हे स्पष्ट दिसत होते. पोर्तुगीजांचे प्रयत्न त्यांच्या राजाच्या साक्षात सत्तेखाली चालले होते आणि इंग्रज, फ्रेंच, डच वगैरेंच्या कंपन्या राजसत्तेच्या सनदेने व प्रोत्साहनाने आपला कारभार करीत होत्या. या आतील सूत्राची जाणीवही शिवाजी राजांना होती, असे 'त्यांचे हुकमाने त्यांचे होत्साते' या शब्दांवरून दिसून येते. 'हट्टी जात...नव्हेत' हा अभिप्राय किती मार्मिक व यथार्थ होता हे नंतरच्या अनुभवावरून आपणास कळून आलेच. आश्चर्य हे की राजांनी हे त्याच वेळी ओळखले होते. अर्थात त्यांच्यासंबंधाने काय सावधगिरी घ्यावी याबद्दल पुढे ज्या सूचना दिल्या आहेत त्या फार मार्मिक आहेत हे सांगणे नको.

३४.१८ जंजिरा. जलदुर्ग, सामुद्री किल्ला (जझीरा-बेट. आरबी). ३४.२४ खाडी लांब...भूप्रदेशात लांबवर गेलेल्या खाडीत समुद्राजवळची गाव दोन गावे सोडून आत. अशा रीतीने वखारीला जागा पुष्कळ आत दिली म्हणजे तिच्यावर चहू-बाजूंनी आपले पूर्ण नियंत्रण राहते. खाडीच्या अगदी तोंडावर जागा दिली म्हणजे त्या वखारीतील लोकांच्या मदतीला मोठी आरमारी लढाऊ जहाजे येऊ शकतात व 'आरमार दारूगोळी हेंच टोपीकरांचें बळ' असल्यामुळे ते अजिंक्य होऊन बसतात. राजापूर हे शहर वर वर्णिल्याप्रमाणे खाडीच्या आत लांबवर असल्यामुळे ते त्या काळी अत्यंत भरभराटीचे व्यापारी शहर असूनही इंग्रजांची वखार तेथे सत्ताकेंद्र या नात्याने बळावू शकली नाही. राजांनी दिला खच्ची करून टाकले. याच्या उलट उदाहरण मुंबईचे. ३५.१ फरासीसांस जागा. फरासीस म्हणजे फ्रेंच; यांना राजापुरास जागा दिली त्याचा प्रत्यंतर पुरावा छानपैकी आढळतो. रत्नागिरी जिल्हा गॅझेटिअरमध्ये राजापूर वर्णनात पुढील इतिहास दिला आहे :

"In 1660 and 1670 Shivaji plundered the town sack ing the English Factory. In 1673 it is mentioned as then a French and formerly an English Factory...About this time (1710–1720) Hamilton states that formerly both the English and French had factories..." P. 360. "Of the French factory, now in ruins, little is known. It was probably started about 1667, and was sacked by Shivaji in 1670. Whether it was again opened is not known." P. 361.

फ्रेंच ईस्ट इंडिया कंपनी सन १६६४ मध्ये स्थापन झाली व त्यांचा अधिकारी कॅरॉं २४ डिसेंबर १६६७ रोजी कोचीनला येऊन लागला. तेथून उत्तरेकडे सुरतेपर्यंत जाऊन तेथे त्याने १६६८ च्या सुरवातीस फ्रेंचांची वखार स्थापली ('History of the French in India' by G. B. Malleson p. 15). या दक्षिणोत्तर प्रवासात मध्ये राजापूरला मुक्काम करून तेथे राजांच्या परवानगीने जागा मिळवून त्याने वखारीचे आयोजन केलें असावे. ही गोष्ट अधिक संभवनीय वाटण्याचे कारण १६६७ च्या अखेरीस

कुडाळकर सावंत आणि गोवेकर पोर्तुगीज यांच्या शासनाकरिता राजे तिकडच्या कोकणातच होते. फ्रेंचांची राजापूरची वखार शिवाजीने १६७० साली लुटली या गॅझेटियरकाराच्या म्हणण्यात मात्र मतलब नाही. कारण फ्रेंचांनी त्या काळात राजांशी सलोखा राखला होता. यात अडचण एकच येते. आम्ही आज्ञापत्राचा रचनाकाल १६६६ मार्च ते मे हा कल्पिला आहे (उ. ४८–५०). त्याच्या थोडासा पुढचा हा फ्रेंचांच्या वखारस्थापनेचा काळ येतो. पण आज्ञापत्राचा मुख्य मसुदा तयार झाल्यानंतर त्याच्यात अशी काही किरकोळ गोष्टींची भर मागाहून घातली असणे यात असंभवनीय काही नाही. ३५.९ मवसर. ऐपत, सामर्थ्य. ३५.११ फारीख. चुकता, फेडलेला. मेहमानी. आतिथ्य, पाहुणचार.

## प्रकरण ६

३६.१–२ पहा उ. ५५ शेवटची ओळ. ३६.४ उतरती...आहेत. उतरत्या पायरीने आपल्यापेक्षा बलिष्ठ असलेल्यांना राजी राखून दुबळे लोक आपले जीवन कंठीतच आहेत. ३६.६ दायाद. हा शब्द इथे फार मार्मिक पडला आहे. जिंदगीचा वाटेकरी आणि शत्रु असे याचे दोन अर्थ आहेत. वतनदार हे राज्याच्या (गावोगावच्या) वसुलाचा हिस्सा वंशपरंपरेने खात असल्यामुळे ते राज्याच्या उत्पन्नाचे वाटेकरी झालेच. राज्यसत्तेशी निष्ठावंत न राहता पुंडावा घरभेदेपणा करण्याची त्यांची प्रवृत्ती असल्यामुळे ते राण्याचे शत्रुही ठरतात. ३७.३ स्थळें. तटबंदीची ठिकाणे. वाटा पाडणें. वाटमारेपणा करणे. ३७.६ भेद, गुप्त बातमी फोडणे. ३७.९ युक्तिजन्य. चातुर्यसाध्य. 'परम युक्तिजन्य' कसे तेच इथून पुढे प्रकरणभर सांगितले आहे. ३७.१७ लाजिमा. हक्क. जुन्या पत्रव्यवहारात हक्क लाजिमा हे दोन्ही एकाच अर्थाचे शब्द बहुधा एकत्र येतात. ३७.२२ कबिला. कुटुंब. गुंज. कट, फिसाद. ३८.९ समर्पक अंतर स्थापून. योग्य अवकाश मध्ये जाऊ देऊन. ३८.१३–१८ या शेवटच्या परिच्छेदात एकदम उलट कलाटणी देऊन वतनदारांचे खूपच गौरव केले आहे. अर्थात त्याला शर्त आहेच: 'तो कार्यकर्ता आणि प्रामाणिक असेल तर!' असा वतनदार सोन्यासारखा तर खराच; पण सोने दुर्मिळ असते, तसा प्रामाणिक वतनदारही विरळा, हेही अप्रत्यक्ष सूचित केले आहे.

## प्रकरण ७

३९.१ **वृत्ति.** राजा किंवा अन्य सत्ताधारी यांजकडून मिळालेले वंशपरंपरा निर्वाहाचे साधन. ३९.३ **येकास.** दुसऱ्यास. ३९.५ **विहित.** शास्त्रास व न्यायास अनुसरून, योग्य. ४०.८ **दिवाण महसुलांत.** राज्याच्या उत्पन्नात, सरकारी करवसुलीत. दिवाण—राज्याची मुख्य कचेरी, सरकार. **वृत्तिवंशपरंपरेने.** वृत्तिधारकाच्या पिढ्यानपिढ्यांच्या क्रमाने. ४०.१० **पराभव.** हानी, कमीपणा. ४०.१२ **रयतेवरी हक.** शेतकऱ्याच्या जमीन उत्पन्नावर हिस्स्याचा अधिकार. ४०.१३ **नूतन कानू**-राजांनी केलेले नवीन जमाबंदीचे नियम. जमिनीचा सारा रयतेने रोख रकमेमध्ये पाटलाकडे भरावा ही त्यातली मुख्य बाब होती. पूर्वी जमिनीवर हक्क करून दिला तर वतनदार त्याबद्दल जबाबदार राही. ४०.१५ लेखकाच्या धर्मश्रद्धेचे आणखी एक ठळक उदाहरण. तसेच पुढे ओळी २०,२१ पहा. ४०.२१ **स्वदत्तापहारदोष.** आपणच दिलेले आपण हिरावून घेतल्याचा दोष. ४०.२४ **त्याच वृत्तीवर होत होत.** त्याच वृत्तीच्या आधाराने वाढत वाढत, अधिक पुष्ट होत होत. ४१.१ **दस्युभाव.** शत्रुत्व. ४१.५ **इनाम.** वृत्ती व इनाम यात फरक आहे व तो लक्षात बाळगून हे प्रकरण लेखकाने लिहिले आहे. वृत्ति म्हणजे जमिनीच्या साऱ्याचा किंवा उत्पन्नाचा काही विशिष्ट हिस्सा एखाद्यास वंशपरंपरा लावून देणे. इनाम म्हणजे एखादे गाव किंवा काही जमीन एखाद्याला संपूर्ण दान देणे; त्याचे सर्व उत्पन्न त्या इनामदाराने खायचे असते व त्याला बहुधा जमीनसाराही माफ असतो; अर्थात वृत्ती दिल्याने सरकारी महसुलात न्यूनता येते (४०.९) तर इनाम दिल्याने राज्यच कमी होते (४१.११,१२). ४१.१३ **वृत्तीच्या विषयांत.** याच प्रकरणाच्या पूर्वार्धात, जेथे वृत्तीसंबंधी लिहिले आहे तेथे. वृत्ती देण्याने जे दोष प्राप्त होतात, ते तर इनाम देण्याने होतातच, शिवाय आणखी काही दोष येतात. हे लिहिणे मागील प्र. ६ ला अनुलक्षून आहे असे म्हणणे बरोबर होणार नाही. ४१.१५ **यवोदरप्रमाण.** जवाच्या दाण्याच्या मध्यभागाएवढी. ४१.१९ **जीवाभ्य.** जिवापाड. ४१.२१ **मुशारा.** दरमहा पगार, तनखा. ४२.१ **धर्मांत अधर्म, अधर्मांत धर्म.** जो बाह्यात्कारी धर्म वाटतो पण खऱ्या निःश्रेयसाच्या दृष्टीने पाहिले म्हणजे धर्माच्या विरुद्ध असल्याचे दिसून येते; तसेच जो अधर्म वाटतो पण व्यापक दृष्टीने पाहता धर्म ठरतो. ४२.३

देश काल पात्र. सात्त्विक दान कोणते हे गीता सांगते : 'देशीं काळीं तसें पात्रीं उपकार न इच्छितां । धर्मभावेंचि जें देणें जाण तें दान सात्त्विक ॥' गीताई १७.२०. ४२.३ जोगी. बैरागी. जंगम. लिंगाइतांचे गुरु. 'जंगम' या नावावरून यांनी नेहमी फिरून भिक्षा गोळा करायची असते असे निष्पन्न होते. ४२.५ कार्यास येतें. शक्य होते, ज्यांच्या जीवनक्रमात बसू शकते. ४२.७ श्रोत्री. श्रोत्रिय, अग्निहोत्री, यज्ञदीक्षा घेतलेला. ४२.९ पर्वादि, पूर्णिमा अमावास्या इ० धर्मशास्त्रात सांगितलेले विशिष्ट काळ, की ज्या काळी दानादि पुण्यकर्म केले असता त्याचे अनेक पटींनी अधिक फळ मिळते. ४२.१० धारादत्तें. धार्मिक विधीने उदक सोडून. पाण्याची धार सोडून 'इदं दत्तं न मम' असे म्हटले म्हणजे दान पूर्ण झाले अशी आपली धार्मिक कल्पना आहे.

## प्रकरण ८

दुर्ग गड किला (किल्ला) असे तीन शब्द या प्र. त वापरले आहेत. पहिला सं. दुसरा देशी व तिसरा आरबीतून आलेला. तिघांचे संमेलन येथे करण्यात कर्त्याचे चातुर्य दिसून येते. सं. मध्ये दुर्ग (नपुं.) म्ह० बिकट जागा एवढाच मूळ अर्थ आहे. आरंभी ४।५ वेळा हा शब्द वापरून पुढे सोडून दिला आहे व गड आणि किल्ला हेच सररास वापरले आहेत. प्र. ४ मधील प्रधान आणि सरकारकून यांच्या योजनेसारखेच हे काहीसे आहे. याशिवाय 'स्थळ' हा शब्द साधारणपणे गड किल्ला याच अर्थी अनेक ठिकाणी वापरलेला दिसून येतो. ४५.७-८ जो जो देश...गड बांधिले. हे वर्णन स्वाभाविक क्रमाच्या उलट दिसते. पुढे त्याचे विवरण थोडक्यात केले आहे (४५.२०); पण प्रत्यक्षात तसे घडलेले दिसत नाही. जो प्रदेश ताब्यात आला त्याच्या मजबुती-करिता शिवाजी राजांनी गड बांधले. परक्याच्या राज्यात जबरदस्तीने नूतन किल्ले बांधून मग तो देश आक्रमिला असे कोठे झालेले दिसत नाही. राजांनी नव्याने बांधलेले प्रसिद्ध गड दोन : राजगड आणि प्रतापगड. हिरडस मावळावर कबजा करून राजगड बांधला आणि जावळी प्रांत जिंकून प्रतापगड बांधला. ४५.८ सिंधुदुर्ग, खांदेरी, पद्मदुर्ग हे राजांनी जलदुर्ग नवे बांधिले. ४५.९, १० उ. १३, १४ पहा. ४५.१२ तीस बत्तीस वर्षेंपर्यंत. औरंगजेब १६८२ साली दक्षिणेत आला, १७०७ साली मेला. एकूण २५ वर्षे होतात. तीस बत्तीस ही

संख्या जुळविण्याचा काहीजणांनी केलेला प्रयत्न यशस्वी झाला आहे असे वाटत नाही. ४५.१९ या उपरिहि. मधला परिच्छेद गाळून या मजकुराचा संबंध ४५.५ शी जोडिल्यास सुरेख जुळतो. काही अपुरेपणा वाटत नाही. ४५.१८ स्थळें. किल्ले. ४६.३ अभ्रपटलन्याय. मेघसमूहाप्रमाणे, ढगांचे पडळ थोडा वारा सुटला की विरघळून जाते, त्याप्रमाणे. ४६.११ त्या काळातल्या हुद्देदारांच्या व नोकरांच्या संज्ञा नीटपणे समजून घेतल्या पाहिजेत. मामला म्ह० सरकारी काम, महत्त्वाचे कार्य अर्थात मामलेदार म्ह० वरच्या दर्जाचा कोणताही अधिकारी. ही सामान्य संज्ञा होय. भेद. गुप्त बातमी शत्रूस कळविणे ४६.१३ दगा. कपटाने केलेला घात. ४६.१९ दस्तवारी दुरुस्ती, मजबुती, बंदोबस्त. ४६.२० हवालदार. किल्ल्याचा प्रशासक. हा मुख्य अधिकारी; याच्यावर किल्ल्याची व्यवस्था, त्याचे संरक्षण, यौद्धिक सामग्रीची सज्जता, इ० सर्व गोष्टींची जबाबदारी, ४६.२१ सदरसरनोबत. मुख्य सैन्याधिकारी. ४६.२३ शिपाई. सैनिक, लढवय्या. लढवय्या माणूस नेहमी सरळ स्वभावाचा, प्रामाणिक असतो. कबीलदार. कुटुंबवत्सल. ४६.२२ ते ४७.७ केवढे गंभीर आणि पोटतिडिकेचे वर्णन आहे! ४७.७ कारखानीस. सरकारी अठरा कारखान्यातील सामग्रीची नोंद व हिशेब ठेवणारा. ४७.१२ अमीन. विश्वासू. तटसरनोबत. तटाचे संरक्षण करण्याला जबाबदार सैन्याधिकारी. बारगीर. सरकारी नोकरीतील घोडेस्वार. ४७.१३ नाईकवाडी. पायदळातील दहा शिपायांच्या वरचा अधिकारी. ४७.१४ गुजर करून. समक्ष निरीक्षण करून. ४७.१५ सनद. प्रमाणपत्र, लेखी आज्ञा. ४७.१६ चाळक. चाळे करणारा, व्रात्य, उपद्व्यापी. ४७.२४ श्रमी. दुःखी. ४८.३, ४ अन्यायी असलिया शासन, कार्यकर्ता असलिया सर्फराजी. ४८.५ तो. हवालदार अथवा सरनोबत. ४८.११ गडवई. गडाचे काम करू शकणारे. ४८.१८ मिरासी. वंशपरंपरा हक्क उपभोगणारे. ४८.२१ दुरुस्त. नियमित, न चुकता, व्यवस्थित. ४८.१६–२४ वतनदारांसंबंधीचा हा अभिप्राय प्र. ६ ची पुरवणी म्हणून अवश्य लक्षात ठेवण्याजोगा आहे. हे आज्ञापत्रकर्त्याने प्रत्यक्ष अनुभवावरून लिहिलेले असणार हे उघड आहे. ४९.२ नाकाबिली. कर्तबगारीचा अभाव, कर्तृत्वशून्यता. सिरिस्ता. वहिवाट, दंडक. ४९.१२ नतीजा. परिणाम, फळ. ४९.१३ धांडोरा. दवंडी. ४९.१६ रोजमरा. रोजचे वेतन, पगार. ४९.१९ रोहपोहमुळे दुरापराध जाला. परिचय घसटीमुळे तो अपराधी असणे शक्य नाही असे दिसून आले.

४९.२४ गडवईतून. गडाच्या तटाच्या आतून. ४९.२५ निदान. निर्वाणीची वेळ, निकराचा प्रसंग. ५०.२ यका. एका, एकी. ५०.२४ कौल. परवाना, सोडवणूक पत्र. ४९.२२ ते ५१.२ किल्ल्यावर जर गनिमाचा (शत्रूचा) हल्ला झाला तर कसकसे प्रसंग उद्भवणे शक्य आहे त्याचे लहानमोठे सर्व पर्याय हेरून प्रत्येक पर्यायात काय करावे याचा स्पष्ट निर्णय येथे दिला आहे. कोणत्याही गोष्टीचे पापुद्रे उकलण्यास लागणारी सूक्ष्म विचिकित्सक बुद्धि आणि निःसंदिग्ध निर्णय करण्यास लागणारी व्यवसायात्मिका बुद्धि यांचा येथे प्रत्यय येतो. ५१.९ मर्यादा. शिस्त, नियमबद्धता. ५१.१२ किल्ल्यासमुदयीं. किल्ल्याच्या किंवा त्यापेक्षा अधिक उंचीचा. समुदय— जास्त वर येणे, उंच असणे. ५१.१३ आहारीं. माऱ्याच्या टप्प्यात. ५१.१५ गर्जेची. कामचलाऊ, कशीबशी. ५१. १६ पडकोट. एका तटाच्या बाहेरचा दुसरा तट. ५२.१ गौडे. पाटील (गौडा), ५२.५ उपराची. काठापर्यंतची, कडेची. ५२.१२ जंबुरा. लहान तोफ. ५२.१५ बलि(ल)कुबलीस. धोक्याच्या व अडचणीच्या प्रसंगासाठी. ५२.१९ कमरगा. कटिभाग, मध्यभाग (डोंगराचा). ५२.२२ मेटें. पाहरेकऱ्यांच्या चौक्या किंवा नाकी. गस्त. सुरक्षिततेकरिता रात्री काढलेला फेरा. ५३.८ जकेरियाचें. साठवणीचे. ५३.१३ दरज. भेग, फट. ५३.२० सदर. कचेरीची बैठक. ५४.६ धर. पकड. ५४.७ मर्तबान. बरण्या. झोलमाठ. ज्यांचा डेरा किंवा पोट मोठे आहे असे माठ. ५४.९ घराचे वारियाखालें. फार मार्मिक सूचना. घरात सांजसकाळ विस्तव पेटणार. वाऱ्याची दिशा घरावरून दारूखान्याकडे असली तर एखादे वेळेस वाऱ्याबरोबर ठिणग्या दारूखान्यापर्यंत यावयाच्या! ५४.१० सुमारांत. थोड्या अंतरावर. ५४.१२ बस्ता. गठ्ठा, पेटारा. ५४.१५ मुद्रा. सील. ५४.२० बरकंदाज. बंदूकधारी, बंदुकीने नेम मारणारा. ५४.२१ गाडावयाचा. मुळात असेच आहे, पण 'डागावयाचा' ऐवजी हा हस्तदोष असावा. ५४.२२ टांकणी. या हत्याराचे स्वरूप नक्की काय असावे याचा बोध होत नाही. कट्यारीसारखी लहानशी तरवार असावी. ५५.१ चरक्या. धार लावण्याची चक्रे. ५५.२ टप्पेमुजरे साधून. टप्पा म्ह० ठरीव अंतर, मुजरा (मजरा)--सपाट मोकळी जागा. तोफा वगैरे अवजड यंत्रे ठरीव अंतरावर आणि त्यांच्या बैसकेस योग्य अशा जागा पाहून ठेवावी. तिन्ही हस्तलिखितात असाच पाठ असल्यामुळे 'टप्पेगुजरे बांधून' हा पाठ चुकीचा

ठरतो. केवळ याच उदाहरणावरून कोशकारांनी 'टप्पेगुजरे–धमधमे, उंचवटे' असा अर्थही कल्पिलेला दिसतो. ५५.३ **चरक.** तोफेचे तोंड भिन्न दिशेला फिरविण्याचे चक्री यंत्र. **कट.** अवजड वस्तु हलू नये म्हणून तिच्या बुडाशी दिलेले अडकण, बांध. ५५.४ **खलित्या.** थैल्या. ५५.५ **कुंच्या.** लांब टोप्या, आच्छादन. **रेजगारी.** दगडाचे वगैरे अणकुचीदार तुकडे (दारूबरोबर तोफेत ठासून उडवण्याकरिता). ५५.६ **पलाखा.** भाते **जामग्या.** तोफेतील दारू पेटविण्यासाठी वापरण्यात येणारे काकडे, वाती. **तरफा.** अवजड वस्तु हलविण्याच्या कामी येणारे दांडे, पहारा. **कानें.** तोफेमध्ये ठासलेली दारू शिलगावण्याचे भोक. ५५.८ **अंतरें.** लांब अंतरावर. ५५.११ **नामाकूळ** मूर्ख, बेवकूब. ५५.१२ **अंधपरंपरेने.** त्यात आपली बुद्धि न चालवता. ५५.१६ **आधोडी.** कच्च्या कातड्याचे आवरण. **अबादान.** उत्तम स्थितीत. ५५.२२ **नाहणावा लागतो.** गडाला जणू आगीचे स्नान घालावे लागते. ५५.२३ **मुद्राधारी.** गडाच्या अधिकाराची दर्शक अशी मुद्रा (सील) ज्याच्या ताब्यात असते तो, गडाचा मुख्याधिकारी. ५५.२४ **लाग.** मारगिरीचे उद्दिष्ट ठिकाण, लक्ष्यबिंदु. ५६.६ **प्रयोजक अप्रयोजक.** उपयोगी व निरुपयोगी. ५६.९ **पंचाक्षरी.** भूतपिशाच्च काढणारा, मांत्रिक. ५६.१४ **तहसील तलब.** मामल्यानुसार बोलावणे करून, काम असेल त्याप्रमाणे योजना करून. ५६.१६ **दास्तान.** कोठार. **इस्ताद.** दारूखाना, युद्धसामग्रीचा संग्रह.

## प्रकरण ९

५८.१–३ आरमाराच्या महत्त्वाची जाणीव आणि मराठ्यांची आरमारी सत्ता बलिष्ठ करण्याचे चिकाटीचे प्रयत्न हे शिवाजी राजांच्या राजनीतीचे विशिष्ट लक्षण होय. तेच इथे पहिल्या ३ ओळीत स्पष्ट मांडले आहे. ५८.३ **चालीच्या.** ज्यांची चाल चांगली आहे अशा, वेगवान. ५८.४ **गुराब.** मोठे लढाऊ गलबत (फा. ग़ुराब्; इं. grab.) **सजाव्या** तयार कराव्या, बांधाव्या. ५८.५ **बरसे.** कदाचित मुळात बिरसे किंवा बेरसे असावे. बरसा, बिरसा, बेरसा–दांडगा, टाकाऊ, निरुपयोगी. **फरगात**––लढाऊ जहाज (इं. frigate). ५८.७ **सलाबतीमुळे.** धाक, दबदबा पाडण्यासाठी. ५८.९ **संजुतें.** जय्यत तयार. (फा. सन्जीदा.) ५८.११ **इतक्यांस.** सर्वांना मिळून. ५८.१२ **तनखा मुलुकांत.** आरमाराला पगार

राज्याच्या महसुलातून द्यावा. **पैदास्तीवरी नेमणूक.** पैदास्त याचा अर्थ इथे 'बंदरातील व्यापारी मालावरील जकातीचे वगैरे उत्पन्न' असा विशिष्ट घ्यावयास पाहिजे. पूर्वीच्या सरंजामशाही व्यवस्थेत बंदराबंदरातून जकातीचे व इतर करांचे जे उत्पन्न होई त्यातून आरमारावरच्या लोकांनी आपल्या निर्वाहाला लागेल तितके घ्यावे, अशी व्यवस्था होती. या पद्धतीतील बेबंदपणा, त्यामुळे होणारी व्यापाराची हानी आणि गरिबांची नागवणूक सहज कळून येण्याजोगी आहे व तीच येथे वेचक शब्दात वर्णिली आहे. आज्ञापत्राच्या कर्त्याला प्रत्येक महत्त्वाच्या बाबतीत नवीन कल्पना रुजवायच्या होत्या, नवीन पायंडा घालायचा होता! ५८.२० **अनर्गल प्रसंग.** बेतालपणा, अनर्थ. ५९.१ **गनीम राखावा.** शत्रूचा बंदोबस्त करावा. ५९.४ **हवी पाळती.** निरंतर एकसारखी पाळत, बारीक नजर. ५९.५ **लाग करावे.** हल्ले करावे. ५९.८ **गैरकौली.** बेपरवाना, परवान्याशिवाय आलेली. ५९.९ **दिलासा.** समाधान, आश्वासन. ५९.१० **दसोडी.** कापडाची दशी. ५९.११ **मुलुखगिरीचे कारभारी.** परराज्यसंबंधाच्या खात्याचे अधिकारी. ५९.१४ **फरोख्त.** विक्री. ५९.१७ **दिवाणचे तर्फेने.** सरकारच्या तर्फेने. ५९.१८ **मजरा.** वजा, खर्ची टाकलेला. ५९.२१ **कस्त** शिकस्त, पराभूत; किंवा कष्ट, श्रम. ५९.२२ **तसनस.** नासाडी, हानी. ६०.२ **दमानी घालून.** वाऱ्यासमोरच्या बाजूला घालून. **दमान**—वाऱ्यासमोरची बाजू. जो पक्ष दमानी असतो त्याची गलबते वाऱ्याच्या मदतीने चालत नाहीत. ६०.६ **तरांडें.** जहाज, गलबत (सं. तरण्डक). ६०.९ **चौगीर्द.** चारी बाजूंनी(गिर्द-घेर). ६०.१० **दगेखोर.** फसवा. कपटी. ६० १२ **पायाला.** गलबताच्या तळाला. ६०.१३ **कौलास येणें.** शरण येणे. ६०.१४ **बतेला.** गलबत; पन्नास ते पाचशे खंडी वजन नेणारे जहाज. (म. श. को.) ६०.१६ **मालशांतीची तमा न धरितां.** मालाचा नाश होईल याची पर्वा न करिता. ६०.२२ **बारगल.** उनाड, उच्छृंखल. ६१.१ **धडा.** किनाऱ्यावर गलबत पडाव ठेवण्याची आच्छादित जागा. ६१.४ **बहुवस.** बेबंद, स्वैर. **अविंध.** कान न टोचलेला म्ह० मुसलमान. ६१.६ **परस्परें संकेतें.** दरवर्षी त्याच बंदरी छावणी केली तर बंदराचे अधिकारी आणि आरमाराचे लोक यांच्यामध्ये इतर कोणास न कळता गुप्त मसलत होऊन भेद, फितुरी व्हावयाची! ६१.८ **मोहारी.** तोंडावर. ६१.९ **आडखाडी.** मोठ्या खाडीच्या आत फुटलेला खाडीचा फाटा. ६१.१२ आरमाराचा सुभा केवढा असतो, हे पूर्वी सांगितले आहे

(५८.१०). अशा सुभ्यावरचा अधिकारी तो सुभेदार. **६१.१४ विल्हे करणें.** व्यवस्थित मांडणे, जमाखर्चांत लिहिणे. ६१.१५ आवाडाव. नासधूस, लुटालूट. ६१.१६ सोट. उंच सरळ जाड लाकूड. ६१.१७ सातवनादि. सागवानादि याच्याऐवजी लेखकाच्या हस्तदोषामुळे 'सातवनादि' झाले असावे. ६२.१–२ येथे एक उदात्त नैतिक तत्त्व सांगितले आहे. तसेच शेवट **'बलात्कार सर्वथा न करावा'** या अनमोल तत्त्वदर्शक वाक्याने केला आहे. शिवाजी महाराज वैयक्तिक संमती आणि करार यावर अधिष्ठिलेली जी नवीन समाजरचना अस्तित्वात आणू पाहत होते, तिचे केंद्रभूत तत्त्व हे होते. ६२.१० मुजरा होय. सार्थक होईल, फलप्रद होईल. ६२.१६ परंपरेने. अप्रत्यक्ष रीतीने. साधन. साधक, प्राप्त करून देणारे. ६२,१८ लेखनालंकार. लेख संपूर्ण झाल्याची निशाणी.

● ●

परिशिष्ट १

## शिवाजीच्या राज्यतंत्राचे राजकीय आणि सामाजिक महत्त्व

[ "The Social and Political Significance of the State-craft of Shivaji," * Proceedings of the Indian History Congress, Session II, Calcutta, 1939, pp. 1218-1230. ]

विस्ताराने कमीत कमी ग्रेटब्रिटनएवढया असलेल्या राज्याची भव्य इमारत शिवाजी महाराजांनी प्रायः शून्यातून निर्माण केली. शिवाजी हा एक थोर सेनानी आणि विजेता होता हे तर खरेच, परंतु कदाचित् त्याहूनही अधिक श्रेष्ठ असा तो राज्यसंस्थापक आणि प्रशासक होता. सर्व उपलब्ध साधनलेखांची साक्ष अशी आहे की विशाल सेनादलापासून तो शेतकऱ्याच्या चिमुकल्या चंद्रमौळी झोपडीपर्यंत ज्याच्या सत्तेचा प्रभाव जाणवत होता असे एक पद्धतशीर आणि शिस्तबद्ध शासन त्याने अस्तित्वात आणले.

ज्याप्रमाणे त्याचे युद्धातील विक्रम, मुत्सद्देगिरीतील यश आणि वैयक्तिक धैर्याचे अतुल चमत्कार, हे शाहिरांच्या आणि बखरकारांच्या प्रतिभेला स्फूर्ति-दायक झाले तसेच त्याची शासनपद्धतीही राज्यशासनविद्येची तात्त्विक मांडणी करणाऱ्या अनेकांना प्रेरक ठरली. या प्रेरणेतून निर्माण झालेले राजनीति-विषयक दोन प्रबंध आपल्याकडे चालत आले आहेत. त्यापैकी एक सुविख्यात

* या निबंधातील अनावश्यक वाटला तो भाग गाळून बाकीच्या भागाचे भाषांतर इथे दिले आहे. ज्यांना पाहिजे असेल त्यांना मूळ पाहता यावे यासाठी त्याचा पूर्ण संदर्भ दिला आहे.

रामचन्द्रपंत अमात्य यांनी लिहिला असे म्हटले जाते; आणि दुसरा मल्हार रामराव चिटणीस यांच्या लेखणीतून उतरलेला आहे. या दोन स्वतंत्र ग्रंथांशिवाय शिवाजीच्या राजनीतीचे तपशीलवार निरूपण कृष्णाजी अनंत सभासद आणि मल्हार रामराव चिटणीस यांनी लिहिलेल्या बखरींमध्ये आढळते.

वर उल्लेखिलेले चारही ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण असून प्रत्येक ग्रंथ दुसऱ्यापासून फार मोठ्या प्रमाणात विभिन्न आहे.

राजनीती किंवा आज्ञापत्र हा सर्वांत अधिक वास्तववादी ग्रंथ आहे. सभासद आणि चिटणीस हे आपआपल्या बखरींमध्ये राज्ययंत्राचे प्रत्यक्ष तपशील आणि लष्करी व मुलकी शासनांच्या मांडणीचा आराखडा देतात, तर आज्ञापत्रकर्ता हा निव्वळ तत्त्वनिवेदक आहे. तथापि तो वस्तुस्थितीच्या आधारावर आपली प्रमेये बसवितो. त्याची विधाने म्हणजे शिवाजीच्या काळी प्रत्यक्ष चालू असलेल्या गोष्टींवरून काढलेली ठाशीव आणि सारभूत अशी तत्त्ववचने आहेत. तात्त्विक निवेदनाबरोबरच शिवाजीच्या अनेक शहाणपणाच्या योजनांच्या आधारे मार्मिक उपदेशाचे घुटकेही तो पाजतो. तो राजांच्या वर्तनक्रमाचे सर्वसामान्य नियम घालून देतो, तसेच शासनाची विभिन्न कार्ये कोणत्या व्यापक धोरणानुसार चालावी याचे विवेचन करतो. वतनदारांविषयी आज्ञापत्रकर्त्याला असलेला तीव्र तिटकारा, राजाने कोणालाही कोणत्याही कारणास्तव जमिनी इनाम देण्यास त्याचा असलेला कडवा विरोध, तसेच किल्ल्यांच्या महत्त्वासंबंधी त्याला असलेली तीव्र जाणीव, आणि त्यांच्या व्यवस्थेबाबत त्याने केलेल्या सूक्ष्म आणि कडक सूचना–इत्यादि सर्व गोष्टींचे उगमस्थान शिवाजीने प्रत्यक्ष अमलात आणलेल्या राज्यप्रणालीत होते, यात शंका नाही. व्यापारी आणि उद्यागपती यांच्याविषयीची आज्ञापत्रकर्त्याची आस्था, आणि आरमाराच्या महत्त्वासंबंधीचे त्याचे विवेचन, या दोन गोष्टीदेखील लक्षात घेण्यासारख्या आहेत. कारण या दोन बाबी शिवाजीच्या राजकीय धोरणाची दोन महत्त्वपूर्ण कलमे होती, हे वेगळ्या पुराव्याने सिद्ध होऊ शकते.

परस्पर साम्याच्या दृष्टीने हे चार ग्रंथ दोन गटात विभक्त करता येतील. पहिल्या विभागात आज्ञापत्र आणि सभासद बखर आणि दुसऱ्यात चिटणीसांची बखर आणि राजनीती या ग्रंथांचा समावेश करता येईल. पहिला विभाग हा रचनेच्या बाबतीत कालदृष्ट्या अधिक पूर्वीचा असून त्यामध्ये शिवकालीन परिस्थितीचे

अधिक प्रामाणिक प्रतिबिंब उमटलेले आढळून येते. म्हणून शिवाजीच्या राज्यपद्धतीचे परिशीलन करताना पहिल्या विभागातील दोन ग्रंथ हे अधिक भरवशाचे मार्गदर्शक ठरतील.

सरंजामशाहीविरोधी प्रवृत्ती हे शिवाजीच्या राज्यप्रणालीचे एक थोर वैशिष्ट्य होते. आज्ञापत्रातील किंवा सभासद बखरीतील वर्णनावरून हे अचूक रीतीने स्पष्ट होते. शिवाजीच्या महसूल पद्धतीचे वर्णन करताना सभासद स्पष्ट म्हणतो :

" मुलकांत जमीनदार देशमुख व देसाई यांचे जप्तीखाली कैदेंत रयत नाही. यांणी साहेबी करून नागवीन म्हटलियाने त्यांचे हातीं नाही. इदलशाही, निजामशाही, मोंगलाई देश कबज केला, त्या देशांत मुलकांचे पाटील कुलकर्णी यांचे हातीं कुल रयत. यांणी कमाविसी करावी आणि मोघम टक्का द्यावा. हजार दोन हजार जे गावी मिरासदारांनी घ्यावे, ते गावीं दोनशे तीनशे दिवाणांत खंडमक्ता द्यावा. त्यामुळे मिरासदार पैकेकरी होऊन गावास हुडे वाडे कोट बांधून प्यादे बंदुखी ठेवून बळावले. दिवाणास भेटणें नाही. दिवाणाने गुंजाईस अधिक सांगितल्याने भांडावयास उभे राहतात. ये जातीने पुंड होऊन देश बळाविले. त्यास राजियाने देश काबीज करून हुडे वाडे कोट पाडिले. नामांकित कोट जाहाला तेथे ठाणें ठेवलें. आणि मिरासदाराचे हातीं नाहीसें ठेविलें. असें करून मिरासदार इनाम इजारतीने मनास मानेसारखें आपण घेत होते तें सर्व अमानत करून जमीदारास गल्ला व नख्त गाव पाहून देशमुखास व देशकुळकर्णी यांस व पाटील कुळकर्णी यांसी हक्क बांधून दिला. जमीदारांनी वाडा बुरजांचा बांधूं नये. घर बांधून राहावें. ऐसा मुलकाचा बंद केला." (सभासद—शिवछत्रपतीचे चरित्र, आ. ४ थी, १९२३ ; पान २९-३०),

शिवाजीच्या पूर्वी महाराष्ट्रात बोकाळलेल्या सरंजामशाहीचे हे किती जिवंत चित्र आणि शिवाजीने सरंजामशाहीच्या निर्मूलनाकरिता टाकलेल्या पावलांचे हे किती सुस्पष्ट वर्णन आहे ! आज्ञापत्रात तर या मुद्यावर अधिकच जोर दिलेला आहे. लेखक म्हणतो, "राज्यांतील वतनदार, देशमुख व देशकुलकर्णी पाटील आदि करून...हे लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत आहे वतन इतकियाचवर कालक्रमणा करावी, सर्व देशाचा स्वामी म्हणजे राजा, त्यासी निष्ठेने वर्तावें...हे यांची बुद्धि नाही नूतन संपादावें, बळकट व्हावें, बळकट जालें म्हणजे येकाचें घ्यावें, दावेदरवडे करावे, हा यांचा सहज हव्यास."

(३६-१ ते ३७-२). याप्रमाणे ताशेरे झाडीत लेखक प्रकरणाच्या अखेरीपर्यंत जातो. हे प्रकरणच मुळी त्याने वतनदार देशनायकांच्या संबंधाने लिहिले आहे. याप्रमाणे शिवाजीच्या उदयापूर्वी देशात सरंजामशाहीचे कसे थैमान माजले होते, आणि शिवाजीने तिच्या उच्छेदाचे निर्धारपूर्वक प्रयत्न कसे केले हे दोन्हीही लेखक अतिशय स्पष्टपणे दाखवून देतात. या लेखकांनी किती मार्मिकपणे परिस्थितीचे अवलोकन केले आणि त्यांनी ज्या गोष्टी भोवताली पाहिल्या त्यांचा अंतर्गत अर्थ किती कल्पकतेने मनास आणिला हे पाहणे मोठे उद्बोधक ठरेल. चिटणीस असा उल्लेख करतो की शिवाजीने शिलेदारांना नोकरीत घेतले नाही आणि जेव्हा घेतले तेव्हा बारगिराच्या स्थानापर्यंत त्यांना उतरविले. (बारगीर म्हणजे अर्थात घोडदळाचा नियमबद्ध सेवक.) सभासद देखील असेच विधान करतो. आज्ञापत्र तर नियम घालून देते की हुजरातीत कोणत्याही परिस्थितीत शिलेदाराची नियुक्ती होऊ नये. या तीनही लेखकांचे या विषयावरील मतैक्य ही खरोखरी फार महत्त्वाची बाब आहे. मराठा शिलेदार हे सरंजामशाहीचे वैशिष्ट्यपूर्ण अपत्य होते. ज्याच्या स्वारीचा घोडा आणि ज्याची शस्त्रे ही त्याच्या स्वतःच्या मालकीची असत असा अनिर्बंध लढवय्या म्हणजे मराठा शिलेदार ! स्वतःच्या घराकरिता किंवा असल्यास वतनाकरिता तो चिकाटीने झुंज देऊ शकत असे; परन्तु राज्याच्या शिस्तीला तो क्वचितच भीक घालीत असे. सरंजामी सरदाराची ती संक्षिप्त आवृत्ती होती. आणि आपण जाणतो की सरंजामशाही म्हणजे राज्याची सार्वभौमता आणि शिस्त यांचा सरळसरळ निषेध होता.

आणि शिवाजी हा तर साद्यन्त शिस्तीचा भोक्ता होता. कठोर शिस्त हे हुकूमशाहीचे अपरिहार्य लक्षण होय, आणि शिवाजी हा उपकारक परन्तु हुकूमशहाच होता यात शंका नाही. लोकोपकारी एकसत्ताक राष्ट्राला शिस्तीची अधिक आवश्यकता असते. केवळ राजसत्तेचा दरारा टिकविण्याकरिताच नव्हे तर प्रजेच्या कल्याणाकरिता, राज्याच्या अधिकाऱ्यांच्या अनियमित वर्तनाला बांध घालणे आवश्यक असते. राज्यात सर्वत्र कडक शिस्त प्रस्थापित करण्याचा शिवाजीचा प्रयत्न होता, याचा भरपूर पुरावा समकालीन कागदपत्र आणि बखरी देतात. राज्याच्या सर्व खात्यात कडक शिस्त असावी हे तर आज्ञापत्राचे प्रधान पालुपद आहे. राजवाड्यांनी प्रसिद्ध केलेल्या पत्रव्यवहारात शिवाजीने चिपळूण येथील सेनाधिकाऱ्याला लिहिलेले कडक शिस्तीचा आदेश देणारे एक पत्र आहे.

(मराठ्यांच्या इति. साधने खंड ८, २८). हे पत्र अस्सल असून मोठे उद्बोधक आहे. कारण त्यात वर निर्देशिलेली त्या थोर पुढाऱ्याची शिस्तप्रियता तर दिसून येतेच, परंतु त्याबरोबर त्याची अंतर्भेदी दृष्टी, सर्व तपशिलाची दृढ पकड आणि प्रजेविषयीची कळकळ यांचेही प्रत्यंतर येते.

राज्यकारभारातील कठोर शिस्त ही शिवाजीच्या सरंजामशाहीविरोधी धोरणाशी याप्रमाणे सुसंगतच होती. शिस्तीच्या कठोर शस्त्राने त्याने आपली सरंजामशाही विरोधी मोहीम चालविली. त्याच्या पूर्वीच्या कालापासून माजत झालेल्या सरंजामशाहीच्या जंजाळाचे निर्मूलन करण्याचा तर त्याने प्रयत्न केलाच, परन्तु जेणेकरून तिचे बीज परत रुजेल आणि पुढे फोफावेल अशी कोणतीही गोष्ट न करण्याची त्याने खबरदारी घेतली. कोणालाही कोणत्याही कारणास्तव जमिनीचे इनाम देण्यास तो अत्यंत अनिच्छक होता. जेव्हा कोणालाही त्याला बक्षीस द्यायचे असे, अथवा कोणावरही त्याची मेहेरनजर होत असे, तेव्हा नगद रकमेत वसूल होणारी महसुलावरील हुंडी तो देत असे; परंतु जमिनीची देणगी त्याने सहसा दिली नाही. आज्ञापत्र, सभासद बखर आणि चिटणीस बखर हे तिन्हीही साधनग्रंथ शिवाजीच्या या धोरणाची एकमताने विशेष नोंद करतात. आज्ञापत्रात वृत्ती करून देण्याच्या प्रश्नावर एक खास प्रकरण असून त्यात लेखक जोरदार रीतीने असा नियम घालून देतो की, "याकरितां जो राजा राज्य करणार, राज्य वाढवणार, नीतिवंत म्हणोन कीर्ति संपादणार, त्याणे सर्वथैव मोह न पावतां यवोदरप्रमाण भूमि तेहि इनाम देऊं नये." (४१-१४-१६).

शिवाजीच्या या सरंजामशाहीविरोधी धोरणाचा अनेक लेखकांनी उल्लेख केला असून त्यावर विवेचनही केले आहे; त्यात डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांचा 'मराठयांची प्रशासनपद्धति' हा ग्रंथ उल्लेखनीय आहे या महासत्याची ओळख करून घेतल्यानंतर सामंतशाहीविरोधी या प्रवृत्तीचा उगम शिवाजीच्या ठायी का आणि कसा झाला याची मीमांसा करण्याकडे साहजिकच आपली प्रवृत्ती होते. शिवाजीचा सामंतशाहीविरोधी लढा हा निष्कारण नव्हता. त्याची कृत्ये हेतुशून्य नव्हती किंवा केवळ स्वोत्कर्षाच्या वैयक्तिक उद्देशानेही ती प्रेरित झालेली नव्हती. तैमूर आणि नादीरशहा यांच्यासारखा तो जुलमी हुकूमशहा होऊ शकला असता किंवा अलेक्झांडरसारखा, अजिंक्य सैन्याच्या बळावर देश-विदेशात भरधाव धुमाकूळही तो घालू शकला असता. परंतु त्याची प्रतिभा

विधायक होती. हावऱ्या आणि जुलमी मनोवृत्तीचे युद्धपिपासु सरदार आणि कार्यक्षम सेना यांच्या बळावर लष्करशाही स्थापन करण्याचे शिवाजीचे ध्येय नव्हते. सामंतशाहीच्या अवशेषातून एक समर्थ, कणखर आणि प्रगतिशील राष्ट्र निर्माण करण्याची त्याची इच्छा होती. तेव्हा कोणत्या पायाभूत तत्त्वांवर आणि कोणत्या उद्देशाने नवीन राष्ट्राच्या उभारणीचे कार्य त्याने चालविले हे पाहणे उचित ठरेल.

जर आपण परत समकालीन कागदपत्रांचा आणि वर उल्लेखलेल्या तीन आधारग्रंथांचा संदर्भ घेतला तर शिवाजीच्या धोरणाची गुरुकिल्ली आपणास मिळू शकते. व्यापारी साहुकार आणि उद्योगपती यांचे राज्यातील महत्त्वपूर्ण स्थान, या विषयावर आज्ञापत्रात एक प्रकरण आहे. त्यामध्ये लेखक या वर्गा-बद्दल अत्यंत आस्था दाखवितो आणि म्हणतो की साहुकारांना आश्रय दिल्याने राष्ट्राची नितान्त भरभराट होते. आपण लेखकाचे मूळ शब्दच इथे देऊ. "साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा......या करितां साहुकाराचा बहुमान चालवावा." (३३.१–६.) जर या विवेचनात शिवाजीचे धोरण प्रति-बिंबित होत असेल—आणि तसे ते होते यात शंकाच नाही, कारण समकालीन पत्रव्यवहाराचा स्वतंत्र पुरावा या संबंधात उपलब्ध आहे—तर आपण या उघड व प्रायशः योग्य निर्णयाप्रत पोचू शकतो की शिवाजीला व्यापारी, सावकार आणि उद्योगपती यांच्याविषयी मोठे आकर्षण होते. राजवाड्यांच्या ८ व्या खंडात, तसेच इतरत्रही प्रसिद्ध झालेली अनेक पत्रे शिवाजीने अत्यंत काळजीपूर्वक आणि कळकळीने वाणिज्य आणि व्यापार यांना उत्तेजन देण्याचे जे प्रयत्न केले त्याची साक्ष देतात. उत्पादन, वाहतूक, जकात आणि विक्री या व्यापारउदिमाच्या विभिन्न विभागांकडे शिवाजीचे सूक्ष्म अवधान होते, याचे दाखले मुबलक आहेत. रोकड द्रव्य आणि सोनेचांदी यांच्याविषयीचा त्याचा हव्यास आणि त्याची संचयप्रवृत्ती यांचीही साक्ष अनेक ठिकाणी मिळते. या सर्व गोष्टी हे दर्शवितात की पैसा हे आपल्या शासनयंत्राचे मुख्य आधारभूत तत्त्व बनविण्याचा सुसंगत प्रयत्न शिवाजी करीत होता.

याप्रमाणे पाहिले असता शिवाजीचे राज्यधोरण आणि त्याची कृत्ये यात अंतर्गत असा काही एक अर्थ असावा असे आपणास भासू लागते. आधुनिक आणि अधिक कार्यक्षम अशा पायावर समाजाची पुनर्रचना करण्याचा त्याचा

प्रयत्न होता. सरंजामशाहीपासून हुकूमशाहीच्या द्वारा अर्थप्रधान राजसत्तेकडे (plutocracy) वळण्याची त्याची कोशीस होती.

शिवाजीचा उदय आणि उत्कर्ष हे हिंदुत्वाचे पुनरुज्जीवन होय अशी सर्वसाधारण धारणा आहे. आणि एका अर्थाने ती खरीही आहे. शिवाजी हा कट्टा हिंदु होता आणि तो हिंदु संस्कृती आणि परंपरा यांना पूज्य लेखीत होता यात शंका नाही म्हणून हिंदुधर्म आणि संस्कृती यांना शिवाजीच्या कारकीर्दीत फार मोठे उत्तेजन मिळाले आणि त्यांची काळजीपूर्वक जोपासना करण्यात आली, हे साहजिक होते. परंतु या सव गोष्टी ओघाने आल्या. धर्मविषयक उत्कट उत्साह हे शिवाजीच्या कार्यांचे मुख्य स्फूर्तिकारण होते असे मानणे बरोबर होणार नाही. जे वाचक आज्ञापत्र, सभासद बखर आणि इतर समकालीन कागदपत्रे यांचे काळजीपूर्वक वाचन करतील ते या निष्कर्षाप्रत कधीही पोचणार नाहीत की शिवाजीचे सर्व पराक्रम आणि त्याचे विधायक कर्तृत्व हे केवलमात्र धार्मिक भावनेनेच प्रेरित झालेले होते. त्याच्या धोरणाची गुरुकिल्ली इतर कोणत्या तरी क्षेत्रात शोधिली पाहिजे. आणि ते क्षेत्र म्हणजे आर्थिक क्षेत्र होय. शिवाजीचा उदय हा वास्तविक आर्थिक कारणांमुळे झालेल्या मोठ्या राजकीय सामाजिक क्रांतीचा निदर्शक होय.* स्वजनांवर जुलूम करणाऱ्या आणि विजापूरच्या तख्ता-

---

* हा मजकूर २१ वर्षांपूर्वी लिहिलेला आहे. जो नवीन मुद्दा मांडावयाचा होता त्यावर साहजिकपणे त्या वेळी भर दिला गेला. महाराजांच्या गाढ धर्मश्रद्धेसंबंधाने उपोद्घातात जे लिहिले आहे ते या मजकुराबरोबरच लक्षात ठेवले म्हणजे महाराजांच्या प्रेरक तत्त्वांचे चित्र संपूर्ण होईल. परंपरागत कल्पनांना आणि रूढींना पोटात घेऊन वर जाणारी सनातन व्यापक आणि शाश्वत धर्माच्या प्रतीतीने उज्ज्वल बनलेली धर्मश्रद्धा 'आज्ञापत्रा'त ठायी ठायी दिसून येते. तेव्हा ही उदात्त आध्यात्मिक धर्मश्रद्धा, इतर कारणांबरोबरच त्यांच्या उद्योगाचे प्रेरक कारण होती, यात शंका नाही. ज्या इतर प्रेरक कारणांचा वराल निबंधात उल्लेख केला आहे, त्यांचे महत्त्व कमी नाही. पण त्या सर्व कारणांचा धर्मश्रद्धेशी समन्वय साधूनच त्यांनी आपला स्वराज्यसाधनेचा उद्योग केला हे आज्ञापत्रावरून स्पष्ट दिसते. सामाजिक उत्क्रांतीची घोडदौड केवढीही दांडगी असली तरी त्यात सनातन नीतितत्त्वांवर आणि ईश्वरशरणतेवर आधारलेल्या शाश्वत धर्माची कास सुटता कामा नये हेच 'आज्ञापत्रा'त काय आणि आपल्या चरित्रात काय, त्यांनी बजावले आहे.

समोर निमूटपणे नमणाऱ्या बेलगाम सरंजामदारांच्या बेबंदशाहीविरुद्ध सामान्य जनतेने केलेला तो उठाव होता. आनुवंशिकता, कुलपरंपरा आणि वंशाभिमान यावर आधारलेल्या समाजव्यवस्थेऐवजी द्रव्यशक्तीवर आधारलेली समाजव्यवस्था शिवाजीला प्रस्थापित करावयाची होती. जनतेतील असंतोषाचा त्याने आपल्या या उद्देशाच्या पूर्तीसाठी अत्यंत चतुरपणे उपयोग करून घेतला.

या सर्व गोष्टींचे महत्त्व शिवकालीन जागतिक परिस्थितीचा पडताळा घेतल्यास अधिक स्पष्ट होईल. युरोपमध्ये १५ व्या शतकात सरंजामशाहीचा ऱ्हास झाला. या शतकाच्या समाप्तीबरोबर सरंजामशाही समाजरचना विरून गेली आणि तिच्या जागी ख्रिश्चन धर्मसत्तेचा पाठिंबा असलेली राजेसम्राटांची एकसत्ताक राज्यपद्धती पश्चिम युरोपातील प्रमुख देशात अस्तित्वात आली. परंतु लवकरच पोपच्या धर्मसत्तेला आव्हान देण्यात आले आणि धर्मक्रांतीने (Reformation) बहुजनसमाजाच्या उदयाचा पुकारा केला. कलावंत, कारागीर, शेतकरी, खलाशी आणि छोटा व्यापारी––हा सारा समाज धार्मिक जुलूमशाहीच्या विरुद्ध बंड करून उठला. इंग्लंडच्या एकतंत्री राजसत्तेने धार्मिक सत्तेपासून आपली मुक्तता इतर देशांच्या मानाने बरीच अगोदर करून घेतली. राजसत्तेला धर्मसत्तेपासून अलिप्त ठेवण्याचा प्रयोग आठव्या हेन्रीने सुरू केला आणि एलिझाबेथने तो संशयातीतपणे यशस्वी करून दाखविला. सोळाव्या शतकात इंग्लिश दर्यावर्दी खलाशांच्या दर्यातील यशस्वी साहसाने सर्व इंग्लिश राष्ट्राला आपल्या भाग्योदयाची दिशा कोणती याची सूचना दिली आणि सुदैवाने राजा आणि प्रजा यापैकी कोणीही त्या सूचनेची उपेक्षा केली नाही. आणि म्हणूनच ज्यावेळी इतर देश सरंजामी सत्तेचे अवशेष, धार्मिक जुलूम आणि सामान्य जनांचा उठाव यामधील अटळ अशा परस्परविघातक कलहात ढवळून निघत होते, त्यावेळी इंग्लंडने व्यापार आणि वाणिज्य यात आपले भाग्य आहे हे जाणले आणि ह्या संपत्तिसंपादनाच्या उद्योगास अधिकाधिक प्रमाणात वाहून घेतले; इतके की, शेवटी "पोलियन उपहासाने परंतु सार्थपणे उद्गारला की 'इंग्लंड हे केवळ व्यापाऱ्यांचे आणि दुकानदारांचे राष्ट्र आहे." नेपोलियनच्या या उक्तीतील सत्य हे निर्विवाद होते पण त्यातील उपहासाचा सूर मात्र समर्थनीय नव्हता. कारण हे व्यापाऱ्यांचे राष्ट्रच काय ते एकटे नेपोलियनच्या लष्करी साम्राज्यशाहीला अटकाव करू शकले. वाणिज्यवृत्ती इंग्लंडचा पैसा आणि सकसपणा यांनीच अखेर नेपोलियनचा पाडाव केला. आणि

हे अटळ होते. केवळ लष्करी सामर्थ्याच्या बळावर उभे असलेले साम्राज्य जेव्हा वाणिज्यवृत्तीच्या अल्पजनसत्ताक राष्ट्राशी टक्कर घेते तेव्हा ते कोसळून पडलेच पाहिजे. कारण एकंदरीने पाहिले असता वाणिज्यवृत्तीतून निर्माण झालेली अर्थप्रधान राज्यसत्ता (plutocracy) सरंजामशाही किंवा लष्करी हुकूमशाही यांच्यापेक्षा मानवी समाजाच्या उत्क्रांतीतील अधिक प्रगत अवस्था होय.

शिवाजीने आपल्या प्रतिभाबलाने हे जाणले होते. त्याने सरंजामी सत्ता समूळ नष्ट करून त्याऐवजी अशी एक समाजव्यवस्था प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला की जी त्या वेळची हिंदुस्थानातील परिस्थिती लक्षात घेता फारच पुढे गेलेली होती. एकतंत्री राजसत्ता तो सरळ प्रस्थापित करू शकला. परंतु तेवढ्यावरच तो समाधान पावला नाही. महाराष्ट्रावर अप्रतिहत सत्ता राखण्याकरिता समर्थ नाविक दलाची काही आवश्यकता नव्हती. आपण जाणतो की अखिल हिंदुस्थान पादाक्रांत करण्याचे मनसुबे करणाऱ्या पेशव्यांनी नाविक दलाकडे लक्ष दिले नाही; इतकेच नव्हे तर आरमार दुर्बल करण्यास ते कारणीभूत झाले. स्वतंत्र आरमार उभारणे, ही शिवाजीच्या—आणि मराठ्यांमध्ये केवळ शिवाजीच्याच--सर्वोत्कृष्ट कल्पनांपैकी एक होती. व्यापारी आणि सावकार यांच्याविषयीच्या त्याच्या आस्थेचेंदेखील इतर कोणत्याही प्रकारे स्पष्टीकरण देता येणार नाही. जो कोणी आज्ञापत्रातील साहुकार आणि आरमार यावरील प्रकरणे वाचील त्याला, नवीन समाजरचनेच्या ध्येयातून ज्याला प्रेरणा मिळाली आहे असे मिशन त्यात व्यक्त होत आहे, याची खात्री पटल्यावाचून राहणार नाही. कित्येक समकालीन पत्रे याच निष्कर्षाला बळकटी आणतात. या लेखाच्या संकुचित मर्यादेत प्रस्तुत लेखक आपल्या युक्तिवादाच्या पुष्ट्यर्थ प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांचे पुरेसे संदर्भ दाखल करू शकत नाही. परंतु आवश्यकता भासल्यास ते सहज दाखविता येतील. नगद पैशाच्या मोबदल्याशिवाय कोणतेही व्यवहार होऊ नयेत याविषयी शिवाजीने दाखविलेली दक्षताही या संदर्भात नमूद करण्यासारखी आहे. गुलामी ही सामंतशाहीची आणि लष्करी हुकूमशाहीची देखील सांगातीण होय. आणि हे प्रसिद्धच आहे की माणसामाणसामधील सर्व व्यवहार हे परस्परातील कराराच्या पायावर व्हावे असा शिवाजीचा आग्रह होता. अगदी लहानशी सेवा किंवा लहानशी वस्तूदेखील तिचा पैशात मोबदला देऊनच घ्यावी अशी त्याची आज्ञा होती. पैसा आणि भांडवल

यांच्या पायावर आधारलेल्या समाजमूल्यांचा नवा मनु अस्तित्वात आणण्याचा जर हा प्रयत्न मानावयाचा नसेल तर मग या गोष्टी कशाच्या निदर्शक मानावयाच्या ?

शिवाजीच्या क्रांतदर्शी प्रतिभेची ही साक्ष आहे की त्याने जागतिक घटनांच्या मागील प्रवृत्तीचा वेध घेतला--मग तो त्याने उपजत अंतःस्फूर्तीने घेतला असो अथवा डोळस ज्ञान आणि अनुभव यांच्या जोरावर घेतला असो-- आणि त्याने सर्व गोष्टींना असे वळण देण्याचा प्रयत्न केला की त्यामुळे नवा मनु अवतीर्ण व्हावा. जर त्याचा प्रयत्न यशस्वी झाला असता तर भारतीय समाज, निदानपक्षी मराठे, सामाजिक उत्क्रांतीच्या अनेक पायऱ्या चढून वर गेले असते. अशा रीतीने भारतीय समाज काळाच्या बरोबरीने प्रगतिशील राहिला असता आणि सर्वांच्या पुढे आघाडी मारणाऱ्या वाणिज्यसमृद्ध पाश्चात्य राष्ट्राशी संघर्ष होण्याचा लवकरच जेव्हा प्रसंग आला तेव्हा या समाजाने त्या संघर्षात टिकाव धरला असता. परंतु असे व्हायचे नव्हते. शिवाजी आपल्या काळाच्या फारच पुढे होता. तो स्वतः अल्पायुषी ठरला आणि त्याच्या कल्पना समाजमनात भिनल्या नाहीत. त्याच्या मृत्यूनंतर लवकरच देश परत सरंजामशाहीच्या पकडीत गेला. देशमुख, देशकुलकर्णी या जुन्या काळातील लोकांची जागा नव्या काळातील इनामदार, मनसबदार, जहागिरदार या नव्या लोकांनी घेतली. आणि जुनी चाकोरी परत सुरू झाली. शिवाजीने जागृत केलेला आत्मविश्वास आणि अस्मिता मोठे प्रशस्त नव्हेत असे मार्ग चोखाळू लागली. निर्माण झालेला नवीन जोम आणि धडाडी शेजारचे प्रांत पादाक्रांत करण्यात आणि सरंजामी मांडलिक राज्ये स्थापन करण्यात खर्च झाली. अर्थात जेव्हा पश्चिमेकडून आलेल्या राष्ट्रीय वाणिज्यवादाशी टक्कर देण्याचा प्रसंग आला तेव्हा सरंजामशाहीच्या काही निकृष्ट अशा लक्षणांनी युक्त असलेला मराठी राज्यांचा संघ डळमळीत होऊन कोसळून पडावा हे भाकित पूर्वीच ठरून गेले होते !

विख्यात मराठी कवी मोरोपंत यांनी एके ठिकाणी असा मार्मिक उद्गार काढला आहे : 'करिती जतन वतन, पतन मत न भल्याला, तथापि तें वरिती ।' मराठ्यांच्या शिवाजीनंतरच्या इतिहासाला हे किती अचूकपणे लागू पडते ! स्वतःच्या वतनाचे संरक्षण करण्याच्या प्रयत्नात त्यांनी सर्वनाश ओढवून घेतला !

● ●

परिशिष्ट २

# पाठभेद आणि पाठचर्चा

राजवाडे संशोधन मंदिरातील दोन हस्तलिखित प्रती (*रा१*, *रा२*) समर्थ वाग्देवतामंदिरातील एक प्रत (*स*), वि. ज्ञा. वि. मध्ये १८७२-७४ मध्ये छापलेली प्रत (*वि१*) आणि वि. ज्ञा. वि. मध्ये १८९०-९१ मध्ये छापलेली प्रत (*वि२*), अशा पाच प्रतीतील पाठभेद येथे दिले आहेत.

ज्यांच्यामुळे अर्थात किंवा मतलबात फरक पडत नाही असे शब्दांचे रूपभेद, लिंगभेद, वचनभेद, कालभेद येथे बहुशः नमूद केलेले नाहीत.

पाठभेद नमूद करण्याची जी पद्धती येथे अवलंबिली आहे तिचे स्पष्टीकरण केले पाहिजे. पाने व ओळी यांचे आकडे आरंभी दिले आहेत व त्यापुढे पाठ दिले आहेत. पानांना मोठा व ओळींना लहान जबरा टाइप वापरला आहे. प्रत्येक पानाला स्वतंत्र परिच्छेद दिला आहे. पानाचा आकडा प्रत्येक पाठाच्या पूर्वी पुनरावृत्त केलेला नाही. प्रस्तुत आवृत्तीच्या अधिकृत संहितेतून उद्धृत केलेले शब्द सर्वत्र लहान जबऱ्या टाइपात छापले आहेत. त्यांच्यापुढे डॅश देऊन पाठभेद साध्या टाइपात नमूद केले आहेत व त्यापुढे ज्या प्रतीतला पाठभेद असेल त्या प्रतीचे सांकेतिक चिन्ह तिरकस (इटालिक) टाइपात छापले आहे. सांकेतिक चिन्हांचा खुलासा प्रस्तावनेत केला आहे.

अधिकृत संहितेचा उद्धृत मजकूर इतर प्रतीत नसेल तर ० हे चिन्ह करून त्यापुढे त्या प्रतींची सांकेतिक चिन्हे दिली आहेत. अधिकृत संहितेत नसलेला मजकूर इतर प्रतीत असेल तर अधिकृत संहितेतील कोणत्या शब्दाच्या पूर्वी अगर नंतर तो मजकूर आहे हे चौकोनी कंसात निर्दिष्ट केले आहे. एखाद्याच

प्रतीमध्ये भिन्न शब्द अगर शब्दरूप असेल तर तेही चौकोनी कंसात नमूद केले आहे. अधिकृत संहिता मुख्यतया *रा१* वरून तयार केली आहे. बाकीच्या चारही प्रतींमध्ये एकच समान पाठ असेल तर त्या सर्वांची सांकेतिक चिन्हे न देता एकच √ असे चिन्ह केले आहे.

एक पाठभेद संपल्याची खूण म्हणून । अशी उभी रेघ दिली आहे.

पाठांच्या युक्तायुक्ततेची चर्चा गोल कंसात ( ) केली आहे. ती करिताना अधिकृत संहिता आणि *रा१* प्रत ही एकच आहेत असे गृहीत धरले आहे.

एकंदर पाठभेदांचे जर अवलोकन केले तर असे दिसून येईल की √ या चिन्हाने अंकित म्हणजेच *रा१* शिवाय बाकीच्या सर्व प्रतींना समान असे पाठभेद बरेच आहेत. यावरून असे दिसते की प्रबंधाच्या मूळ प्रतीवरून बऱ्याच निकृष्ट पाठांनी युक्त अशी 'अपकारित' प्रत कोणा तरी वजनदार परंतु अजाण इसमाने तयार केली–करविली–असावी आणि तिच्याच पुढे अनेक प्रती झाल्या असाव्या. त्यातल्या त्यात *वि१* आणि *वि२* यांच्यामध्ये साम्य अधिक दिसते. तरी त्या दोन भिन्न हस्तलिखितांवरून छापल्या आहेत असे म्हणण्यास आधार आहे.

हस्तलिखिते फार थोडी उपलब्ध असल्यामुळे पाठपरंपरांची कुले किंवा वृक्ष अनुमानिण्याइतपत सामग्री उपलब्ध होत नाही. *रा१* व *रा२* या दोन पाठ-परंपरा निर्देशिता येतात; पैकी *रा१* ही पूर्वकालीन व उत्कृष्ट आणि *रा२* ही उत्तरकालीन निकृष्ट, इतकेच सध्यापुरते (tentative) विधान करता येते. इतर प्रती *रा२* च्या परंपरेतील दिसतात.

---

१. ४ ['रामचंद्र' नंतर] निलकंठ *स* । ७ विज्वर—विडवर *रा१*, विडूवर *वि१*. (मूळ प्रतीत विज्वर असे असले पाहिजे; 'ज' चे टोक वर झाल्यामुळे ड चा भास होऊन कोणा तरी नकलकाराने विडवर असे लिहिले, त्यावरून हा पाठ सुरू झाला, असे दिसते.) । ९ आपल्या––आपल्याला √ । १० अवसान *वि२* । ११ सोडोन––सांडून *रा२* । १३ प्रवाहीं पडिले––पंथास लागले *वि१* ।

२. १ कीर्ति––० *स* । ४ ['ज्या' पूर्वी] त्यांस *रा२ वि१ वि२* । ४ होते, ज्या उपायें त्यांचें मनोधारण करावें––० *स* । ५ उपायें––विचारें *रा२ वि१ वि२* । ५ करून—केली *रा२ वि१ वि२* । ५,६ त्यांचे [त्याच

*वि२*] विचारें बुद्धीने बुद्धी—आणि हळूहळू विचारबुद्धि *वि१*। ७ राज--० √। ८ शासन *रा२ स वि२*। ८ ['प्रजा' पूर्वी] सकल √। ८ सकल --० √। ८ क्षुद्रोपद्रवविषयीं--क्षुद्रोपद्रवादींविषयी *वि२*। ८ ['निश्चिंती'-पूर्वी] [तसेच *वि२*] परचक्रादि महदरिष्टविषयी √ (*रा१* ही प्रत सर्वांत अधिक विश्वसनीय व मूलानुसारी असे वाटावयास लावणाऱ्या अनेक पाठांपैकी हा एक होय. परचक्राचे निरूपण पुढे आहे. तेव्हा हे शब्द इथे मागाहून घातलेले दिसतात.)। ९ होऊन--होत्साते √। १२ ज्या--० *वि२*। १३ असतां हतप्रभ होऊन गेला, तें हें राज्य. औरंगजेब याणे--० *वि१*। १३ हतप्रभ होऊन--हतप्रभव होऊन यमालयास *स वि२*। १५ श्रीकृपाकटाक्षाने √। १५ होऊन--जाहले *रा२ स वि२*, झाले *वि१*। १६ हतोत्साह—० √। १५, १६ यमालयासी √। २१ होणें--० √। २२ समर--० √ (समर शब्द इथे अवश्य आहे. *रा१* ची श्रेष्ठता उघड आहे.)। २३,२४ देश निराश्रयित...इतर --० √ (हे दृष्टिभ्रमाचे सुंदर उदाहरण आहे. तोच शब्द थोड्याशा अंतराने पुन्हा आला म्हणजे कित्येकदा नकलकाराची नजर चळून पुढच्या शब्दावर जाते आणि मधले शब्द गळतात. इथे देश शब्द पुनरुक्त झाला आहे; तेव्हा नकल-काराची नजर चळली व पहिल्या 'देश' पासून दुसऱ्या 'देश' पर्यंतचे शब्द गळले. अशा रीतीने एक चुकीची पाठपरंपरा निर्माण झाली. या पाठात 'कितेक' हा शब्द अर्थाला जुळत नसल्याचे उघड दिसते.)।

३. १, २ (या श्लोकांत प्रत्येक प्रतीत निरनिराळे पाठ आहेत व ते अशुद्ध आहेत. प्रस्तुत आवृत्तींतील पाठातही प्रथम द्वितीय अर्धांमध्ये वचनाची विसंगती आहे.)। ३ शरीरास्था न पाहतां--० √। ५ कितेक स्वामी शत्रुसमर--स्वस्वामी शत्रुसम- *रा२ स वि२*,--शत्रुसेना- *वि१* ('समर' हा पाठच योग्य आहे, हे सहज लक्षात येण्याजोगे आहे.)। ६ पाहून--पावोन *रा२ स वि१*। ७, ८ प्रत्यक प्रत्यक स्तोमें--प्रत्येक स्तोमें *स*, प्रत्येक प्रतिस्तोम *वि१*, प्रत्येक प्रतींदु *वि२*। १० उद्वस--उद्वंस *रा२*, विध्वंस *स वि१*, उध्वंस *वि२*। १० सांग्रामिक--संग्राम *वि१ वि२*। १४ श्रीइच्छा—ईश्वर [-री *वि१ वि२*] इच्छा √। १६ तीर्थरूप थोरले--तीर्थरूप थोरले सिवछत्रपती *रा२*, तीर्थरूप [तीर्थस्वरूप *स*] श्रीमन्महाराज शककर्ते *स वि१ वि२*। १६ साहसें —सायासे *रा२*। २० ['या अर्थें' नंतर] तीर्थरूप श्रीमन्महाराज शककर्ते

कैलासवासी यांणी केलेला उद्योग सर्वही चित्तात आणिला, त्यास √ २० तीर्थरूप कैलासवासी महाराज साहेब––तीर्थरूप [तीर्थस्वरूप स] श्रीमन्महाराज शककर्ते छत्रपतिसाहेब स वि१ वि२, तीर्थरूप राज राजाराम छत्रपति कैलासवासी रा२। २१ स्वास्ता—स्वस्ता रा२, स्वस्था स, स्वास्था वि१।

४. १ आयुर्मर्माणि रक्षन्ति √ (हा पाठ बरोबर नाही. वास्तविक आयुः हा कर्ता, मर्माणि हे कर्म आहे. तदनुसार रक्षति असे क्रियापद पाहिजे.)। २ गांडीविनो मतमिदं √। ६ [‘कल्पवेना’च्या पूर्वी] मनेंहि √। ७ नवाजून––नवजुने रा२, नावाजुन स, नवे नेमून वि१, नवेजुने वि२। ७ भार––० रा२। १० त्या हातून––त्या त्या हातून रा२ स, त्या त्यांच्या हातून वि१, त्यांच्या त्यांच्या हातून वि२। १४ जवार–– वलंदेजवार रा२, वलंदेज स वि१ वि२ (रा१ मध्ये ‘वलंदेज’ नाही, ‘जवार’ आहे, तेच शिवचरित्राच्या दृष्टीने योग्य आहे.)। १४ बिदरूर रा २। १२ पाळेगार––० √। १६ सुरवे...भालेराव ––० √। १७ माने––० √। १७ कांटक—काटक √। १७ सज्जुते वि१, सज्ज ते वि१। १८ सामान फार स, सामानपुरे वि१, सामान पुरें वि२। २४ आपले––० √। २५ जे––० √। २५ नाकळेत––नाकलेते रा२, नाकळते स, नकळत वि१, नाकळतें वि२।

५. १ पराक्रमें करून––आक्रमेकडून रा२, अक्रमेकडोन स, अनुक्रमें वि१, आक्रमें आंकडून वि२। १ श्रयित—सहित √ (५. १ मधील दोन्ही जागी रा१ चेच पाठ सर्वोत्कृष्ट आहेत, हे उघडच आहे)। ३ आकळावा—आला त्यासी रा२। ५ चंदी —चंजी √। ६ तैसींच जलदुर्गें—तैसेच जलदुर्ग √ (दुर्ग शब्द संस्कृतास अनुसरून रा१ मध्ये नियमाने नपुं. योजिलेला आढळतो. रा२ मध्ये यासंबंधाने अनियम आढळतो. वि१ वि२ हा शब्द पुं. योजितात.)। ६ विषम—विशाल √ (उघडच रा१ पाठ सरस आहे.)। ६ हस्तगत केलीं-–० ✓। ९ मराठियांचा––म्हराटे याचा रा२, मऱ्हाटे याचा स। १५, १६ महाशत्रु...विख्यात —महाशत्रूस परितापसागरी निमग्न करून दिगांत विख्यात करून रा२, महान शत्रु परितापसागरी निमग्न करून... स वि१ वि२।

## प्रकरण २

६. १ [आरंभी] त्यास, रा२ वि२। १ राजश्री थोरले कैलासवासी—

तीर्थरूप [ तीर्थस्वरूप स ] श्रीमन्महाराज शककर्ते स वि१ वि२। १ स्वामी— तीर्थरूप कैलासवासी स्वामी रा२, तीर्थरूप श्रीमन्महाराज स्वामी कैलासवासी वि१ वि२, तीर्थस्वरूप श्रीमन्महाराज कैलासवासी स। ५ तदुत्तर—तदनंतर वि१। ५ त्यांचेच—त्यांचे रा२ वि१ वि२, त्याच स। ६ कार्यें—कार्य √। ८ त्या—०वि१ वि२। १२ मांडलिक देशाधिकारी यांस √। १३ या—० रा२ वि१ वि२। १३ [ 'व' नंतर ] या राज्यांतील बुद्धि व या राज्यांतील √ [ 'या या' वगळून वि१, वि२ ] १७ तिलांशहि—तिलौसीही रा२, ते कैसेंही स, तिलमात्रही वि१।

७. १ शासनें अधिक—शासन अधिकाधिक √। २ आवघी—० √। २, ३ [ 'केवळ अनाथ होऊन कितेक' यानंतर ] फिरो लागले स, गेलो वि१, गेले वि२ [ वि२ मध्ये 'केवळ' नाही ]। ७. ३ 'विदेशास गेले' एथपासून ७. १९ 'विचार घेतला' एथपर्यंतचा मजकूर रा२ स वि१ वि२ मध्ये नाही. रा२ 'कितेक' याच्या पुढे प्रकर्ण २' असा शेरा मारून प्रकरण संपवितो। २३ नूतनच—० वि२। २३ कार्यकर्ते नवाजिले—कार्यकर्ते पाहून नावाजिले √।

८. १ अमर्याद—अवमर्यादा वि२। ३ वृद्धि—बुद्धि वि२। ७ राहिलें,— राहिलें होतें √। ९ यैसे लोक—लोक रा२ वि१ वि२, ० स। १२ सामानपूर— सामानें फार स, सामान पुरें वि२। १३ पुन्हा—० वि२। १४ इराखी— इलाखी √। १६ दुरुस्तंदाज—दुरसंदाज रा२ स, तुरसंदाज वि१ वि२। १६ तोरसाली—तारसाली वि१ [ —ळि स ]। १८ दुराव्या—दुराव्या वि२। २० सजला—सज्जिला वि२। २१ पराक्रांत—पराक्रमांत वि१।

९. ४ तख्ताची—तक्षकाचा वि२। ७ [ 'तीर्थरूप' ( तीर्थस्वरूप स वि२ ) नंतर ] राजश्री थोरले √। १० शामलाने अवशिष्ट ( अवशेष वि१ ) उरावें— शामल सावशेष उरला वि२। १२ करितो—करिते रा२ वि२। १८, १९ त्याचीं...निग्रह करून—० वि२। २० कंटकभूत—संकटभूत वि१ वि२। २५ श्रीकृपेने सिद्ध जाला यावर—श्रीकृपे सिद्ध बाहल्यावरी √।

१०. १ अवनी—यवनी √। ४ प्रेरून—करून वि१ वि२। ५ गतराज्यं संपूर्ण आक्रमिली रा२, गतराज्यें संपूर्ण राज्य आक्रमिलें वि२। ६ स्वारी— स्वामी √। ७ सेनानायकास...मारून—सेनानायकास ससैन्य मारून रा२ स, सेनानायकांसह सैन्य मारुन वि१ वि२। ७, ८ तें स्थळ—ते स्थळे रा२।

१० घेतलें–गेले √। ११ तुमुल-तुंबळ √। १३ बलवर्धिष्णु वि१। १४ बलिवंत–बलिवत्तर रा२, बलोत्तर स। १२-१४ [ 'यवनांनी...अशेष' या मजकुराऐवजी ] यवनांची जीविताशेष वि२। १८ करून–० √। १९ ध्वज...जाहले ध्वजें...जाहलीं √। १९ श्री–०√। २० [ 'स्वामीचा' नंतर ] जैसा √। २१ श्रीदयेने–श्रीदयातिरेके √। २१ लोक-केला स वि१। २१ स्वामीचे–स्वामी √। २२ सेवक—०। २३ पावला—पावले वि१।

११. ४ करून–करितो √। ४ नयभयें–नयेभये रा२, निर्भय स, नयें भयें वि१, जयभयें वि२। ७ झुंझ या प्रांतींच–झुंज याचे प्रांते रा२, झुंझ याच प्रांते स, झुंजावयाचे प्राप्त पडतें वि१ वि२। १० द्वैधाभाव रा२ स वि१ द्वेधाभाव वि२। १३ त्या—० √। १४ अचिरकालेंच-आर्चिकालेंच रा२ स वि२, अल्पकालेंच वि१। १५ ढकांभकर–ठष्ठाभकर रा२ स, ठष्ठा जलकर वि२, बागा कष्ठाभल्लारा वि१। १८ [ 'मातुश्री' नंतर ] साहेब दक्षिण प्रांतास √। २० असेत--आहेत √। २१ वाड्मनसा--वाचा मनसा वि१।

१२. १ कळलीच आहे - कळविलीच आहे वि१, कळलीच असली पाहिजे वि२। ३ व तुम्हावर--० √। ३ करणें--करावें √। ४ सेवक- ० वि२। ४ तीर्थस्वरूप स। ४ [ 'तीर्थरूप' पूर्वी ] शकर्ते वि२। ४ [ 'तीर्थरूप' नंतर ] राजश्री √। ५ तुम्हावरी--तेव्हा वि१ वि२। ७ [ 'चिरंजीव' नंतर ] राजश्री √। ७ तदनुसार या--० √। ८ सुशिक्षित--सुरक्षित रा२। ८ ठेविले-० वि१ वि२। १० आज्ञापत्रावरून वि१ वि२। ११ राजश्री-०√। १३ करावें--कर्णे, करणें √।

## प्रकरण ३

१४. ३ सकलांच्या--पुष्कळांच्या स वि२। ३ भिन्न--० √। १० ते कोणाच्याने--तेव्हां, ते इतराच्यानें वि१।

१५. १ वडील वडील-वाडवडील वि२। ४ च-० वि१ वि२। ६ नेमीत–नियमित √। ७ देव तायतनें—देवता वेतनें √ (रा१ पाठ सरस आहे हे उघड आहे. नकलकाराला आयतन शब्द माहीत नाही, वेतन शब्द चांगला ओळखीचा; तेव्हा मुळात चूक असावी अशी त्याची कल्पना झाली!)। ९ जेथील तेथे–तेथील √। १० स्वांगें-स्वताच √। १६ दांभिक-० √।

१९ सर्वथैव—सर्वथा *रा२*, सर्वोपरि *वि२* । २४ निवांत--जिवंत √ (मोडी लिहिण्यात निवांत आणि जिवंत यात संदेह उत्पन्न होण्याची शक्यता आहे. पण या स्थली तसे नाही. *रा१* मध्ये 'निवांत' अगदी स्पष्ट, तितकेच *रा२* मध्ये 'जिवंत' निःसंदेह आहे. अर्थाच्या दृष्टीने निवांत हा पाठ सरस हे उघडच आहे. 'जिवंत' असे म्हणणे तर निरर्थकच आहे. अनाथ इ० लोक जर गडबड करू लागले, दंगाफिसाद करू लागले, तर त्यांना मदत देऊ नये हा अत्यंत समर्पक अर्थ 'निवांत' या पाठाने येतो.)। २५ असिजे तों—असती जो *वि१ वि२* ।

१६. २ अत्यंत--० *स* । ३ महालु --लहान *वि१* । ५ ठेवावे-ठेवून √ । ५, ६ ज्या कार्यास...उपयोग घ्यावा--० √ । ७ असेल तो—असतो *वि१ वि२* । ९ ['विषयीं' नंतर] कोणाची √ । १० आपला संशय...न पडतां-० *स वि१* । ११ ['सहात'च्या पूर्वी] तत्पर √। १३ निःसंशयपणें √ । १६ मनोदय- मनोभिप्राय √ । १७ दर्शनी ऐसे लक्षणीं होत असतां--दर्शनीय सलक्षणिक [ हातेवस्ता *रा२ स*, हस्तास्थ *वि१ वि२* ] √ । २३ प्रकार —प्रसंग √ । २३ ['ऊर्मिने' नंतर] बाहेर √ । २५ न करीत--० *स* ।

१७. ४ सेवकांस—लोकांस √ । ५ व्यतिरिक्त--विरहित √ । ५ राहूं—पाहूं *रा२* । खाली हात राहूं—खाली पाहूं *वि१ वि२* । ६ भेजणूक—भेदणूक *रा२* । ८ वर्जीस—वर्धिष्णु *वि१ वि२* । ९ मोचें—माच *स* । १२ करिजेतें--करावें *वि१ वि२* । १३ ['दिसते' नंतर] कार्याचें रूप आपणास अवगत असलिया [ अवगत--० *वि२*, अवगत असलिया--कळलें असल्याने *वि१* ] या दोन्ही गोष्टी होत नाही √ । १४ ['हुंनर' नंतर ] सकळही √ । १७ साधनीय तो कारभार--कार्यसाधनीयेतां कारभारी *रा२ स*, कार्यसाधनीयता कारभार *वि१ वि२* (मूलवाचनाच्या चुकीमुळे अस्तित्वात आलेला अर्थहीन पाठ) । १८ पर्डो--पणें *स* । १९ गुणिजन--गवई निजग्रही √ । १९ ['यांचें' नंतर] नित्य √ । २० त्यांतहि--महोत्साहामध्ये √ । २० ठाईं न करावें--जागीं नृत्य-गायनादि न करवितां √ । २० बाहेरील—बाहेरल्या बाहेर √ ।

१८. ४ केले—केलेले *वि२* । ४ कवित्वें यामुळें शांति-कवित्वामुळे शाश्वत √ ('कवित्व' याचा खरा अर्थ लक्षात न आल्यामुळे भलताच पाठ अस्तित्वात येऊन अर्थाचा बिघाड झाला.) । ८, ९ -प्रिय होणें हाहि दोषच— -प्रियता

(रा२ स) हाहि दोष मोठाच वि१ वि२ । ११ जन--० रा१ रा२ स । १९ [ 'मर्यादा' पूर्वी ] त्यांसी विनोद करितां विनोदांत √ (हा मजकूर कदाचित रा१ च्या लेखकाकडून नजरचुकीमुळे गळला असावा)। १९,२० अमर्यादा आपण--मर्यादा आपण उणी √ । २२ आपले—आपण √ । २३ चे—चा √ । २३ पाहावा वि२ ।

१९. १ बुद्धि--युक्ति √ । ३, ४ करून... नाहीत--असलियाने सेवक लोकांच्याने कार्याचे परिच्छिन्न वाईट गुणदोष बोलवत नाहीत √ । १४ धरावी--करावी √ । १५ [ 'करून' नंतर ] त्याप्रमाणे √ (अनवश्यक शब्द स्पष्टीकरणाच्या उद्देशाने मागून कोणी तरी घातलेला दिसतो.) । १६ कुटुंबी वि१ वि२ । १७, १८ जे वेतनाची मोईन असेल त्याच हुद्यावर— ० रा१ । १८ काय म्हणोन की—कां म्हणाल तर वि१ वि२ । २२ [ 'प्रतीचे' नंतर ] आहेत ते रा२ स वि१, जे [ त्या प्रतीचे ] आहेत वि२ । २२ येकासारखे येक आहेत, तेव्हा— ० वि२ ।

२०. ६ न--० √ (इथे रा१ पाठाची श्रेष्ठता उघडच आहे.) । ८ बोलावयास--चाकरांस म्हणावयास √ । १० सिरस्ते--दंडक √ । १३-पराक्रम प्रगट करण्याचें—पराक्रमाचें प्रगटीकरणाचें रा२ स वि१, क्रमेंच प्रगटीकरणाचें वि२ । १७ [ 'संपादिले' नंतर ] हुजरातीचे आसकारियावर [अधिकारियावर स] तितकियांसहि हुकुमांत वर्तविलें. √ । २० [ 'यैकावें' नंतर ] न आइकतां रा२ स वि१, न ऐकावें तर वि२ । २० योजिले—यामुळें वि२ ।

२१. ४ सरेखोर--शरेखोर वि१वि२ (वि२ मध्ये रे-वरची मात्रा किंचित सरकल्यामुळे 'शेरखोर' असा भास होऊन पुढच्या आवृत्त्यांमध्ये तसा पाठ अस्तित्वांत आला. शेर म्ह० वाघ यावरून हा शब्द बनला असावा अशी कल्पना बसविण्यांत आली !) । ९ सरदारांस–सैनिकांस √ । ठेविजेतें–ठेवीत वि१ वि२ । लोक— ० वि१ वि२ । १० [ 'तर' नंतर ] नाही वि१ वि२ । नाही तर–नाहीत रा१ । १५ एकावच्छेदें--एकसमयावच्छेदें वि१ वि२ । १६ फिरतां--फिरतेसमयीं वि१ वि२ । १७ [ 'उत्तम' नंतर ] प्रतीचें √ । २० नित्य–नित्य नित्य √ ।

२२. ६ मात्र--० √ । ८ [ 'नाही' नंतर ] कदाचित गेलियाने शासनासहि अंतर पडणार नाही √ । ११ [ 'कटारा' नंतर ] जमदाडा पटे भाले बांक बिचवे

सैत्या टाकण्या ✓। बंदुखादि-बंदुखी आदिकरून ✓। घुग्या टोप—० *वि१*। [ 'टोप' नंतर ] मुदटे *रा२ स*, दुपट्टे *वि१ वि२*। १७ संपादून मजबूद-सजून मजबुदींत ✓। १७ करीन—करील *वि१ वि२*। ऐसें चित्तांत आणिल्यास—० ✓। २३ सजावी-सजवावी *वि१ वि२*।

२३. ५ पडदिषाने—दरदीने *वि१ वि२*। निखालसपण पडत नाही—निखालसपणे पदरीं पडत नाहीत ✓। ६ [ 'मनुष्याचे' पूर्वी ] आपणासहि ✓ ध्यानांत-चित्तांत ✓। १२ कार्यकर्ते असलियस-कार्यकर्ते [ ही *वि१ वि२* ] उद्योगी ✓। नवाजोन-नावाजून ✓। १३ चालऊन—चालवीत जाऊन ✓। १५ [ 'त्याचें' नंतर ] घर ✓। २२ करितें-होते ✓।

२४. १ प्रसंग—प्रसंगीं ✓। २[ 'प्रसंगाचें' पूर्वी ] प्राप्त ✓। २, ३ त्या लोकांचें प्रोत्साहन प्रगल्भपणेच ✓। ५ आपले—० ✓। ११ शरीरचांचल्य [ चंचळ, *स* ] ✓। १८ या प्रकारविषयीं – प्रतिकारविषयींहि ✓। २० लोक—० *वि१ वि२*। २१ जवळील—जवळी [ जवळ ] ✓। शिक्षा करणार—० *वि२*।

२५. २ व पइलवान व बांकाईत पटाईत दांडाईत—० ✓ ( भेजणें परजणें या क्रिया पूर्वी वर्णिल्या, तदनुसार बांकाईत इ० शस्त्रनिपुण व्यक्तींचे दर्शक शब्द पुढे येणें हें क्रमप्राप्त होय. *रा२* मध्ये व त्यामुळे इतर प्रतींमध्ये नजरचुकीने हे शब्द गळले असावे.)। ८ इंदु...कल्पिला—हिंदु...कल्पिक *वि१ वि२*। ९ असावे लागतात *वि२*। १० श्रीदयेने ✓। ११ जावें-वजावें *रा२ स*। १३ सुज्ञ यैसे—सूक्ष्मज्ञ अशीं ✓। १६ भीड बहुत—बहुत भीड फार *रा२ स. वि१* [ फार—० *वि२* ]। २० [ 'दृढ' नंतर ] सोदक *रा२ वि१*, सोषक *स*, सांदक *वि२*। २१ तो वृक्ष—वृक्षाचे *वि२*। पावतें *वि२*।

२६. १ चांगले गुण सर्वांत—बहुतांत सर्वहि *रा२ स*, बहुधा सर्वहि *वि१ वि२*। ६ आणून—आणावा ✓। ७ आपण *रा२ स*। होतें—होतात *वि१*। ९, १० च्या...नाहीत—ची ... नाही *वि१ वि२*।

## प्रकरण ४

७. २ [ 'प्रजा संरक्षणें ' च्या पूर्वी ] प्रजार्तिनिवारण करणें *वि२* ( 'प्रजा संरक्षणें ' यांत सर्व येत असल्यामुळे हा पाठ निरर्थक भासतो. केवळ *वि२* मध्येच आढळतो. )।

२८. २ व्यय--० रा१ (नकलकाराची नजरचूक) ३ विचार--विवेक ✓। ५ ['करणें' नंतर] सतइति रा२ स, सद्वार्तीक वि२। ६, ७ जें कर्तव्य त्याचा --न करितां रा१। ७ प्रवर्तन वि१ वि२। ८ आहे राज्य याचें--राज्याचें वि२। १० ब्राह्मण वि२। ११ ['मोडून' नंतर] निरभिमानें वि२। करून --० वि२। १२-लोकाश्रयित होणें--लोक अर्जिणें रा१ स वि१; लोक आर्जवणें वि२। हीं—हे सकळ रा२ स, हीं सकल वि२। १५ राज्यभार चालत नाहीं--राज्यभार [राज्यकारभार वि२] चालणेंच नाहींत रा२ स। १८ गृहाचा वि२। १९ आहेत--आहे रा२ स वि२। ['राज्य' नंतर] तें ✓। २० प्रधान –० ✓ (लेखकप्रमादामुळे लागोपाठ आलेल्या दोन 'प्रधान' पैकी एक इतर प्रतीतून गळला.)। २४ ['धर्मसंरक्षणाचे' पूर्वी] प्रजापालन ✓।

२९. ११ ['भिडेचा' पूर्वी] भिडेची परंपरा, सकल ✓ (सारखे शब्द जवळ जवळ आल्यामुळे रा१ च्या लेखकाची नजरचूक होऊन इथे तीन शब्द गळले)। १४ संभाषण–भाषण रा२, संभाषणें वि१ वि२। १८ राज्यकारभार–राज [ज्य वि२] भार ✓। १९ या--० वि१ वि२। २० कार्यं नाश--कार्यनाश रा२ स वि२। २४ ['कार्य धुरंधर' पूर्वी'] नियोजित ✓।

३०. ५ वर्तेत रा२ वि१ वर्तत वि२। सदय शूर ✓। सद्धैर्य वि२। ७ अतीत—अतिथ वि१, अतीथ स। कार्यकर्ते--कार्यसुचेते रा२ स, कार्यसूचक वि१ वि२। ८ दाम—दान रा२ वि२। ९ साधनीं--संधानी वि२। उत्तम--० वि१ वि२। ११ ['यैशास' पूर्वी] खोटें बोलणार वि१ वि२। ११, १२ महत्पदे न सांगावी एतदर्थी वि१। १२ सन्मान्य वि२ (येथे पक्षांतर दर्शविण्याचा हेतु आहे, तस्मात 'सामान्य' हाच पाठ योग्य आहे.)। १३ बहुत दिवसांचा —०✓। १४ नावाजावें वि२ वि१। १७ पुष्प--० वि१। १८ करिजे तया वि१। १९ योग्य सुबुद्ध--लायक ✓। २० करितें—करीत आहे वि१ वि२। २२ असलिया-आढळलिया ✓। क्रमेंकरून--क्रमेण ✓। २३ नंतर--वरी मग ✓।

३१. १ जाणतें नेणतें रा२ वि१ वि२। ३ कळली—न कळली वि२। सेवकांस—सेवक लोकांसहि वि१ वि२। ४ सांडवावा--सोडवावा रा२ वि१ वि२, खंडवावा स। ५, ६ कठीण यास्तव--नाहीत रा२ स, नाही वि१ वि२। ८ जाले—पडले ✓। ९ सर्वोत्कर्ष—पूर्वोक्त ✓। १३ त्याचे त्याचे स्वरूपान [नु] योग्य ✓। १६ ['योद्धे'च्या पूर्वी] करणारे जे वि२। लोक

त्याविरहीत *वि२* । १९ [ ‘यथान्यायें’ नंतर ] शोधून *वि१ वि२* । मुलकाचा —० *वि१ वि२* । २० शास्त्रन्यायें अन्याय—यथाशास्त्र न्याय अन्याय √ । शोधून—पाहून *वि१ वि२* । २२ हातीं द्यावा—हातून घ्यावा *रा१* ।

३२. २ मुदई—मुदय *रा२ स*, मुद्दे *वि२* । ५ [ ‘सांगावें’ पूर्वी ] केला कारभार व देशदुर्गाचें व सेनेचें वर्तमान त्यांणी √ ( हा मजकूर पुनरुल्लेखवजा आहे तो विशदीकरणाच्या हेतूनं मागून कोणी तरी घातला असणें संभवनीय आहे. ) । ६ मनुष्य —मनुष्यें √ । ९ छद्म—आच्छादन *वि१* । १० कळतो —० √ । १४ प्रत्यक प्रत्यक—निरनिराळीं *वि१ वि२* । १८ ईर्षेने—इरेने *वि१ वि२* । २० कारभार—भार *रा१ रा२ वि१* । २३ हे...करावी —या... कराव्या *वि१ वि२* ।

## प्रकरण ५

या प्रकरणांत *रा१* मध्ये साहुकार व सावकार ( सावकारी ) ही दोन्ही रूपे सरमिसळ वापरली आहेत. *रा२* मध्ये तीन ठिकाणे खेरीजकरून सर्वत्र साहुकार असे रूप आहे. *स* मध्ये सर्वत्र सावकार आहे. *वि१ वि२* मध्ये *रा१* प्रमाणे सरमिसळ आहे.

३३. २ करितां—च्या योगाने *वि१* । २, ३ तें...येतें—त्या...येतात *वि१ वि२* । ४ परिहार होतें—परिहारजेतें *रा२ स वि२*, परिहार जाते *वि१* । ६ जलल—जलाल *रा२ वि१ वि२* । ७ घालोन—घालवून √ । ८ नरमिना— जरमिना *स वि१ वि२* । ८ जरबाब— ० *वि१* ।

३४. २ वस्त्रपात्र √ । ८ इंग्रज √ । वलंदे *वि१ वि२* । ११ करितात—करीत आहेत √ । १४ स्वमत्त-स्वमतें √ । प्रतिष्ठावीं *वि१ वि२* । १५ त्याहिवरी— त्यास ही √ । १६ मेल्यानेंहि *वि२* । १७ ऐसीच—इतकीच *वि१ वि२* । १९ जालेंच—जाहले *रा२ स*, झाली *वि१ वि२* । सेजारीं—मोबारी √ । २० ठाईं—ठिकाणीं *वि१ वि२* । दिघल्यावरी—दिल्हियाने *रा२ स*, दिल्यानें *वि१ वि२* । २० [ ‘आपले’ पूर्वी ] जोंपर्यंत √ । २१ [ ‘आरमार’ नंतर ] तोफा √ ।

३५. २ तोहि—तो असा कीं *वि१ वि२* । ३ आहारीं—आहरीं *रा१ रा२*, आहारी *स*, अहारीं *वि१*, आवारीं *वि२* । ४ घालवाव्या—घालाव्या *रा२ वि१ वि२* । ६, ७ वजावें...वजावें—जावें...जावें *वि१ वि२* । ८ गलिमाचे

...गल्मिाचा रा२ वि२ । ९ सावकारास सापडले वि२ । ९ मवसर--अवसर वि१ वि२ ( मुळांतील शब्दाचा अर्थबोध न झाल्यामुळे पुढील लेखक वा संपादक स्वकल्पनेने शब्दबदल करण्यास कसे प्रवृत्त होतात याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. ) १२ पावऊन--पाठवून वि२ । गलिमा-रा२ वि२ । १३ जे...ते—जे...तें वि१ वि२ । शासन आहे रा२ वि१ वि२ । नव्हे--नाहीं वि१ वि२ ।

## प्रकरण ६

३६. ६ दायादच--दायेजच रा२ । ८ [ 'नूतन 'च्या पूर्वी ] जव जव √ ।

३७. ३ वळें--वेळें वि२ । ६ भेद...भेद—भेट...भेट रा२ । ९ युक्त-जन्य रा१ रा२ । १० यांचा केवळ वि१ वि२ । ११, १२ अन्याय विशेष --समयविशेष [ षीं वि१, षें वि२ ] √ । १२ केवळ--० वि१ वि२ । मोकळीक रा२ । १४ मध्ये--दोमधे रा२ स, दोहोंमध्यें वि१ वि२ । १५ संरक्षून--निक्षून वि१ वि२ । ठेवावें लागतें वि२ । १७ जवभर लाजिमा तोहि--किंवा [ ० वि१ ] जवभर कमीहि वि१ वि२ । १८ द्यावें वि२ । वर्तवावें वि२ । २२ प्रत्यक--० √ । वतना —वेतना रा२ । २२ गुंज--गुंग वि१ वि२ । २३ द्यावी--द्यावें [ वें वि२ ] वि१ वि२ । [ 'द्यावी ' नंतर ] वतनदारांस वाडे हुडे [ देखील वि१ वि२ ] बांधो न द्यावे √ । कोण्ही--० √ । २३ उन्मत्त--उद्धत √ । २३ उच्छृंखळ--उत्खल रा२ ।

३८. १ नावाजून वि१ वि२ । २ त्यास--० √ । ६ वर्तावयाचा रा२ स वि२ । ६ चालीस--पायंड्यास √ । ११ [ 'भले ' नंतर ] लोक √ । ११ प्रामाणिक रा२ वि२ । १३ प्रामाणिक रा२ स वि२ । १४ मिळवणे स । १५ प्रामाणिक रा१ रा२ स वि२ ( पूर्वी शिवकाली प्रमाणिक असें रूप प्रचारांत होतें. दासबोधांत प्रमाणिक असेंच आहे. रा१ मध्ये दोन स्थलीं हें व एका ठिकाणीं प्रामाणिक असें आहे. ) । १५ त्याचा--तशांचा वि१ वि२ । १६ मेहरबानी √ ।

## प्रकरण ७

३९. १ अथवा—० वि१ वि२ । ४ अपराधहि √ । ५,४०. १ वृत्त्यपहार करावा यैसा महदपराधहि—महदपराध वृत्त्यपहार करावा यैसा [असा वि१ वि२] √ ।

४०. ३ न्याय न पाहतां अन्यायें--न्यायें अन्याये रा२ स, न्यायान्यायें वि१ वि२। ८ वृत्ति —० वि१ वि२। ९ न्यून--उत्पन्न न स। १० शीर्णता--जीर्णता√। १० राज्याची शीर्णता--०√। ११ जालियाने—झालेल्यांनी वि२, झाले याणीं वि१। १३ कानूमुळें--काळे स। १३ जलल--जलेल रा२ जलाल वि१ वि२। १४ करावे—द्यावे वि१ वि२। १५ कर्मा — कार्या-वि१। १५ शाप...शाप--श्राप...श्राप√। १६ त्याचे—० स वि१ वि२। १९ अमर्याद होतो--अमर्यादा होते वि१ वि२। २१ ते--०√। २२ पाप अधिकच—पापाधिकांचे रा२, पातकाधिक्यच वि१, पापाधिक्यच्च वि२। २३ च—०√। २३ ततोपि--तथापि रा२ वि२। २३ तों— ० रा२ वि१ वि२। २४ वृत्ति—० स।

४१. १ दस्युभाव—दुष्ट भाव रा२, वाईट भाव वि२। ५ देणें--करून देणें वि१ वि२। ६ राजा —राजा-[ज्या]-स√। ९ तेथे--तेथवर वि१। ९, १० कार्यें आहेतच — कार्य आहे वि२। १० ज्या--ज्याचे √। १० समयीं--वेळेस वि१ वि२। १३ वृत्तीच्या--पृथ्वीच्या वि२। १५ सर्वथैव--सर्वांथी रा२, सर्वथा स, सर्वार्थी वि१ वि२। १५ यवोदर--एकंदर वि१। १८ जाला,--झालें वि२। २० सेवकाचा--०√। २१ नव्हे यैसी केली —न होय असें केलें वि१ वि२। २१ ['सेवा' च्या पूर्वी] चांगली वि१ वि२। २१ मुशाहिऱ्याचें √। २२ जलाल रा२ वि१ वि२।

४२. ४ स्वसामर्थ्यें--० वि१ वि२। ४ मेळवावयास सामर्थ्य--० रा२ स, स्वकार्यार्थ वेश वि१ वि२। ५ ['यैशांस' नंतर] अथवा जे स्वतां √। ५ वंशज--वेशाने वि१। ६ दुराचार--दुराचारी वि१। ६ ['होऊं' नंतर] न रा२ (मागाहून ओळीच्यावर लिहिले आहे)। ७ पाषांडी--पाखांडी वि१ वि२। ८, ९ ज्यांचा कर्म — ज्यांचीं सत्कर्में वि१ वि२। ९ पाहून— ०√। १० सदक्षणाक √। १० -दत्त वि१ वि२। ११ देवतायतनें—दैवतें स। १२ नियमित--नेमीत रा२। १४, १५ संकट घडो √। १५ क्षणेक रा२, क्षणिक वि२। १७ धैर्यें--सधैर्य रा२ स वि१, सद्धैर्य वि२। १७ राजे-- ० वि१।

## प्रकरण ८

४५. १ ते दुर्गें--तें दुर्ग स वि१ वि२। १ दुर्गें--दुर्ग वि१ वि२। २ उद्वस--उध्वंश स, उध्वंस वि२। ४ दुर्ग वि१ वि२। ४ तो तो √।

६ तीर्थस्वरूप स । ७ [ 'देशीं' नंतर ] स्थलें वि१ । ८ तसेंच जलदुर्ग बांधिले वि१ वि२ । १२ अतिशय—अतिशे रा२, अति श्रम वि१ वि२ । १३ म्हणोनच रा२ स । १५ ज्यास--ज्यापेक्षां वि२ । १६ साधणें--साधणी वि१, साधनीं वि२ । १६ त्याणे--० √ । १६ गडकिल्ल्यांची वि१ वि२ । १७ गडकिल्ले त्यांची --त्या गडकिल्ल्यांची वि२ । १९ हस्तगत-हस्तवश्य रा२ स । २० सरदे--सरहद्दी वि१ वि२ । २० बांधून-- ० वि२ । २१ बांधीत-- ० रा२ स । २२ स्वशासनें वश वि१ वि२ ।

४६. २ नाहीं-- ० स । २ गडकोट-- ० रा२ (रा२ च्या लेखकाच्या दृष्टि-भ्रमामुळे लागोपाठ आलेल्या त्याच शब्दांपैकी एक 'गडकोट' शब्द गळला. पुढे त्याच परंपरेतील इ. लि. वरून छापील आवृत्त्या निघाल्यामुळे त्यात ही चूक कायम राहून वाक्यरचनेचा घोटाळा झाला आहे.) ६ [ 'राज्यलक्ष्मी' नंतर ] गडकोट म्हणजे आपलीं वसतिस्थळें, गडकोट म्हणजे सुखनिद्रागार, किंबहुना √ (रा१ मध्ये हा मजकूर नाही. मागाहून कोणा तरी लेखकाने हे कल्पनाविलसित जोडलें असावे.) ७ संरक्षक--संरक्षण वि१, रक्षण वि२ । ७ जातां--राहतां √ । ८ बांधणें, याचा--बांधण्याचा वि२, बांधणेचा वि१ । १० परम--फार वि१ वि२ । १० परस्थळास वि २ । ११ [ 'मामलेदारादि' पूर्वी ] येखादा रा२ वि१ । ११ ठेवावे— ठेवणें वि२ । १२ आला-- ० रा१ । १४ राष्ट्र...गेलें - राज्य...गेलेंच रा२ । १६ ची सवे—चे सर्व रा२, चे सवे स, चें बारें वि१ वि२ । २१ हे--म्हणजे √ ।

४७. १ अनिद्रिस्त वि२ । १ यथोचितीने रा२ वि२ । २ स्वामिकार्य √ । ३ आपली-- ० वि१ वि२ । ३ ठेवी √ । ३ प्राणान्त--प्राण वाचले असतां रा१ रा२ स । ३ यास -- ० वि२ । १४ गुजार √ । १५ प्यादा—रजपूत √ । १६ मनुष्यें...तीं वि१ वि२ । १६ चोर—चोरटे √ । १७ म्याड आवाई खाणार— ० √ । १७ सरेखोर—सीरीखोर रा२, ० वि१ वि२ । १७ [ 'तऱ्हेवाईक' नंतर ] शराबी कैफी भंगी वि१ वि२ । १८ ठेऊं नये—न ठेवावे √ । १९ तीन वर्षांनी—तीन वर्षे जालियावरी रा१ रा२ स । १९ चहूं—चार वि१ वि२ । २१ [ 'आणखी' नंतर ] तशा गुणसंपत्तीचे वि१ वि२ । २२ जे काढावे त्यांचेंहि — ० √ । २२ येक दिवस—कसे दिवस स, एखादे दिवशीं वि१ वि२ ।

४८. १ त्याचे त्याचे √। ३ असलिया–असल्यासही *वि१ वि२*। ५ हवाला व--हवालदार *रा२ वि१ वि२* (इथे *रा१* मधील पाठच योग्य असून तो आम्ही स्वीकारला आहे. त्याचा अर्थ नीट लक्षात न आल्यामुळे क्रियापदाला कर्ता देण्याच्या दृष्टीने हवालदार असा बदल कोणी तरी केला असावा. त्यामुळे अर्थाची हानी होते.)। ११ गडवई, तर–गड व इतर *वि१*। २० तेंच–तैसच *रा२*। २३ दगाहि–दंगाहि *रा२*। २४ म–० *रा२*।

४९. १ कच–लाच *स वि१ वि२* (मोडीत क आणि ला या अक्षरातील भेद सूक्ष्म असतो. पुष्कळ वेळा भेद करीतही नाहीत. इथे क ऐवजी ला वाचला गेल्याकारणाने हा पाठ निर्माण झाला व तीन जोडशब्दांचे शैलीसौंदर्य बाधित झाले)। २ नाकाबिली—ना काहिली *स*, या काहिली *वि१ वि२* (हा पाठही मोडी वाचनाच्या चुकीमुळे निर्माण झाला. *रा२* मध्ये ब्रि 'ही' सारखा लिहिला गेला आहे.)। ३ ['पाहतां' नंतर] मुदत न भरतांहि √ (हे शब्द *रा१* मध्ये नसताही राजवाडे संशोधन मंडळाच्या आवृत्तीत छापले आहेत.)। ५ पाठवावें --ठेवावें *वि१*, ठेवावे *वि२*। ७ प्रमाणाप्रमाण--खरें खोटें √ (*रा१* चाच पाठ सरस आहे हे सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास दिसून येईल. प्रमाण पाहून नंतर खरे खोटे ठरवायचे असते.)। ९ कोणासही *वि२*। १३ वाजबी--वाजवी *वि१ वि२*, जरी *रा२ स* ) १४ आणिलें हा--आणिलें ० *रा२ स*, आणिलेला *वि१ वि२*। १६ रोजमुरा--*रा२ वि१ वि२*। १७ मग—० √। १९ आणावें √। १९ रोहपोह--रोहे पोहे *रा२*, राहपाह *वि१ वि२*। १९ दुराप ाध—निरपराध *वि१ वि२*। २१ करावें--करावेंच करावें √ (हा पाठ मागाहून निर्माण झालेला उघड दिसतो.)। २२ गलिमाचा *रा२ वि२*। २३ गडवईंतून रोज--गड व हरहुनेराने *स*। २३ जुझोन--झुंजोन *रा२ स वि१*, झुंजून *वि२* (जूझ, जुंझ ही जुनी रूपे, झुंज हे अलीकडचे. प्रस्तावना पान ६ पहा.)।

५०. २ यका करून--वाखा होऊन √। ३ मुलालेंकरांचें—मुला [लां] चें √। ४ स्थळ--० *रा२*। ५ सर्वांथी *रा२*, सर्वार्थी *वि१* सर्वथैव *वि२*। ७ च—० *रा२*। ८ करील--करितील √। १० मुळें--० *वि२*। ११['भय' पूर्वी ] आणि √। १५ जालें--आलें *वि१*। १६ गलिमास...गलिमाकडे *रा२ वि२*। १८ ['तरी' नंतर ] उपायें मारवावा. उपायेकडून गलि[नि]-माकडे गेला तो न येई येसे जाहले तरी √. (या अर्थाचा मजकूर पुढे आहे व

तेथेच तो उचित आहे. अर्थात हा मजकूर मागाहून घुसडलेला उघड दिसतो.)। १९ विष अथवा मारेकरी घालोन--विष मारेकरी आदिकरून √। २० मारावा *रा२ स*। २१ निदान *रा२*। २२ गलिमास...गलिमाकडे *रा२ वि२*।

५१. १ करून घ्यावा—करून द्यावा *रा२ स*, करूं न द्यावा *वि१ वि२*. (*रा१* मध्ये 'करून घ्यावा' ही अक्षरे अगदी स्पष्ट आहेत. *रा२* मध्ये 'द्या' दिसते; *स* त्याला अनुसरतो. अक्षरसाम्यामुळे अगदी उलट अर्थाचा पाठ आला, पण तो संदर्भाच्या दृष्टीने उचित नाही.)। २ मामला सांगावा— मामलाहि [मामला—काम *वि१*] सांगों नये √ (दोन्ही नकारार्थी विधाने संदर्भाला व वाक्याच्या रोखाला जुळत नाहीत.)। ३ न--० *रा२ वि२*। ४ ज्यांस--० *वि१*। ९ तुटोन जाते--० *वि१*। ९ तुटोन--उठोन *वि२*। ९ मर्यादा भंगतेच. तेंच *वि१ वि२*। १० अमर्यादा सहसा होऊं न द्यावी *वि२*। १२ समुदयीं--समीप *स*, ['किल्यासमुदई' अशी अक्षरे *रा१* मध्ये आहेत. मुदई (मुद्दई--प्रतिस्पर्धी) असेही मूळ असू शकेल.]। १७ प्रयत्नें करून √। १८ टाळावा--काढावा √। १९ देऊन--देऊं नये *वि२*। २० येताजाता--येतीजाती *रा२ वि२*। २० आहारीं पडोन--हारीं पाडोन *रा२*। २१ हा ऐब थोरलाच --थोर आयब √।

५२. १ गौडे आदिकरून—गैर आदबी करून *रा२*, वगैरे ० *स*, वगैरे आदिकरून *वि१ वि२*। २ टेऊन--ठेवावे √। ३ करावी--करवावी *रा१ रा२ वि२*। ४ पर्वतच--पर्वताचे √। थोर थोर *वि१ वि२*। ५ उपराची --उपराचा *रा२*, कोपऱ्याची *वि२*। ७ केवळ--० √। १२ जुंबरें *वि२*। १४ ['सुगम' नंतर] चांगले *वि२*। १४ ['ते' नंतर] मार्ग √। १५ जातां--येतां √। १७ दिंडी—खिडी *वि१ वि२*। १८ सामान सर्वदा नेत जावें--सांजवादा चढवीत जावा √। १९ कमरग्याची—कलारग्याची *वि१ वि२*, कजारग्याची *स* (मोडी वाचनाची चूक)। २० काठी तेहि--काठीहि *रा२ वि२*। २१ बंदुखी--बंदुखे बरकंदाज *रा२*। २१ घालावयाकारणें जागे-- घालावे, या कारणाजोगे √। गस्त--घस्ती √।

५३. ५ मानितां--मानावी √। ५ उद्योग करावा--० √। ६ किंनिमित्य --निमित्य *रा२ स वि१*। ६ जुझा—युद्धा *रा२*, जुंझा *स*, झुंजा *वि१ वि२* (मागे ४९.२३ पहा.)। ६ भांडियांचे--तोफांचे *स*। ८ जकेरिया--जखीरिया

√। ११ वरी—वरील *वि२*। १२ [त्या *वि२*] राजमंदिरासहि भिंती इटाच्या [टाकीच्या *रा२*] बांधोन त्यास √ (हा मजकूर मागाहून घुसडलेला दिसतो. याची वास्तविक कांही जरुरी नाही)। १३ दरज—दरद *वि१वि२*। १४ निरगुंडी *वि२* (सर्वत्र)। १६ धूम्रें -धुरें √। १६ राहों न पावे—राहावे न गावे *रा२*, न राही *वि१ वि२*। १९ घालऊन--घालून *रा२ स वि२*, ० *वि१*। १९ येइजेतो *रा२ स*, येइजेपर्यंत *वि१*। २२ ['करून' नंतर] जाहला *रा२ स*, झाला *वि१*, जाळावें *वि२*। २३ परसांत टाकून *वि१ वि२*।

५४. १ ['धान्यगृहें' नंतर] इस्तादेचीं घरें हे सकळहि √। १ आहेत त्यांस —० √। ३ गच्च—गच *रा१*, गची *रा२*, गच्ची *स वि१ वि२*। ४ ठाई तेला-तुपास--ठाई [ठिकाणीं *वि१*] ते कड्यास *स वि१ वि२*। (मोडी वाचनाची चूक)। ५ चुना कमावलेला—गच्च √। ६ फुटे--सुटे *वि१*। ५, ६ गचीस घर चांगला--गचास आवरेना *रा२ स*, गच्चांस अरेना *वि१ वि२*। ६ घर—घरें √। ९ वारियाखालें—परिघाखाली *वि२*। ९ सदरे--सदर *वि१ वि२*। १० जागा बांधून [जागांतून *वि२*] भोवतें भोवतें *वि१ वि२*। १२ त्या घरीं—त्यावरी [वर] √। १३ पावों—पाववों *रा२*। २० ते बरकंदाज--० बंदुखीच √। २१ तोफा गाडावयाचा--भांडीं डागावयाचा √ (*रा१* लेखकाच्या कदाचित नजरचुकीमुळे 'डागावयाचा' ऐवजी 'गाडावयाचा' पडले असावे. 'गाडावयाचा' याचाही अर्थ जमत नाही असे नाही.)। २३ बाळगीत जावीं √। २३ गडाचे नाजूक जागे पाहून-- ० *स*।

५५. १ जंबुरे - जुंबरे *वि२*। २ मुजरे साधून--गुजरे बांधून *वि१ वि२*। ४ गंज--गज√। ५ ['गोळे' नंतर] कीट √। ५ रेजगारीसुद्धा--रेजगिरी√। ['दगडी' पूर्वी] अहिनी √। ८ अंतरें--अंतरीं √। ९ दरम्यान--(*रा१ रा२* व *स* मध्ये फक्त 'म्यान' हीं अक्षरें आहेत.)। १० गनीम--गलीम *रा२ वि२*। १६ आधोडी--आधाडी *वि२*। १८ यैसा [असे *वि१*] आबादान ठेवावा [वे] --अशी आबाज ठेवावे *वि२*। १८ आदिकरून-- ० *रा२*, आधी *स वि१ वि२*। १९ कोट--कोठे *रा२ स*। १९ तथापि--० *वि२*। २१ खाणून--कापून *वि२*। २४ नेहमी लागा--नेमिला जागा √ (*रा१* मध्ये नेहमी हा शब्द स्पष्ट आहे, पण त्यापुढील सात अक्षरे शाई फुटल्यामुळे नीट समजत नाहीत. 'मारणार' की 'करणार' याचा संशय वाटतो.)।

५६. १ मर्दाने—मर्यादेने स, मर्दान वि१ । १ गड व—० वि१ । ३ [ 'याविरहित ' नंतर ] जे जे झाड आहे रा२ स, जीं जीं झाडें आहेत तीं वि१ वि२ । ४, ५ निंबें नारिंगें आदिकरून लहान वृक्ष--० वि१ । ७ लाकडाचे...येतील ✓ । ९ शस्त्रवैद्य— शास्त्रवैद्य वि२, ० वि१ । ११ संग्रहीं—करून ✓ । ११, १२ लोकांचीं...कामें पडतात--लोकांचें...काम पडतें ✓ । १५ तलब— तलफ रा२ । १७ ठेवावेच लागतात रा२ । १८ समजोन--सल्ला जाणोन वि२ । १९ उस्तवारी गडाची ✓ ।

## प्रकरण ९

या प्रकरणात रा२ मध्ये सर्वत्र आणि वि२ मध्ये बहुतेक सर्वत्र सावकार गनीम ऐवजी साहुकार, गलीम अशी शब्दरूपे आहेत.

५८. २ [ 'त्याची 'पूर्वी ] तसी वि२ । २ पृथ्वी प्रजा—पृथ्वी प्रथा रा२ स वि१, वृद्धि प्रथा वि२ । ४ यैसिया मधेस्त रा२ स, अशी या [ ऐशिया वि१ ] मध्य वि१ वि२ । ५ बरसे फरगात--बरसे फरगात रा२, बहुत वारसें जागांत वि१ वि२ । ( मोडी वाचनाच्या चुकीमुळे विचित्र अर्थहीन पाठ कसे अस्तित्वात येतात याचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे. ) । ९ प्रयोजनी ✓ । ९ सजुतें वि१ सदुतें वि२ । १३ नेमणूक सहसा न करावी. पैदास्तीचे--० ✓ । १४ बुडाली रा२ स, बुडेल वि१ वि२ । १६ हांशीलही बुडालें वि१ वि२ । १७ सत्यानास--नासाडी स । १८ वाढेल वि२ । २३ जकातीचाच रा२ स वि१,--चेंच वि२ ।

५९. २ जंजिरियाचें सामान व दारू-- जंजीराचा सामाजवादारी रा२, जंजिरा [रि वि१] याची सीमा जवादा स वि१ वि२ (५८.५ च्या पाठावरील कंसगत टीप पहा.)। ५ स्थळाचा...करावा वि२ । ६ [ 'दर्यांत' नंतर ] कौली [ ० वि१, कोळी वि२ ] साहुकारी तरांडियाची आमदरपती करावी. कौली [ कोळी वि२ ] ✓। ६ कोण्ही— ० ✓। ७ मुलुकाचीं व विदेशीचीं--मुलकाखेरीज विदेशींचे ✓। ९ आलीं-आसलीं ✓ । ९ अभय देऊन दिलासा करून— नये भये [ निर्भय स] हाताखाली घालून ✓ । १० [ 'लावितां ' नंतर ] दिलासा [ दिवसा वि२ ] करून ✓ । १० बंदराबंदरास--बंदरास ✓ । ११ [ 'प्रकारें 'नंतर] त्यांणी व ✓। १४ फरोख्त—प्रोख्त रा२, प्रोक्त स वि१, व पोक्त वि२ । १८ मजरा—

मुजरा रा२, मजुरा वि१ वि२। १९ सौख्य--सौकर्य रा२। १९ राज्यांत--तें राज्य √। २१ करून घ्यावीं--करूं न द्यावी वि२।

६०. १,२ जूझ...जुंझावें--झूज...झुजावे रा२, जुंझ जुझावे स, झुंज...झुंजावें वि१ वि२। ४ चळे--चालेच √। १० जाणून--जागवून वि१। ११ [' घेतो ' पूर्वी] कौळ √ (इथे कदाचित रा१ च्या लेखकाकडून नजरचुकीने ' कौल ' गळला असण्याचा संभव आहे. तथापि ' कौळ ' शिवाय अर्थ लागत नाही असे नाही. )। ११,१२ आपलेजवळ बोलाविल्याने पायाला--आपल्या अथवा जवळ बोलाविल्याच्या पायाला[ळा]स √। १४ देखील-- ० वि२। १६ मालशांतीची—मालखिसाती[ते]ची √। १८ ते—० √। १८ दर्यांत रा२ वि१ वि२, ० स। २२ बारगल--बारबंड रा२ स, बारबार वि१, बरबांर वि२। २२ होतच—थोरच √। २३ येकाच--यकाचे रा२, एकाचे स वि२, एकाच वि१। २३ यैसें...द्यावें—तो...द्यावा वि२। २४ करणें तें--कारणें रा२ स, करणें वि१ वि२।

६१. १ वोढावें लागतें--वाढावा लागतो वि१ वि२। १ दगेखोर—दंगेखोर वि२ (मोडी वाचनात किती विलक्षण गमतीचे प्रमाद होतात हे स मध्ये ' दर्गेबरे ' असे लिहिले आहे यावरून दिसून येईल. )। २ अग्नीचा—आगीचा रा२ वि१ वि२। ६ संकेतस्थळांत फितवाहि रा२ वि१ वि२। ६ [' होऊं ' नंतर] न रा१। ८ बंदरीं मोहारी—बंदरास मोव्हारी रा२ स, ...मोहरी वि१, ...मोह वि२। ८ खाडी उतरों--खाडींत सिरों √। ९ आडखाडी, यैसे—आमुक रा२, अडीस स, खाडीस वि१ वि२। ११ छावणीस ठेवावें—छावणीस [छावणी वि२] ठेवावी √। ११ घस्त...घस्त √। १३ ठेऊन—राहोन √। १३, १४ रातबिरात चाकरी करून--ताबिनाती करावी. जें √। १६ डोलाच्या—लाकडाच्या रा२, डोकच्या स (मोडी वाचनाची चूक)। १७ अरण्यांत वि२। १७ सातवनादि रा१ (लिहिण्यात चूक. शुद्धिपत्र पहा.)। १८ हुजूर लेहून — ० वि२। २३ रयतांनी वि२।

६२. १ पारावार काये—पार काय आहे रा२। २ करणारासहित — करणारास हित वि१ वि२। २ श्वल्पकाळ रा२, स्वल्पकाळचें वि२। ६ [' करून ' नंतर] घेऊन वि२। ७ [' सर्वथा ' नंतर] रयतेवरी रा२ स। १० मुजरा होय—मजुरा होय वि१, मुजूरा होणें वि२। १० या दिग्मंडलामध्यें—या दिग्भरीत स वि२, यांहीं भरित वि१। १२ जे— ० वि२। १२ अनुरम्य वि२। १५

तदोत्तर—तेव्हा *वि१*, तदोत्तरी *वि२*। १५ नेम--नियम जे ✓। १८ जाणिजे--० *वि१ वि२*। १८ लेखनालंकार--समाप्त स, ० *वि१ वि२*।

## हस्तलिखित प्रतींतील प्रकरणव्यवस्था

### *रा१ प्रत*

*रा१* मध्ये प्रकरणांचे निर्देश शेवटी आहेत. त्यांची स्थळे पुढे नमूद केली आहेत. प्रथम प्रस्तुत मुद्रित आवृत्तीतील स्थलनिर्देश केला असून त्याच्यापुढे संदर्भादाखल काही शब्द उद्धृत केले आहेत. त्यानंतर *रा१* मधील प्रकरणनिर्देश जाड ठशात दिला असून शेवटी कंसात पोथीतील स्थलाचा निर्देश केला आहे.

७.१९--पासोन सर्व विचार घेतला--**प्रकर्ण १** (पोथी पान ६ ओळ १६.)
३५.१३—ते साहुकार लोकांस उचित नव्हे—**प्रकरणे २** (पो. पान २१ ओ. ३).
३८.१८—कार्यावरी ठेवावे--**प्रकरण ३** (पोथी पान २२ ओ. ३).
४२.२१--या प्र॥ वर्तणूक करावी—**प्र॥ ४** (पोथी पान २३ ओ. २५).
५६.१९--गडाची उस्तवारी करावी--**प्रकर्ण ४** (पोथी पान २९ ओ. ९).
सरतेशेवटी प्रकरणसंख्येचा उल्लेख नाही.

---

ही प्रकरणव्यवस्था मोठीशी सुसंबद्ध, विषयविभागास अनुसरून नाही हे उघड आहे. ७. १९ येथे विषयाचा विभाग पडत नाही, एक मुद्दा संपून दुसरा सुरू होतो, इतकेच फार तर म्हणता येईल. त्यानंतर प्रास्ताविक संपून राजा, प्रधान, साहुकार हे तीन विषय येऊन जातात, तरी प्रकरण तेच चालू राहते. पुढे मात्र सावकार, वतनदार, वृत्ति-इनाम, गडकिल्ले या प्रत्येक विषयाच्या शेवटी प्रकरणसमाप्तीचा उल्लेख आहे. शेवटचा उल्लेख प्रकरण ५ असा पाहिजे, त्यात लेखकाच्या हातून चुकून ४ हा आकडा पडलेला दिसतो याप्रमाणे प्र. २, ३, ४, ५ ही *रा१* मध्ये एकत्र गुंडाळून एकाच प्रकरणात घातलेली दिसतात. एकूण प्रबंध ६ प्रकरणामध्ये विभागला आहे.

### *रा२ प्रत*

*रा२* मधील प्रकरणयोजनेत विषयविभागास अनुसरण्याचा प्रयत्न दिसतो. मात्र लेखनात अव्यवस्थितपणा आहे. प्रकरणांचे निर्देश आरंभी आहेत. त्यापैकी काही मथळ्याप्रमाणे स्वतंत्र ओळीत मध्यावर लिहिले आहेत. प्रकरणनिर्देशांचा उतारा वरील पद्धतीस अनुसरून पुढे दिला आहे.

७.३—होऊन कितेक--प्रकर्णं २ (पोथी पान ६, ओळ १२). (इथे मात्र विषयाचा विभाग पडत नाही. पण पुढील मजकूर गाळला असल्यामुळे ही विभागणी *रा १* ला अनुसरून आहे असे म्हणता येते.)

१२.१४—राज्यसंरक्षण कर्णे--प्रकर्णं ३ (पोथी पान ११ ओ. २८)

२६.१०—सहिष्णापणविरहित होत नाहीत—प्रकरणें ४ (पो.पा. २४ ओ.१८).

३२.२३--(इथे प्रकरणनिर्देश नाही. 'साहुकार म्हणजे...' हे सलग लिहिलेले आहे.) (पो. पान ३० ओ. २४).

३५.१३--उचित नव्हे--(ओळ मोकळी सोडून स्वतंत्र ओळीत--) प्रकरण...(प्रकरणसंख्या दिलेली नाही.) (पो. पा. ३२ ओ. २७).

३८.१८--कार्यावरी ठेवावा--प्रकरण ८ (पो. पा. ३५ ओ. ८).

४२.२१--वर्तणूक करावी—(निराळ्या ओळीत मथळ्याप्रमाणे –) प्रकरणे ९ (पो. पा. ३८ ओ. १०).

५६.१९--उस्तवारी गडाची करावी--प्रकरण १० (पो. पा. ५० ओ. १६).

प्र. ४ नंतर प्र. गणनेत गफलत झाल्यामुळे प्र. संख्या एकाने वाढून १० झालेली दिसते. पण विषयवारीने प्रकरणांची विभागणी करण्यात इथे बरीच प्रगती झाली आहे.

*स* मधील प्रकरणयोजना पूर्णपणे प्रस्तुत आवृत्तीत छापिलेल्या संहितेप्रमाणे आहे. *वि १ वि २* यामध्येही ज्याअर्थी तशीच आहे त्याअर्थी त्यांना आधारभूत असलेल्या हस्तलिखित प्रतींमध्ये तशीच असावी असे अनुमान होते. सर्व मुद्रित प्रतींमध्ये प्रकरणयोजना अगदी एकरूप आहे.

या सर्व वस्तुस्थितीवरून असे अनुमान होते की प्रबंधाच्या मूळ स्वरूपात प्रकरणयोजना मुळीच नसावी; तो अथपासून इतिपर्यंत सलग असावा. पुढे ज्यांच्या हातात हा प्रबंध गेला त्यांना त्यातील विषयात पोटविभाग असल्याची जाणीव होऊन प्रकरणयोजना करण्याचे सुचले असावे. त्या योजनेचा आपल्याला उपलब्ध झालेला पहिला टप्पा *रा १* मधील होय. अर्थात हा ओबडधोबड आहे. पुढे क्रमाक्रमाने ती अधिक व्यवस्थित होत गेली असावी. फलतः *आद्य संहिता--रा१--रा२--स* असा प्रकरणयोजनेचा विकास आपल्याला दिसून येतो.

●●

परिशिष्ट ३

## पुरवणी परामर्श

प्रस्तुत आवृत्तीचा उपोद्घात तयार झाल्यानंतर आज्ञापत्राच्या नव्याने निघालेल्या तीन आवृत्त्या नजरेस आल्या. कालानुक्रमाने उल्लेख करावयाचा म्हटल्यास पुढीलप्रमाणे होईल :

अ. संपादक, श्री. रामचंद्र चिंतामण ढेरे व प्रभाकर पंढरीनाथ जोशी; प्रकाशक, वोरा ॲण्ड कंपनी प्रा. लि.

आ. संपादक, श्री. शंकर नारायण जोशी आणि लक्ष्मण महादेव भिंगारे; प्रकाशक, कॉन्टिनेन्टल प्रकाशन.

इ. संपादक, डॉ. प्रल्हाद नरहर जोशी; प्रकाशक, व्हीनस प्रकाशन.

या आवृत्त्यांच्या विद्वान संपादकांनी जे विचार प्रदर्शित केले आहेत त्यांचा परामर्श घ्यायला मिळत आहे, हा प्रस्तुत आवृत्तीला झालेल्या उशिराने पदरात टाकलेला फायदाच म्हणायचा! यातील मुख्य मुद्यांची व विचारांची थोडक्यात दखल घ्यावी असे योजिले आहे. तसे करताना संक्षेपासाठी व सुलभतेसाठी वरील आवृत्त्यांचा निर्देश पुढील मजकुरात अ आ इ या सांकेतिक चिन्हांनी केला आहे.

आज्ञापत्रात शिवाजी राजांच्या राजनीतीचा स्पष्ट ठसा उमटलेला आहे याविषयी सर्व संपादकांची एकवाक्यता आहे[१]. अ मध्ये तर 'शिवप्रभूंच्या स्वराज्यनीतीवरील सूत्रग्रंथ', 'त्यांच्या विराट् व्यक्तिमत्त्वाच्या रहस्याचा सर्वांगीण

---

१ आ प्रस्तावना, पान १०, १६; इ परिचय, पान १०, १२.

साक्षात्कार' घडविणारा ग्रंथ (पान ६), असे याचे उज्ज्वल वाणीने अनेकवार वर्णन केले आहे. असे जर आहे तर प्रस्तुत आवृत्तीत आज्ञापत्राच्या कर्तृत्वाविषयी जे मत मांडले आहे ते या विचारी विचक्षण संपादकमंडळींना अमान्य का व्हावे? त्यांना आवडावे असेच ते आहे. ज्याची राजनीती या प्रबंधात प्रकट झाली आहे तोच त्याचा कर्ता असावा, या प्रमेयाइतके सरळ, तर्कशुद्ध प्रमेय दुसरे कोणते असणे शक्य आहे? कमीत कमी अडचणी हे प्रमेय मानिल्याने उरतात, हे या मित्रमंडळींना दिसून येईल अशी उमेद आहे.

आज्ञापत्रात शिवाजी राजांची राजनीतीतत्त्वे प्रकट झाली आहेत; आणि शिवाजी राजांच्या तालमीत तयार झालेला, त्यांचा कारभार व तत्त्वे यांची माहिती असलेला आणि दीर्घकाळ राज्यकारभाराचा अनुभव असलेला मुत्सद्दी आज्ञापत्रावर जो काळ दिला आहे त्या काळी रामचंद्रपंत हाच एक होता; तेव्हा रामचंद्रपंतच याचा कर्ता असला पाहिजे-- असा या संपादकांच्या आणि त्यापूर्वी याविषयी लिहिणाऱ्या श्री. त्र्यं. शं. शेजवलकर, डॉ. व. दी. राव यांच्या प्रतिपादनाचा इत्यर्थ आहे.

**वरील अनुमानाखेरीज रामचंद्रपंताकडे या प्रबंधाचे कर्तृत्व देण्यास दुसरा कोणताही आधार नाही.** हे अनुमान उपोद्घातामध्ये अनेक आधार दाखवून नाशाबीत केलेच आहे.

आणखी या संबंधात दोन गोष्टी लक्षात घेण्यासारख्या आहेत. आज्ञापत्रासारखी कृती हे अलौकिक प्रतिभेचे देणे आहे. अशी कृती निपजविण्यास मोठी वहिवाट, दीर्घ अनुभव इत्यादिकांची जरुरी नसते.

न प्रभातरलं ज्योतिरुदेति वसुधातलात् ।

चिपळूणकरांनी निबंधमाला ३२ व्या वर्षाच्या आत लिहिली; ४१ वर्षाच्या आयुष्यात तुकोबा असे कवित्व करून बसले की ते आम्हाला कधी टाकताच येणार नाही. आज्ञापत्राचा प्रकार असाच आहे.

दुसरी गोष्ट अशी की, एखादा प्रतिभासूर्य अस्तंगत झाल्यानंतर त्याचे चैतन्य, त्याची चाल, त्याची तत्त्वे, ही त्याचे अनुयायी, तालमीत तयार झालेले, अशा मंडळींच्या अंगी उतरतातच असे नाही. टॉलस्टॉय, टिळक, नेपोलियन यांच्यामागे काय झाले हे आपण पाहिले आहे. शिवरायांच्या संबंधात तर अशी स्थिती विशेषेकरून झाली, याची साक्ष अनेक इतिहासकारांनी दिली आहे.

श्री. त्र्यं. शं. शेजवलकर, डॉ. व. दी. राव आणि अ चे संपादक यांच्या लिहिण्यात बराच भाग सारखा आहे. यात शेजवलकर कालक्रमाने पहिले आहेत. तिघांनीही डॉ. कोलते यांच्या प्रतिपादनाचे आवेशपूर्ण खंडन केले आहे. आवेशाची इथे जरुरी काय? शेजवलकरादि तिघांनी भगवंतराव रामचंद्र याच्यावरून एक मुद्दा उपस्थित केला आहे. त्याविषयी पाहू.

**भगवंतराव रामचंद्र.** हे रामचंद्रपंत अमात्याचे वडील चिरंजीव. याची अनेक पत्रे पे. द. खंड २६ मध्ये आली आहेत. त्यात राजनीती हा शब्द अनेकवार येतो. हा शब्द 'आज्ञापत्रा'त आलेल्या राजनीतीचा सूचक आहे, आणि म्हणून 'आज्ञापत्र' हे रामचंद्रपंताने लिहिले असले पाहिजे असे यांचे म्हणणे! अ च्या संपादकांच्या पद्धतीस अनुसरून या मंडळींनी इथे विनोद निर्माण केला आहे असे म्हणता येईल. पण ते सोडून आपण यात कितपत तथ्य आहे याचा विचार करू. राजनीती हा असा काय अपूर्वाईचा शब्द आहे की तो योजिल्याबरोबर 'आज्ञापत्रातील राजनीती' असाच त्याचा अर्थ व्हावा? भगवंतरावाच्या पत्रात 'राजनीती' हा शब्द 'राजाची वर्तनरीती', 'राजपदाला योग्य अशी वागणूक' या सामान्य अर्थाने आला आहे हे अगदी उघड आहे. क्षणभर वादाकरिता जरी असे मानले की राजनीती म्हणजे इथे 'आज्ञापत्रातील विचारतत्त्वे' हाच अर्थ आहे, तरीदेखील त्यावरून 'आज्ञापत्र' रामचंद्रपंताने रचले असे अनुमान कसे निघते? इतरांनी लिहिलेल्या ग्रंथांच्या प्रती यांच्या घरात काय मुळीच नसतील? अशा पोथ्यातच 'आज्ञापत्रा'चीही पोथी असेल.

भगवंतराव ही काय व्यक्ती होती? याची व याच्या संबंधाची पुष्कळ पत्रे रा. खंड ८ व पे. द. खंड २६ यात आहेत. आपला मूळ धनी करवीरकर शंभु छत्रपती याच्यापासून हा फटकून निघाला. संभाजी व त्याची राणी जिजाबाई यांनी बहुत आर्जवे केली तरी त्यांची परवा न करिता आपला थोरला मुलगा कृष्णराव याला करवीरकर छत्रपतीचे अमात्यपण करायला ठेवून हा शाहूच्या मृत्यूनंतर ताराबाई व रामराजा यांच्या आश्रयाला साताऱ्यास गेला. दोन्ही डगरींवर हात ठेवणाऱ्याची फजिती व्हायची तशी याची झालेली दिसते. याच्या 'मुलाचे हाल होत आहेत, समयास वस्त्र नाही, डंटास किडे उवा पडल्या, पोटास अन्न नाही, प्राण जातो, कर्जदारी यांचे तगाद्यामुळे विष घेऊन मरावे यैसी गती जाली;' तेव्हा हा 'सत्यवचन राजनीती कदीम पाया मर्यादा कोणी शोधीत

नाही,'[१] — असा आक्रोश करतो. राजनीतीच्या जोडीस सत्यधर्म, स्वधर्म, शास्त्रे-पुराणे यांचाही हा उद्धार करतो.[२] त्यावरुन स्मृती, शास्त्रे पुराणे, हीही रामचंद्र-पंताने रचिली होती असे मानावयाचे की काय ? ताराबाईने व रामराजाने याला मनसोक्त पैसे द्यावे हा याच्या राजनीतीचा मतलब आहे. त्याचा आज्ञापत्रातील राजनीतीशी काडीमात्र संबंध नाही. अशा या "पंतांच्या चिरंजीवांच्या भाषेवर 'आज्ञापत्रा'च्या विचारांचा व शैलीचा प्रभाव आहे" असे अ आवृत्तीचे संपादक म्हणतात. नशीब 'आज्ञापत्रा'चे ! हा प्रभाव कशावरुन ? मर्यादा, कदीम, हुद्दे, मामले, सरकारकून असे काही शब्द त्याच्या पत्रात येतात म्हणून ?

याच्या पत्रातील 'कल्पवृक्षाचे छायेस बसून राजनीत पाहिली आहे, विद्या सिकविली आहे,'[३] यात स्वपिता रामचंद्रपंत असा भलता अर्थ या मंडळींनी पाहिला आहे. कल्पवृक्ष म्हणजे उदार आश्रय देणारा, सर्व कामना पुरविणारा राजा, म्हणजे राजाराम व पूर्वावस्थेतील ताराबाई (व कदाचित संभाजी) असा सरळ अर्थ आहे व तसाच पूर्वी संदर्भ आहे. राजनीत पाहिली म्हणजे राजांच्या सुयोग्य वर्तनाचा अनुभव घेतला. सध्याच्या दुरवस्थेमुळे तळमळून पूर्वीची अवस्था फार चांगली होती अशा अर्थाचे उद्गार भगवंतराव या पत्रात काढतो आहे ! याच्या चरित्राची यापेक्षा अधिक चर्चा इथे करण्याची जरुरी नाही.

**आज्ञापत्रारूढ.** प्र. २ च्या अखेरीस राजाज्ञा सांगणारा जो मजकूर आहे त्यातील **तदनुसार** (१२.७) आणि **आज्ञापत्रारूढ** (१२.१०) या शब्दांचे अर्थ **अ** संपादकांनी कल्पनातीत केले आहेत.[४] 'जी राजनीति आम्हांला (शंभु छत्रपतीला) सांगायची आहे ती तुम्हांला माहीतच आहे; तिला अनुसरून' असा तदनुसार याचा अर्थ आहे. 'त्यांना (रामचंद्रपंतांना) अवगत असलेली' असे विशेषात्कारे सांगण्याचा इथे रोख नाही. पुढे आज्ञापत्रारूढ याचा अर्थ करताना "शंभु छत्रपति त्यांची 'यथाशास्त्र राजनीति' केवळ 'आज्ञापत्रारुढ' करीत आहे" यात 'त्यांची' व 'केवळ' हे संपादकांनी आपल्या पदरचे

---

१ पे. द. खंड २६, पत्र १२१.

२ पे. द. खंड २६, पत्रे १२१, १२९, १३२ इ०.

३ पे. द. खंड २६, पत्र १२९.

४ **अ** प्रस्तावना, पान ४१,४२.

घातलेले शब्द वजा केले की त्यांनी केलेला अर्थ कोलमडून पडतो. आज्ञापत्रात याचा अर्थ 'आज्ञापत्ररूपाने निवेदित' असा आहे. 'दुसऱ्याची (राजनीती) आपल्या आज्ञापत्रात घातली' असा अर्थ त्यातून ध्वनित होत नाही.

**शिवप्रभूच्या पत्रांशी साम्य.** राजवाडे खं. ८ मधील ले. २८,२९ यांचे आज्ञापत्रातील भाषेशी व आशयाशी 'विलक्षण साम्य[१]' असल्याचा उल्लेख प्रथम शेजवलकरांनी, नंतर रावांनी आणि त्यानंतर अ इ च्या संपादकांनी केला आहे. ही तर फारच चांगली गोष्ट आहे. आज्ञापत्र शिवरायांच्या मुखातून निघाले असले पाहिजे असे मानण्यास हा बळकट आधार आहे. ही पत्रे बावडा दप्तरात मिळाली म्हणून ती रामचंद्रपंताने लिहिली (म्ह० कागदावर उतरिली) अगर अभ्यासिली असावी, त्यामुळे त्याच्या भाषेवर परिणाम होऊन ती शैली आज्ञापत्रात उतरली असावी, म्हणून आज्ञापत्र पंताने लिहिले असावे, अशा अनेक खाचखळग्यांनी युक्त परंपरित अनुमानापेक्षा ज्या शिवप्रभूने ही पत्रे सांगितली त्याच्याच मुखातून आज्ञापत्र निःसृत झाले, हे साक्षात अनुमान शंभरपटीने बळकट. ही गोष्ट लहानशी असल्याने प्रस्तुत लेखकाने उपोद्घातात उल्लेखिली नव्हती.

**आज्ञापत्र-समर्थवचन-साम्य.** आज्ञापत्र आणि समर्थ रामदास यांची वचने यातील साम्य अ च्या संपादकांनी दाखवून दिले आहे,[२] ही त्यांची महत्त्वाची कामगिरी होय. हे साम्य खरेच आहे आणि ते प्रस्तुत लेखकाच्या प्रमेयास बळकटी आणते. त्याने 'शिव-समर्थ ऐकात्म्यावर प्रकाश पडतो' आणि आज्ञापत्राचे शिवकर्तृत्वही प्रकाशित होते.

'आज्ञापत्राच्या पानोपानीं आणि शब्दाशब्दांत शिवकालीन प्रेरणा व राजनीति प्रकट झाली'[३] असल्याचे पूर्ण भान अ च्या संपादकांना झाले आहे. त्या दृष्टीने ते सत्य प्रमेयाच्या अगदी जवळ आले आहेत. पण रामचंद्रपंताच्या चरित्राचे भावनात्मक उदात्तीकरण त्यांच्या मनात घर करून बसले असल्यामुळे सत्य प्रमेयाची त्यांची दृष्टादृष्ट होत नाही. हे भावनापटल दूर झाले म्हणजे त्यांची नजर सत्य प्रमेयाला क्षेमालिंगन देईल. हीच स्थिती डॉ. रावांची आहे.

---

१ रा. सं. मं. प्रकाशित आज्ञापत्र, प्रस्तावना पान १३.
२ अ आवृत्ती, पान ३४--३६.
३ अ आवृत्ती, पान २९.

**परंपरा.** परंपरेने रामचंद्राला दिलेले श्रेय काढून का घ्यायचे, असाही मुद्दा या वादात पुढे करण्यात आला आहे.[1] परंपरा कोणती व केवढी ? तीन्ही हस्तलिखित प्रतीत रामचंद्रपंताचा कर्ता म्हणून, किंवा आज्ञापत्राची उद्दिष्ट व्यक्ती याखेरीज इतर कोणत्याही नात्याने, उल्लेख नाही; वि. ज्ञा. वि. मधील दोन्ही मुद्रणात चुकूनसुद्धा कुठेही तसा उल्लेख नाही. सन १९२३ च्या आवृत्तीत पंतांचा कर्ता म्हणून प्रथम उल्लेख झाला व १९३९ साली त्यावर आक्षेप येण्यास सुरवात झाली. तेव्हा या समजुतीची परंपरा केवढी मोठी व दृढ आहे हे कोणीही ठरवावे.

**अखंड एकात्मतेचा आग्रह.** हा आग्रह **अ** च्या संपादकांचा आहे व तो पटविण्यासाठी त्यांनी फार परिश्रम घेतले आहेत.[2] प्रास्ताविक भाग आणि राजनीतीचा भाग यांचे विचार व शैली यात त्यांना एकरूपता भासते.[2] या बाबतीत प्रस्तुत लेखकाचे काय म्हणणे आहे ते उपोद्घातात सादर केलेच आहे. या विषयात **आ** चे संपादक प्रस्तुत लेखकाचे सोबती आहेत, ही समाधानाची बाब आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या रचनेत तीन कालिक स्तर असल्याचे ते सांगतात. या स्तरांचे त्यांनी वर्णिलेले स्वरूप साधारणपणे प्रस्तुत लेखकाच्या मताप्रमाणेच आहे. प्रास्ताविक भाग आणि मुख्य भाग यांच्या भाषेत अगदी उघड व जाणवणारा फरक आहे हेही त्यांच्या प्रत्ययास आले आहे.[3]

**आज्ञापत्र हीच राजनीती की आज्ञापत्र आणि राजनीती ?** 'आज्ञापत्र वेगळें आणि राजनीति वेगळी' असा फरक आ च्या संपादकांनी केला आहे. त्यांचे म्हणणे असे की, 'स्वामींनी यथाशास्त्र राजनीति या आज्ञापत्रावरून केली आहे' (१२.१०) या उल्लेखातील आज्ञापत्र व राजनीती हे शब्द पर्यायवाची नसून कार्यकारणवाचक आहेत; प्र. १ च्या आरंभी 'आज्ञा केली ऐसी जे' या शब्दप्रयोगाने छत्रपतीच्या आज्ञापत्राची सुरवात होते व ते आज्ञापत्र प्र. २ च्या अखेरीस संपते; प्र. ३ पासून 'राजनीती'स आरंभ झाला व ही प्र. ९ च्या अखेरीपर्यंत सांगण्यात आली; म्हणून संपूर्ण ग्रंथाचे नाव 'आज्ञापत्र आणि राजनीति' असेच योग्य ठरते.

---

१ **आ** आवृत्ती, प्रस्तावना पान १४.

२ **अ** आवृत्ती, पान १०-१३,४२.

३ **आ** आवृत्ती, प्रस्तावना, पान ९-१३ व २२.

वास्तविक ‘आज्ञापत्रावरून’ ऐवजी ‘आज्ञापत्रारूढ’ असा मूळ पाठ आहे. पण पहिला पाठ घेतला तरी आज्ञापत्रात राजनीती अंतर्भूत, अर्थात दोन्ही एकरूप, असाच अर्थ निष्पन्न होतो. ‘वरून’ याचा नंतर असा अर्थ नसून ‘आत’ असा अर्थ होतो. ‘ही गोष्ट **आ** आवृत्तीवरून दिसून येते’ असे म्हटले म्हणजे ‘ही गोष्ट **आ** आवृत्तीत दिसून येते’ असाच अर्थ मनात उतरतो. कार्यकारणभाव तर इथे अगम्य आहे.

**स्वामी कोण ?** या प्रश्नाने सर्वांना गुंगविले आहे. याची सविस्तर चर्चा उपोद्घातात करून तिथे आमचा निष्कर्षही निवेदन केला आहे (उ. ३८–४६). **आ** च्या संपादकांनी या संबंधात एक नवीन कल्पना पुढे मांडली आहे. स्वामी म्हणजे शाहू छत्रपती ही ती कल्पना होय. या संपादकांचे लक्ष्य मुख्यत्वेकरून ‘स्वामी राज्यासनारूढ जाहले असता सर्वांची समाधाने केली’ (१. ५,६) या आरंभीच्या मजकुरावर आहे. राज्यावर आल्याबरोबर, सरदार मुत्सद्दी वगैरे मंडळींचे समाधान करून त्यांना आपल्याकडे वळवून घेणे कोणाला प्राप्त झाले ? अर्थात शाहू छत्रपतीला. तेव्हा तोच इथे उद्दिष्ट असला पाहिजे. असा हा युक्तिवाद आहे. पुढे यांचे म्हणणे असे आहे की दुसऱ्या प्रकरणाच्या अखेरीस श्रीमन्मातोश्री आणि चिरंजीव राजकुमार यांचा जो उल्लेख आहे तोदेखील स्वामी म्हणजे शाहू असे मानिल्यानेच सार्थ ठरतो. तेव्हा ‘स्वामी म्हणजे शाहू होय...हे मान्य करणे प्राप्त वाटते.’

वस्तुस्थिती काय आहे हे पाहिल्यास या मताचे परीक्षण करणे सोपे जाईल. स्वामी हा शब्द प्र. १ मध्ये ८ वेळा व प्र. २ मध्ये एकूण २१ वेळा आला आहे. प्र. २ मध्ये अतिशयोक्त व चुकीचे का होईना पण, राजाराम (व त्याचा पुत्र शिवाजी) याच्या कारकीर्दीचे वर्णन इतके निःसंशय आहे की ते **आ** च्या संपादकांनीही मान्य केले आहे (पान ६५). हे लक्षात घेतले म्हणजे ‘स्वामी म्हणजे शाहू’ या मताचा अर्धा-अधिक जोर नाहीसा होतो. प्र. १ च्या आरंभी स्वामी म्हणजे शाहू, नंतर मध्यंतरी स्वामी म्हणजे पहिला संभाजी व राजाराम आणि प्र. २ च्या अखेरीस मातोश्री व राजकुमारांच्या उल्लेखात मात्र स्वामी म्हणजे पुन्हा शाहू, ही मंडूकप्लुतीची व्यवस्था, असा अर्थ घेण्यास संदर्भाची

१ **आ** पान ६२--६७ व **आ** प्रस्तावना पान ११, १२.

वगैरे काहीही योजना केली नसताना, लेखकाला उद्दिष्ट असेल असे मानणे फार कठीण होते.

मजकुराच्या आशयाच्या दृष्टीने पाहिले तरी हा पक्ष समर्थनीय दिसत नाही. प्र. १ च्या आरंभी 'सर्वांची समाधानें केलीं' असे जे म्हटले आहे त्याचा अर्थ स्वराज्यातल्या एका पक्षाकडून दुसऱ्या पक्षाकडे कार्यकर्त्यांना वळवून घेण्यासाठी केलेले समाधान असा दिसत नाही. कार्यकर्ते कुंठितबुद्धि व हतधैर्य झाले होते, कित्येक अन्यायमार्गी पडले होते, इत्यादि जे वर्णन आहे ते परशत्रूचे दुर्धर आक्रमण दर्शविते; स्वकीयातला अंतर्गत कलह दर्शवीत नाही. पुढे लगेच औरंगजेबाचा जो प्रत्यक्ष उल्लेख आहे त्यावरून लेखकाच्या मनातला अर्थ अधिक स्पष्ट होतो. शत्रूच्या दुर्धर आक्रमणामुळे बावचळलेल्या लहानथोर सेवकांची समाधाने करण्याची पाळी राजाराम, दुसरा शिवाजी (ताराबाई) यांच्यावर आली, शाहूवर नाही.

प्र. २ च्या अखेरचा स्वामी म्हणजे शाहू, मातुश्री म्हणजे ताराबाई आणि चिरंजीव राजकुमार म्हणजे राजारामपुत्र शिवाजी संभाजी हे अर्थारोपण अधिकच असमर्थनीय वाटते. ताराबाई शाहूची सावत्र चुलती. तिच्याविषयी त्याला कितीही आदर असला तरी अंतःकरणात मावेना इतक्या परम पूज्यभावाचे निदर्शक असे जे उद्गार इथे मातुश्रीविषयी काढले आहेत, ते शाहूकडून ताराबाईविषयी निघणे शक्य वाटत नाही. ज्या राजारामपुत्रांना (सावत्र चुलत भावांना) शाहूने पाहिलेही नव्हते त्यांना 'जीविताधिक प्रियतम' म्हणणे हेही असंभवनीय. सर्वांत मूलेकुठार आक्षेप हा की इथे स्वामी दक्षिणेकडून उत्तरेकडे दिग्विजयार्थ चालला आहे आणि त्याच्या योजनेनुसार दक्षिण प्रांतसंरक्षणार्थ मातुश्री राहिली आहे (११.१४—१९). शाहूच्या बाबतीत याच्या उलट प्रकार होता. तो बंदिवासातून सुटून उत्तरेकडून दक्षिणेकडे येत होता व ताराबाई (त्याच्या अनुकूलतेने) दक्षिणसंरक्षणार्थ राहिली नसून, सर्व राज्याचा दावा मांडीत विरोधात उभी ठाकली होती.

तेव्हा स्वामी म्हणजे शाहू ही कल्पना सर्वार्थे असमर्थनीय वाटते. हिला प्रत्यंतर पुरावा म्हणून तत्कालीन पत्रव्यवहारातले जे उल्लेख दाखल केले आहेत (पान ६६) त्यात व आज्ञापत्रातील मजकुरात विशेषसे साम्य नाही. अर्थात पुरावा म्हणून ते उपयोगी नाहीत.

अ च्या संपादकांचे म्हणणे असे की हा संपूर्ण प्रबंध रामचंद्रपंतांची कृती आहे, त्यात अखंड एकात्मता व पूर्ण सुसंगतता आहे. विलक्षण भावनात्मकतेने त्यांनी सर्व मजकुराचे असे काही उदात्तीकरण केले आहे की त्यात सगळे काही सुसूत्र, सुसंगत, चित्ताकर्षक भासत आहे. या भावनावश अवस्थेत अजाणता अपलाप घडला आहे, शब्दांचे अर्थ फिरले आहेत, संदर्भाची आणि वर्णनाच्या रोखाची तमा राहिलेली नाही.

'स्वामी राज्यासनारूढ' (१.५) एथपासून 'संभावित वंशीं स्वामीचा जन्म जाहला आहे' (३.१५) एथपर्यंत स्वामी म्हणून येणारे उल्लेख निःसंशयपणे द्वितीय संभाजीचेच आहेत[1], असे ते म्हणतात. पण लगेच या विधानाला मुरड घालून 'मात्र शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर स्वराज्यावर कोसळलेल्या विडवर प्रसंगाचें...वर्णन या छेदकांत आलें आहे' असे विधान करतात. या छेदकात स्वामी म्हणजे राजाराम, ताराबाई असा अर्थ दिसतो, असे त्यांच्याने स्पष्ट म्हणवत नाही ! 'हें वर्णन राजप्रशस्तीच्या स्वरूपाचें' (अ १७) हा, पोकळ अतिशयोक्तीच्या स्वरूपाचे, याचा भावनात्मक पर्याय होय.

प्र. २ च्या आरंभीच्या छेदकात संभाजीचे संस्मरण आहे हे आम्हींच प्रथम दर्शवीत आहो असे सांगून, 'शहाजादे आदिकरून मुक्त केले' याचा स्वाभाविक संदर्भानुसारी अर्थ फिरवून संपादक पुढे जातात तो पुढच्याच वाक्यातील 'औरंगजेब स्थलोस्थलीं अपमान पावोन कथाशेष जाला' हे विधान आडवे येते. तेव्हा पुढची गोष्ट आधी सांगितल्यामुळे निवेदनाचे कथासूत्र सांधून घेणे अवश्य होते, असे म्हणून यापुढे स्वामी म्हणजे राजाराम हे समीकरण अप्रत्यक्षतया मान्य करतात. पुढे शामळासंबंधीच्या मजकुरात स्वामी म्हणजे प्रथम शिवाजी राजे; मंतर संभाजी, हे अर्थारोपण; 'शामलाचें निर्नाम केलें' हे विधान यथार्थ कसे हे सांगण्याचे नेमके विस्मरण; विजापूर-भागानगरादि राज्ये जिंकली अशा स्वच्छ अर्थाचा मजकूर मुळात असता 'कुतुबशाहास साह्य करण्याच्या निमित्ताने (?) विजापूर-भागानगराकडे आक्रमण (!) (संभाजीचे, राजारामाचे नव्हे)' असे उलट्या अर्थाचे आरोपण; असे अनेक चमत्कार संपादकांच्या भावनाशालितेने घडविले आहेत. सुरतेकडे स्वारी करण्याचा जो राजारामाचा कदाचित

[1] पान १६

विचार असावा तो 'स्वामी सुमूहर्तें नर्मदापार झाले' या मुळातील वर्णनामध्ये निर्दिष्ट आहे, असे मानन्यात संपादकास किंचितही अडचण वाटत नाही. सुरत तापीतीरी, नर्मदा तापीच्या उत्तरेस, इत्यादि गोष्टी भावनेच्या विमानातून उड्डाण करणाऱ्यास कशा अडवतील?

अशा रीतीने मुळातील मजकुराचा अळेबळे वाटेल तसा अर्थ लावून त्या अर्थानुसार स्वामी म्हणजे कुठे पहिला संभाजी, तर कुठे राजाराम, कुठे दुसरा संभाजी असे अ च्या संपादकांनी निरूपण केले आहे. पण हे भावनेने स्फुरलेले अघटितघटनापटुत्व झाले; ही अर्थलापनिका नव्हे.

**'आज्ञापत्र' रूपारोपण.** प्रस्तुत राजनीतीला छत्रपतीच्या आज्ञापत्राचे रूप दिले गेले, तरी वंशपरंपरा वृत्ती, इनामे, हक्कलाजिमा व राज्यकारभाराच्या बाबी यांच्यासंबंधाची जी आज्ञापत्रे आहेत, त्यासारखे याचे स्वरूप नाही. तसली रीतसर आज्ञापत्रे निरनिराळ्या छत्रपतींच्या नावाने निघालेली पुष्कळ प्रसिद्ध झाली आहेत. त्यावर अष्टप्रधानांपैकी संभवतः पंतप्रधान व इतर यांच्या मोहोरा अथवा मुद्रा असतात आणि शेवटी 'मोर्तब सूद' किंवा 'मर्यादेयं विराजते' अशी समाप्तिदर्शक मुद्रा असते. प्रस्तुतचे आज्ञापत्र राज्यकारभारातील बाबींच्या अंमलबजावणीकरिता निघालेले नसल्यामुळे त्यात प्रारंभी व शेवटी मुद्रा वगैरे नाहीत, असे कारण देण्यात आले आहे.१ हे ठीक आहे. पण आणखी एक समर्पक कारण संभवते. या राजनीतीला आज्ञापत्राचे रूप देणारा कोणी तरी अनधिकारी आश्रित वा सेवक असला पाहिजे. त्याने रीतसर आज्ञापत्राप्रमाणे "स्वस्तिश्री राज्याभिषेक शके......आज्ञा केली ऐसी जे" (१.१–५) हा मजकूर आरंभी आणि "लेखनालंकार" असे शेवटी घालून आज्ञापत्राची नक्कल वठविली; कारण हे तो स्वतःच्या हाताने लिहू शकत होता. पण राजाधिकारदर्शक मुद्रा त्याला कशा प्राप्त होणार ! हे आज्ञापत्र बनविण्यात रामचंद्रपंताचा हात असता तर याबर मुद्रा वठविणे त्याला कठीण नव्हते व बहुधा त्याने तसे केलेही असते.

रामचंद्रपंताच्या स्तुतीचा मुद्दाही पुष्कळ चर्चिण्यात आला आहे. वास्तविक ही अगदी लहानशी गोष्ट आहे. 'समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि' ही बिरुदे

१ आ प्रस्तावना, पान ६, ७.

तर छत्रपतीच्या नावे निघणाऱ्या आज्ञापत्रात अष्टप्रधानांपैकी कोणासही– क्वचित इतर उच्चाधिकारी व्यक्तीलाही – लावण्यात येत असत. निःसंशय रामचंद्रपंतासच लागू होतील असे स्तुतिपर उद्गार प्र. २ च्या अखेरीस (१२.४–७) दिसतात. छत्रपतीच्या नावे आज्ञापत्र काढायचे म्हणजे छत्रपतीच्या तोंडी त्या विषयास शोभतील असे उद्गार घालणे हे लेखकाचे कर्तव्यच ठरते. तेव्हा रामचंद्र-पंतांच्या गौरवाचे उद्गार आज्ञापत्रात आहेत ही गोष्ट आज्ञापत्र रामचंद्रपंताने लिहिले असेल किंवा नसेल यापैकी कोणत्याच अनुमानास बळकटी आणीत नाही.

**छत्रपति संभाजी १ व हुजरात.** प्र. ३ मध्ये राजे लोकांच्या विनोदव्यसनांचा उल्लेख आहे (१७. १८ ते १८.३; १८.१८–२१) त्यात संभाजीमहाराजांचे सूचन कित्येकांना भासमान होते.[१] हा अन्यथा भास आहे. राजे लोकांना व्यसने असणे ही गोष्ट इतकी सामान्य आहे की तिचा उल्लेख आज्ञापत्रकर्त्याने सामान्यत्वेकरून केलेला असणे हेच साहजिक आहे. राजनीतीच्या अनेक ग्रंथांमध्ये राजांच्या व्यसनांचा निषेध आढळतो. मल्हार रामरावकृत राजनीतीमध्येही तो आहे. संभाजीचे नाव विशेषेकरून ज्या व्यसनांच्या संबंधात घेतले जाते ती म्हणजे मृगया, मदिरा व मदिराक्षी यांचा आज्ञापत्रात ध्वन्यर्थानेसुद्धा उल्लेख नाही. तो केवळ नृत्यगायन व विनोद ( चेष्टा, थट्टामस्करी ) यांचाच उल्लेख करतो. तेव्हा येथे संभाजीचे सूचन संभवनीय नाही.

" शिवकालाशीं संबद्ध नसलेला आणखी एक महत्त्वाचा विषय म्हणजे हुजरात. राजाची खास फौज उर्फ हुजरात हा प्रकार थोरल्या शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीत स्वतंत्रपणे अस्तित्वांतच नव्हता. "[२] असे विधान केले गेले आहे. ते वस्तुस्थितीस अनुसरून आहे असे वाटत नाही. हुजरातीचा उल्लेख सभासदाने केला आहे.[३] हुजरातीहून भिन्न अशा सरदारांच्या फौजांचाही त्याने उल्लेख केला आहे.[३] हे सर्व खोटे का मानावयाचे याला काही कारण नाही. राजांच्या हालचाली बहुतांशी जरी डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयाने होत असल्या तरी त्यांनी मैदानी लढायाही मारिल्या होत्या. राजाने आपल्या खास हुकमतीखालील फौज

---

१ आ प्रस्तावना, पान १७.

२ आ प्रस्तावना, पान १८.

३ सभासद–शिवछत्रपतीचे चरित्र वाकसकर आवृत्ती, पा. २४,६०,६१,७२ इ० पहा.

जबरदस्त राखिली पाहिजे असे जरी त्यांचे तत्त्व होते, तरी परिस्थितीनुसार तत्त्वाला थोडी मुरड घालावी लागते या न्यायानुसार आपल्याला अनुकूल असलेल्या वतनदार जागिरदारांची फौजी मदत त्यांना घ्यावी लागत असे. शिवाय आदिलशाही वगैरे ज्या सत्तांची उदाहरणे राजांच्या डोळ्यासमोर होती त्यात तर खास हुजरात व सरदारांच्या तैनाती फौजा असे विभाग ठळक होते. राजांचे वडील शहाजी राजे हे स्वतः मातबर फौजबंद सरदार होते. तेव्हा शिवकाली हुजरात नव्हती, तिचा उद्भव राजारामकाली झाला, म्हणून या राजनीतीच्या प्र. ३ मधील हुजरातीचे वर्णन शिवोत्तरकालीन होय, असे मानणे वस्तुस्थितीस अनुसरून होणार नाही.

**राजनीती आणि शिवाजीमहाराजांचे वर्तन.** या राजनीतीत शिवकालीन राज्यपद्धतीचा ठसा पुरेशा प्रमाणात दिसत असला तरी बऱ्याच महत्त्वाच्या बाबतीत खुद्द शिवाजी राजांचे वर्तन तीत वर्णिलेल्या तत्त्वांच्या विरुद्ध होते असे प्रतिपादन **आ** च्या संपादकांनी केले आहे.[1] हे वस्तुस्थितीला अनुसरून असते तर हरकत नव्हती. अमुक एक प्रसंग तत्त्वास अनुसरूनच की तत्त्वाशी विसंगत ही चिकित्सा आपण करीत बसतो; पण राजनीतिकर्त्यांचे 'प्रगल्भपण' सर्वोपरि होते. व्यवहारात अंमल करताना तत्त्वाला मुरड घालावी लागते हे आम्हाला समजते आणि त्याला समजत नव्हते, अशातली गोष्ट नाही. त्याला याचे पूर्ण भान होते. तत्त्वे सांगत असताना त्यांना मुरड कशी व कितपत घालावी याचेही मार्मिक दिग्दर्शन तो करतो. **आ** संपादकांनी दिलेल्या उदाहरणातच त्याचे हे चातुर्यविलसित दृष्टीस पडते. (१) "सरकारकुनांच्या नेमणुका वंशपरंपरेने करूं नयेत" असा सरधोपट "कटाक्ष"[1] राजनीतिकाराने क्षेपिलेला नाही, उलट 'बहुत दिवसांचा परंपरागत सेवक, ज्याचे वडिलींहि सेवा बहुत केल्या आहेत, यैशास नवाजावें हें उचित आहे' (३०.१३, १४) असे वंशतत्त्वाची उजरी करणारे विधान केले आहे. अर्थात त्याच्यापुढे वंश-तत्त्वाच्या मर्यादाही निर्दिष्ट केल्या आहेत, हे साहजिक व अपरिहार्य आहे. इथल्या आठ ओळीमध्ये राजनीतिकर्त्यांचे धोरणीपण, मर्यादाविज्ञान इतक्या

---

१ **आ** प्रस्तावना, पान १८, १९.

अप्रतिम रीतीने व्यक्त झाले आहे की त्या वाङ्मयात व नीतिशास्त्रात अजरामर होऊन जाव्यात. "खुद्द शिवाजी महाराजांनी आणि नंतरहि अनेक छत्रपतींनी वंशपरंपरा नेमणुकाच केलेल्या आढळतात"[१] हे विधानही खरे नाही, हे अमात्य, सेनापती, न्यायाधीश, खुद्द पंतप्रधान इत्यादि पदांचा इतिहास पाहिल्यास दिसून येईल वंशपरंपरेने झालेल्या नेमणुकाच लक्षात घ्यायच्या, बाकीच्या घ्यायच्या नाहीत, असे म्हटल्यास बोलणेच खुंटले! (२) वतनदारां-विषयी तसेच. "राजनीतिकाराने वतनाविरुद्ध कटाक्ष दाखविला आहे"[१] हे खरे; पण तो पुढे काय सांगतो हे नीट पाहिल्यास "देशमुख-देशपांडे इत्यादि वतनदार शिवाजी महाराजांच्या काळांतहि प्रबल होते," "...वतनें हीं शिवाजी-महाराजांनाहि चालवावीं लागत होतीं" अशी विधाने आम्ही संपादकांनी करीत बसण्याची जरुरी नाही, हे सहज पटेल. राजनीतिकार स्वतःच हे अति मार्मिक-पणे सांगत आहे. तो वतने व वतनदार यांचा विध्वंस करण्यास कुठेच सांगत नाही. मनात नसताही तत्त्वच्युतीचा आरोप ध्वनित करणाऱ्या लेखनात शाई खर्चण्याऐवजी 'या लोकांचें संरक्षण परम युक्तिजन्य आहे,' 'वतनें बुडवावीं म्हणतां हाहि परम अन्याय', 'यांस स्नेह आणि दंड यांमध्ये संरक्षून ठेवावे लागतात' इत्यादि मर्यादापुरुषोत्तमत्व सूचित करणाऱ्या परमसुंदर विधानांचे जर आम्ही चिंतन करू तर सत्याच्या समीप जाण्याचा मार्ग सुलभ होईल. (३) वृत्ती, भूमिदान वगैरेसंबंधानेहि तसेच. 'नूतन वृत्ति करून देऊं नये,' 'भूमि इनाम देणें हा परम अन्याय' या निषेधक वचनांबरोबर 'धर्मार्थ भूमिदान देण्याचें पुण्य अनंत आहे,' 'सद्ब्राह्मण पाहून... यैसे स्थळींहि ग्राम अथवा भूमि देणें ते द्यावी' इत्यादि विधायक वाक्यांचेही चिंतन करावे म्हणजे झाले.

तेव्हा "राजनीतिकाराचें विवेचन...खुद्द शिवाजीमहाराजांच्या वेळच्या प्रत्यक्ष कृति-घटनांपासून अलग निघणारें"[२] नाही, तर त्या दोहोंमध्ये पूर्ण मेळ आहे ही वस्तुस्थिती अवलोकन–मनना-अंती प्रत्ययास येईल. निर्लेप तत्त्वे शबल जगाच्या व्यवहारात अमलात आणायची, म्हणजे त्यांना काही मुरड घालावीच लागते. कर्त्या पुरुषाची चाल कोणत्या दिशेने आहे, तत्त्वाच्या दिशेने की विभिन्न दिशेने,

१ आ प्रस्तावना, १८.

२ आ प्रस्तावना, १९.

हाच मुख्य प्रश्न असतो. शिवाजीराजांची चाल राजनीतीत निरूपिलेल्या तत्त्वांच्या दिशेने होती, उत्तरकालीन छत्रपतींची व मुत्सद्यांची विरुद्ध दिशेने होती, ही गोष्ट भरपूर प्रमाणाने शाबीत होणारी आहे व अनेक इतिहासवेत्त्यांनी तशी ग्वाही दिली आहे.

**शाहजादे आदिकरून मुक्त केले** ( ६.४ ). याचा 'शहाजादा अकबर यास...औरंगजेबाच्या तावडींतून मुक्त केलें' असा अर्थ अ च्या संपादकांनी लावला आहे. पण मुळाचा अर्थ तसा होत नाही हे त्यांनी पटण्यास अडचण पडू नये. 'औरंगजेब चालोन आला असतां त्याच्या स्वारींत अंगभूत असलेल्या शहाजाद्याला शरण आणून नंतर सोडून दिलें.' असा मुळातील मजकुराचा अर्थ होतो. औरंगजेबावर रुसून संभाजीच्या आश्रयाला आलेल्या शहाजादा अकबराला हा मजकूर मुळीच लागू पडत नाही. त्याला मुक्त करण्याचा मुळीच प्रश्न नव्हता. लेखकाच्या भ्रामक गोलमाल लेखनाचा हा एक नमुना होय. जिंजीच्या वेढयात भाग घेणाऱ्या शहाजादा कामबक्षला औरंगजेबाचे जिंजीचा वेढा चालविणारे सेनानी आसदखान व झुल्फिकारखान यांनी अटकेत ठेवले ( सन १६९२ )[१]; त्या प्रसंगात राजारामाने कामबक्षाच्या मुक्ततेसाठी कदाचित काही रदबदली केली असेल. त्यासंबंधीच्या ऐकीव वार्तांचे अर्धवट संस्कार या मोपळ-सुती लेखनात उमटले असावे.

**समारोप**. आज्ञापत्राच्या पहिल्या दोन प्रकरणांचा आशय व रोख मननपूर्वक लक्षात घेतला म्हणजे असे लक्षात येते की पहिला संभाजी व दुसरा शिवाजी (ताराबाई) यांचा (शाहूचा तर प्रश्नच नाही) प्रत्यक्ष उल्लेख वा अप्रत्यक्ष सूचन या प्रकरणांच्या लेखक-संस्कारकाने टाळलेले आहे. त्याला हा भाग म्हणजे शंभुछत्रपतीच्या प्रशस्तिपर गद्यकाव्य बनवावयाचे होते. म्हणून तो शककर्ता शिवाजी, राजाराम व शंभु ही साक्षात परंपराच फक्त लक्षात घेतो आणि वास्तवता यथार्थता यांची बूज न राखता ( विशेषतः दुसऱ्या प्रकरणात ) वारेमाप स्तुतीने आपले लेखन सजवितो. काव्यात काटेकोरपणाची गरज काय !

आणखी लिहिण्याजोग्या किरकोळ गोष्टी किती तरी निघतील. पण प्रस्तुत लेखकाने उपोद्घातात जे निष्कर्ष सादर केले आहेत त्यात ज्याच्यामुळे बदल

---

१ सरदेसाई, स्थिरबुद्धि राजाराम, पान ६५, ६६.

करावा लागेल असा आधार वा युक्तिवाद पुढे आलेला दिसत नाही. तेव्हा उपोद्घातात जे निवेदन केले, साधारणपणे तेच समारोपादाखल पुनः थोडक्यात इथे सांगतो.

प्र. ३ ते ९ हा राजनीतीचा भाग ही शिवाजीराजे यांची कृती होय. त्याचा बहुतांश मजकूर यांनी उत्तरेकडे औरंगजेबाच्या भेटीस ते गेले तेव्हा दक्षिणेत राहिलेल्या मुत्सद्यांच्या अनुशासनार्थ स्वतः सांगून लिहविला असावा. त्याला मातुःश्रीविषयी भक्तिप्रदर्शक असा उपक्रम आणि उपसंहार त्यांनीच जोडला असावा. तो सध्याच्या संहितेतील स्थूलमानाने ११·१७ ते १२.३ हा व ६२.९-१८ हा भाग होय. या उपक्रमोपसहारासह प्र. ३–९ हा या प्रबंधाचा गाभा. यात राजांच्या राज्याभिषेकापर्यंत वेळोवेळी थोडीशी भर पडली असेल, काही बदलही झाला असेल. पुढे हे हस्तलिखित छत्रपतींच्या दप्तराबरोबर राजारामाकडे येऊन त्याच्या दरबारातल्या कोणा माहितगार अधिकाऱ्याने त्याला एक प्रास्ताविक जोडले असावे. हे प्रास्ताविक म्हणजे सध्याच्या प्र. १ चा पहिल्या ५ ओळी खेरीज करून बाकीचा भाग होय. या प्रास्ताविकात गोलमाल मजकुराची बरीच भर (प्र. २ चा बहुतेक भाग) घालून 'चिरंजीव राजकुमारां'ना त्यात घुसडून, त्यासह सर्व प्रबंधाला शंभुछत्रपतीच्या आज्ञापत्राचे रूप देऊन जे तिसरें संस्करण तयार केले ते करवीर दरबारच्या एखाद्या आश्रिताने नोवेंबर सन १७१५ च्या सुमारास. सर्व गोष्टींचा विचार करता, जास्तीत जास्त संभवनीय अशी जी प्रक्रिया वाटते ती याप्रमाणे. संस्करणे अनेक झाली हे उपलब्ध तीन हस्तलिखित प्रतीतील महत्त्वाच्या फरकांवरून सिद्ध होत आहे. पूर्वी प्रकरणयोजनादेखील सध्या आहे त्याप्रमाणे नव्हती, हे परिशिष्ट २ मध्ये दाखविलेच आहे. तेव्हा *रा १* ही जी सर्वांत जुनी प्रत तिच्यापूर्वी महत्त्वाची संस्करणे झाली असावीत असे शैली, भाषा, आशय यांच्या भरीव आधाराच्या बळावर कोणी प्रतिपादन केले तर ते मान्य होण्यास हरकत नसावी.

● ●

परिशिष्ट ४

## भाषिक पाहणी

प्रस्तुत आवृत्तीची संहिता मुख्यतया *रा१* प्रतीवरून, त्यातील लेखनविकृती दूर करून, तयार केली आहे, हे प्रस्तावनेत सांगितलेच आहे. या लेखनविकृतीचे स्वरूप आणि त्याबाबत प्रस्तुत आवृत्तीत अवलंबिलेले धोरण पुढील विवरणावरून साधारणपणे लक्षात येईल.

१. तत्सम शब्दांची बूज त्या काळी गद्यलेखनात फारशी राखली जात नसे. *प्रज्या, सील, सहिष्ण, विषई, बुध्धि* —अशी रूपे हस्तलिखितात (*रा१* प्रतीतही) आढळतात. केवळ संशोधकांकरिता नसलेल्या संहितेत सध्याच्या काळी हे सगळे असेच छापणे समर्थनीय ठरणार नाही. तेव्हा असे शब्द शुद्ध तत्सम रूपात छापले आहेत. '*पारपत्य*' यासारखे काही शब्द त्या काळी विशेष अर्थाने तद्भव रूपात प्रचलित झाले होते व त्यावरून पारपत्यगार असे साधित शब्दही बनले होते. अशा शब्दांना तत्समाचा नियम लागू केला नाही

२. मोडी लेखनात इकार-उकारांच्या ऱ्हस्वदीर्घांचा फरक करीत नाहीत. जोडाक्षरांच्याऐवजी कित्येक वेळा सुटी अक्षरे लिहितात. प्रस्तुत संहिता तयार करताना अशा लेखनविकृतींचा त्याग केला आहे. इकार उकार सध्याच्या (म. सा. परिषदकृत) जुन्या शुद्धलेखनानुसार ऱ्हस्व वा दीर्घ केले आहेत.

३. *रा१* च्या लेखकाच्या काही वैयक्तिक लकबाही आहेत. सर्वांत मोठी लकब म्हणजे शब्दाच्या आरंभीच्या अ ऐवजी आ लिहिणे : *आंतर, आमर्यादा, आसतील, आधीक, आथवा* इ०; श ऐवजी ष : *दहपत, हपम* इ०; ळ ऐवजी

सर्वत्र ल : *जवल*, *मुलें* (मुळें), *कलले* इ०; काय ऐवजी *काये* इ०. अनुस्वार देण्यात त्याचा अनियमितपणा बराच आहे. आकारान्त एकारान्त अव्ययांवर तो बहुतकरून अनुस्वार देतो : *स्वतां*, *हमेषां*, *पेक्षां*, *मागें*, *पुढें*, *मुलें* इ०. एकारान्त नपुंसकलिंगी रूपांवर अनुस्वार कोठे देतो, कोठे देत नाही : *भरणें*, *तें*, *करावें* इ०; पण *फेरणे*, *ठेवावे* (नपुं), *वोतवणे* इ०. अनेकवचनी सामान्यरूपावर अनुस्वार देण्यातही अनियम आहे. इतर कित्येक शब्दरूपे लिहिण्यातही अनियम आढळतो. प्रस्तुत आवृत्तीच्या संहितेत या वैयक्तिक लकबा व अनियमितपणा दूर करून शुद्धलेखन पद्धतशीर करण्याचा यत्न केला आहे.

याप्रमाणे निरनिराळ्या कारणास्तव आलेल्या लेखनविकृती दूर करून *रा१* वरून प्रस्तुत आवृत्तीची संहिता तयार केली आहे. तरीदेखील इ. स. १७१५ साली दुसरे संस्करण होऊन या प्रबंधाची जी प्रत तयार झाली तिचे भाषिक दृष्टया प्रस्तुत संहिता हे यथातथ्य प्रतिबिंब आहे असा दावा मांडणे अधिकपणाचे होईल. आम्ही मानतो त्याप्रमाणे आज्ञापत्राची मूळ रचना जर सन १६६६ च्या सुमारास झाली असली, तर त्या काळच्या भाषेच्या स्वरूपाचे अवशेष १७१५ साली जे संस्करण झाले त्यात शिल्लक राहिलेले असणार. मध्यंतरीच्या ५० वर्षांत भाषेत झपाट्याने बदल झाला. पण ऐतिहासिक आणि भाषिक यथातथ्यतेची जाणीव त्या काळात नसल्यामुळे प्रत्येक संस्करणाच्या आणि प्रतकरणाच्या वेळी नकलकारांच्या मर्जीनुसार काही जुनी व काही नवी, अशा शब्दरूपांची सरमिसळ झालेली असणार. पुन्हा इ. स. १७१५ आणि *रा१* चा लेखनकाल इ. स. १८०१ यात ८६ वर्षे लोटली. *रा१* चा लेखक कितीही साक्षेपी व मूलानुसारी असला, तरी त्याला ही दृष्टी नसल्यामुळे भाषिक यथातथ्यतेची जपणूक काटेकोरपणे त्याच्याकडून झाली असणे फारसे संभवनीय नाही।

असे असूनदेखील भाषिक पाहणीचा अल्पसा उद्योग इथे केला आहे; कारण त्याचा काही उपयोग निःसंशय आहे. ऐतिहासिक आणि भाषिक दृष्टी जरी त्य काळी सध्याच्याप्रमाणे नव्हती, तरी मूलानुसारित्वाची भावना होती. नक्कल करायची ती अस्सलाप्रमाणे असावी हे तत्त्व ढोबळ मानाने सर्वत्र सर्व काळ अस्तित्वात आहेच. त्यातून *रा१* लेखकाच्या ठायी मूलानुसारित्वाची भावना विशेष प्रमाणात होती. त्याच्या अंगच्या व्यवस्थितपणामुळे भाषिक बदलांचे छायाचित्र काही प्रमाणात आपणास मिळू शकते. आज्ञापत्राच्या लेखनकालातला

बराचसा पत्रव्यवहार मुळाबरहुकूम छापून प्रसिद्ध झालेला आहे. त्याच्या साहाय्याने आपण शब्दरूपांच्या काळाचा धोपट अंदाज बांधू शकतो.

एवढयाशा प्रबंधावरून त्या काळातल्या भाषेचे परिपूर्ण स्वरूप आपणाला दृग्गोचर होणार नाही. तरीपण जेवढे काही दिसेल तेवढे पाहण्याचा यत्न करू.

## वर्ण

आपल्या सध्याच्या भाषेत जे वर्ण आहेत तेच आज्ञापत्राच्या भाषेत आढळतात. संस्कृत वर्णमालेतले सगळे स्वर इथे मोकळेपणाने वावरताहेत. संस्कृतातले शब्द सरास वापरण्याची प्रवृत्ती असल्यामुळे ऋ अर्थात आहेच. ऌ नाही याचे कारण क्लृप्ती हा शब्द कुठे वापरलेला नाही हेच. लेखन मोडी लिपीत असल्यामुळे इ, उ यांच्या ऱ्हस्वदीर्घत्वासंबंधाने काही सांगता येत नाही. स प्रत बाळबोधीत आहे, त्यात ऱ्हस्वदीर्घांचा अनियम आहे. तत्सम शब्दातले अन्त्य उपान्त्य ऱ्हस्व इ उ ऱ्हस्व अगर दीर्घ लिहायचे यापैकी कोणताच नियम त्यात पाळलेला दिसत नाही. ज्ञानेश्वरीच्या भाषेत ऐ औ या स्वरांचे बाहुल्य होते. ते मध्यंतरीच्या काळात कमी झालेले दिसते. प्रकारवाचक विशेषणाच्या बाबतीत मात्र ते टिकून आहे. *यसें* १४.४, *ऐसे* १६.१७, *तैसेच* १६.१६ इ०. *रा १* मध्ये हा ऐ सार्वत्रिक आहे, पण अगदी क्वचित *असे* ४७.१७ अशीही रूपे आढळतात. उच्चारसौलभ्यार्थे इ, ए ऐवजी किंवा सांगाती य आणि इ ए च्या सान्निध्यात य-लोप या दोन्ही प्रक्रिया त्या वेळच्या लेखनात जारी होत्या. पहिल्या प्रक्रियेची उदाहरणे : *येक*, *यकास* ४८.१५, *यहलोक* १५.४, *यैकत* इ०. दुसरीची उदाहरणेः *कितेक* ५२.४, *विषई समई* (सवत्र), *अन्याई* (ही वस्तुस्थिती ह. लि. तली आहे. प्रस्तुत संहितेत *विषयी*, *समयी*, *अन्यायी* असे बदल केले आहेत.) तालव्य व्यंजनांना लागून य घालण्याची प्रवृत्ती तर सार्वत्रिक होती. *च्यार* ४९.१६, *वस्तुज्यात* ३३.२, *प्रज्या* ५८.२. (ही रूपे प्रस्तुत संहितेत सुधारून घेतली आहेत.)

य प्रक्रिया लोप आणि आगम या दोन्ही प्रकारची होती; तर ह उच्चारपूरक आगम म्हणून येताना दिसतो. कोण याचे *कोण्ह* असे रूप बहुतकरून दिसते. *कोण्ही* १५.२०, *कोण्हाचें* १६.२१, *कोण्हास* ४९.९ इ०. *दिल्हा* ३५.१, *जाहले* २.२३ ही या प्रक्रियेचीच उदाहरणे. ह आगम बहुधा या शब्दापुरताच दिसतो

व्यंजने सध्याच्या भाषेत जी आहेत ती सगळी आज्ञापत्राच्या भाषेत दिसतात. *रा १* चा लेखक सर्वत्र ळ ऐवजी ल लिहितो. ही त्या काळातली मोडी लेखनाची एक लकब होती, असे दिसते. समर्थांनी रघुनाथभट नवहस्त यास स्वहस्ते लिहिलेले जे पत्र प्रसिद्ध झाले आहे त्यात हेलवाकीहून, चाफलास, वेगलें, कललें, अशी रूपे आहेत. त्या काळातले इतर लेखनही याला साथ देणारे आढळेल. यावरून उच्चार सर्वत्र ळ चा ल सारखा होत होता असे समजण्याचे कारण नाही. तत्कालीन पत्रात ल ऐवजी ळ लिहिला असेही आढळते. *ळक्ष्मी, अळंकृत, अळक, ळीहीळे, ळीहीगे* [१] ही उदाहरणे मोरोपंत पिंगळे यांनी स्वहस्ते लिहिलेल्या पत्रातील आहेत. तात्पर्य, तत्कालीन लेखनात ळ आणि ल यामध्ये अनियम होता. सर्वत्र नियमाने ल लिहिणे ही *रा १* ची लकब आहे.

न ऐवजी ण काही ठिकाणी : *त्याणे* १४.२; *धण्याचे* १६.२२; *पीडणाचा* ६२.३. श ष स यांचा एकमेकांच्या ऐवजी वापर बऱ्याच प्रमाणात दिसतो. *सिकोन* ६.१४, *श्रृष्टि* १४.१, *अवस्य* १७.१४, *विसिष्ट* ३०.२१, *अभिळाशू* ४२.१७. (यातला तत्सम रूपे बहुतेक प्रस्तुत संहितेत सुधारून घेतली आहेत.) उच्चारातील अस्पष्टता व संदिग्धता हीच या अनियमित लेखनास कारण असावी. सध्यादेखील पुष्कळ लोकांच्या श, ष, स च्या उच्चारात गोंधळ असलेला दृष्टीस पडतो. त्यातल्या त्यात *रा १* ला ष अधिक प्रिय दिसतो : *षहाजादे* ६.४, *हषम* ८.८, *खुषामत* २५.१८. ही याची वैयक्तिक लकब. वास्तविक आरबी-फारसीत ष हे अक्षर नाही. (प्रस्तुत संहितेत ष ऐवजी श घातला आहे.)

मूळ रूपात एकेरी व्यंजन असता आरबीतून मराठीत येताना ज्यांचे व्यंजन द्वित्त झाले असे मुद्दा, हुद्दा व किल्ला हे शब्द *रा १* सर्वत्र एकेरी व्यंजनानिशी (*मुदा, हुदा, किला*) लिहितो. प्रस्तुत संहितेत ते व्यंजन दुहेरी करून छापले आहेत.

## शब्दरूपे

**नाम.** प्रथमा (शब्दाचे अप्रत्यय रूप), तृतीया, चतुर्थी, षष्ठी, सप्तमी यांची रूपे भरपूर आढळतात. पंचमीची सगळीकडेच कमी, तशीच इथे. प्रत्यय

---

[१] श्रीसंप्रदायाची कागदपत्रे, भाग १, ले. २५.

सामान्यरूप यांची प्रक्रिया सध्याच्या भाषेप्रमाणे. लिंग-वचन-व्यवस्थाही सध्याच्या प्रमाणे दिसते. प्रथमेखेरीज इतर विभक्तींची रूपे पाहू.

तृतीया. ने एं (ए. व.), नी ईं (अ. व.) हे प्रत्यय सररास दिसतात. अ. व. हीं प्रत्यय सबंध आज्ञापत्रात बहुधा नसावा. तो त्या काळी कवितेतच येत असावा. अकारान्त नामांना एं ईं, आणि इतर स्वरान्तांना ने नी याप्रमाणे स्थूलमानाने व्यवस्था झालेली दिसते. अकारान्तांना ने नी लागतात, पण कमी प्रमाणात. ने नी बहुधा निरनुस्वार दिसतात हे लक्षात ठेवण्याजोगे आहे.

एं ईं –*परस्परें* १४.४, *ईश्वरें* १४.६, *साधनें* १५.५ *स्वांगें* १५.१०, *हरउपायें* ४९.२४, *राजेलोकीं* १६.१, *लक्षणीं* १६.७ (अ. व).

ने नी—*केलियाने* १४.७, *निष्ठेने* १६.२०, *ऊर्मीने* १६ २३, *रीतीने* १६.२५, *मामलेदाराने* ४९.७, *वर्षांनी* ४७.१९, *धण्यांनी* ४९.२४,

चतुर्थी. स हा प्रत्यय सार्वत्रिक; त्याचे सी असे रूप क्वचित येते. ते प्रत्यय फार क्वचित. *नाशातें* १४.४, *विस्तारातें* २५.२१, २२. पाच पाने तपशीलवार तपासली त्यात स ३१ ठिकाणी, तें फक्त १ ठिकाणी, असे तें चे प्रमाण आहे. प्रत्यय न लावता नुसते सामान्यरूप चतुर्थीच्या अर्थी (क्वचित इतर विभक्तींच्या अर्थी) वापरलेले जुन्या कवितेत फार आढळते. आज्ञापत्रात असा प्रकार दिसत नाही. यावरून गद्यात ती पद्धत नसावी. याला अपवाद *असलिया* १६.१५, ४८.३ इ०.

ला (ए. व.) ना (अ. व.) हे प्रत्यय आज्ञापत्रात दिसत नाहीत.

पंचमी. सध्याप्रमाणेच. *हातून* १६.७, *चित्तांतून* ४९.१४, *स्थळींहून* ४९.१८, इ०.

षष्ठी. च हा विशेषणरूप प्रत्यय लावून रूपे सध्याप्रमाणे.

सप्तमी. ईं, प्रत्यय सररास; (आं)त हा प्रचारात येऊ लागला होता. तपासलेल्या मजकुरात सप्तमीची १४ रूपे आढळली; पैकी १० ईं व ४ (आं)त अशी वाटणी दिसून आली.

आज्ञापत्राच्या विशिष्ट स्वरूपामुळे संबोधनाची रूपे त्यात आलेली नाहीत.

**सर्वनाम.** विभक्ति प्रक्रिया नामाप्रमाणेच. *त्याणे* १४.२, *त्यांगी* १४.४, यात न चा ण झालेला दिसतो. लिंगवचनांच्या बाबतीत दोन गोष्टी लक्षात

ठेवण्याजोग्या. दर्शक सर्वनामांची स्त्रीलिंगी रूपे हे जे ते अशी होतात. जे *मोईन...ते* २२.३, हे *गोष्ट* ४६.१८, ये *गोष्टीची* १६.१५. नपुं. अ. व रूपे जीं तीं याऐवजी जे ते अशी होतात. जे जे *यवनस्तोमें* १०.३, जे *देवतयातनें* १५.७ ते *दुर्गे* ४५.१.

**शब्दयोगी.** विभक्तींचा अर्थ दर्शविणारी शब्दयोगी अव्यये मराठीत फार पूर्वीपासून प्रचारात आली. आज्ञापत्राच्या भाषेत त्यांचे बाहुल्य आढळते. **मध्ये, स्तव, विषयीं, वर, वरी, परत्वें, पासून, प्रमाणे, मुळें, खालील, आंतील** इ० सध्या प्रचलित असलेली आज्ञापत्रात सररास येतात. हा लेखक **करून** च्या ऐवजी बहुधा **कडून** असे रूप वापरतो. *जेणेकडून* १५.२, *धर्मेंचकडून* १५.४, *प्रसंगेंकडून* ४२.१७. **विषयीं** याचें **विसीं** (१६.१०) असे रूप झालेले दिसते. **विरहित, (अ) नुरूप, योग्य, समीप** हे संस्कृत शब्द शब्दयोगीप्रमाणे योजिलेले आढळतात. (१६.३, १६.१९, ४७.२१, ४७.२२ इ०.)

**सामान्यरूप.** सध्याच्या भाषेप्रमाणेच आज्ञापत्रात दिसते. नामाचे, सर्वनामांचे सामान्यरूप प्रत्यय वा शब्दयोगी लागण्यापूर्वी व्हावयाचे. या सामान्य नियमाला सध्या जसे अपवाद आढळतात तसे आज्ञापत्रातही आढळतात. *संरक्षणविषयीं* १६.१, *गडकोटचे* ४९.५, *आरमाराची* ६०.२४, इ०. सामान्यरूपाच्या 'या' प्रकारापूर्वी उच्चारसौकर्यार्थ केव्हा केव्हा इ येतो. हे जुन्या भाषेचे सर्वसामान्य लक्षण इथेही आढळते. *मामल्यावरी* ४७.२०, आणि *मामलियावरी* ४९.१५ अशी दोन्ही प्रकारची रूपे आढळतात. तसेच *धरलियाने* ४२.१९, *इतकियाचवर* ३६.६, *किलियामध्ये* ४७.१६ इ० इ०.

**क्रियापद.** वर्तमानः जुना म्हणजे अलिंग वर्तमानकाळ बहुधा संयुक्त अथवा सशर्त वाक्यात आळढतो. *होय तें करावें* १५.२; तसेंच पडे, येई, *राहात*, *देत* इ०. यात तृतीय पुरुषी अ. व. रूपात ए हे वैशिष्ट्य लक्षात ठेवण्याजोगे आहे. *प्रवर्तेत* १५.२०, *बोलेत* १६.२३, *पावेत* १६.२४, *शकेत* ४२.६ इ०. नवा म्हणजे सलिंग वर्तमानकाळ पूर्ण वाक्यात सररास आढळतो. *पडतें* १७.१७, *जातें* ३२.१०, *कळतो* ३२.१०, *येतें* ४२.५; *होतात* ४१.१३, *साधितात* ३२.१८, *लागतात* ४८.१२.

**भूतकाळ.** सध्याच्या प्रमाणे कर्माप्रमाणे चालणारा (क्रिया अकर्मक असल्यास

कर्त्याप्रमाणे ) सलिंग असा सर्वत्र दिसतो. *केले* १४·२, *असली* ४७·२४, *पावला* ४८.६, *आणिलें* ४९·१४ इ०. जुनी रूपे जी निराळी होत असत ती येथे आढळतात हे साहजिक आहे. : *जाला* १४.१९, *दिल्हा* ३५.१. यांच्या संबंधी पूर्वी उल्लेख केलाच आहे. *जाहले* १.१२, *दिधलें* १४.७ अशी उत्तर-कालीन रूपेही क्वचित आढळतात.

**भविष्यकाळ.** सध्याच्याप्रमाणेच. *करीन* ५५.१०, *असेल* ४९.१७, *पावतील* १४.४ इ०.

अपूर्ण वर्तमान, पूर्ण वर्तमान, पूर्ण भूत, पूर्ण भविष्य इ० संयुक्त काळांची रूपेही प्रयोजनपरत्वे आढळतात. *नेमीत आहे* १५.६, *साधला आहे* १४.४ *दिल्हा होता* ३५.१, *आले असतील* १५.१, इ०.

**विध्यर्थ.** संपूर्ण आज्ञापत्र आज्ञा, आदेश किंवा उपदेश या स्वरूपाचे असल्या-मुळे त्यात विध्यर्थी क्रियापदांचे प्राचुर्य असावे हे अपरिहार्य आहे. सुमारे ६ पानांमधील क्रियारूपाची परिगणना करून पाहिली त्यात वर्तमान २४, भूत १८, भविष्य ११ अशी क्रियारूपे आढळली, तर त्याच मजकुरात विध्यर्थी रूपे ५५ दिसली. विध्यर्थाची रूपप्रक्रिया सध्याच्या प्रमाणेच, व विकरण, सलिंग, सकर्मक धातूत कर्माप्रमाणे व अकर्मकात कर्त्याप्रमाणे चालणारी अशी आढळते. *वर्तावें* १४.१४, *चालवावा* १५.११, *सांगावी* १६·१४, *काढावे* ४७.२०, *ठेवावेत* १६.१९, इ०.

**अकरण रूप.** क्रियेचे अकरणरूप एक तर सध्याच्या प्रमाणे अस, हो किंवा ये धातूच्या नकारार्थी रूपाची सहायक म्हणून योजना करून तयार होते; *जालें नाही* १७.२२, *नसावें* ६.१७, *देऊं नये* १५.१९, *सांगू नये* ४८.१०. किंवा करणरूपाच्या पूर्वी न घालून करण्यात येते. या दुसऱ्या प्रकाराचे आज्ञापत्रात बाहुल्य आहे. *न पडे* १६.२१, *न जात* १६.२२, *न बोलेत* १६.२३, *न ठेवावें* ४८.१४, *न सांगावी* ४८.१८ इ०. ही पद्धत सध्या प्रचलित नाही.

**प्रयोजक** क्रियारूपे आज्ञापत्रात बरीच येतात. त्याच्या शैलीचा हा एक लहानसा, पण सौंदर्यवर्धक विशेष होय. *तो दोष सांडवावा* ३१.४; *भीड कसी वागवितीऊ?* २९.१६; *लोकांपासून दोष सांडवावयाच्या युक्ति* २६.९; *वेतनें...बिलाकुसूर पाववावीं* १९.१५; *वर्तवावयाचा पाइंडा* ३८.६; *रांगोळी*

*घालऊन* ५२ १९ ४०. त्या काळच्या मराठी गद्याच्या रूपसमृद्धीचा हा एक छोटासा आविष्कार होय. *करवत नाहीत* १४.११ अशी शक्यार्थक रूपेही प्रसंगानुसार आली आहेत.

**कर्मणि प्रयोग.** संस्कृतात कर्मणि व भावे प्रयोगांचे य हे विकरण आहे. यावरून आलेले ज हे विकरण लागून जुन्या मराठीत कर्मणि किंवा भावे क्रियापदे बनविली जात असत. आज्ञापत्रात हा प्रकार आढळतो. यात कर्म प्रथमान्त असते, क्रियारूप सलींग असून कर्माप्रमाणे चालते. जेथे भावे असेल तेथे कर्म नसते व व क्रियारूप नपुं. ए. व. असते. *सार्थक करिजेतें* १७.१२, *सरदारांस मर्यादेने ठेविजेतें* (भावे) २९.९, *परित्याग करिजेतो* ३०.१८. आधुनिक गद्यात जा किंवा ये हे सहाय धातु घेऊन कर्मणि वा भावे प्रयोग करण्यात येतो. तो प्रकारही अगदी क्वचित आज्ञापत्रात आढळतो. *परिहार केला जातो* १९.१३.

**विशेषण क्रियाविशेषण.** विशेषणांचा वापर सध्याच्या भाषेतल्याप्रमाणेच वस्तुवर्णनाचा प्रसंग आला असता विशेषणांची मोठी माळिका गुंफून देण्याची आज्ञापत्रकाराला हौस आहे. ( उ. ५८ पहा. ) त्यामुळे विशेषणांचा भरणा पुष्कळ झाला आहे. क्रियाविशेषणांच्या बाबतीत आज्ञापत्राची भाषा फारशी समृद्ध नाही. पुन्हा, स्वतां, तरी, आधी, तों, असल्या नित्य येणाऱ्यांखेरीज *यथोचित* १४.१३, *अव्याहत* १५.६, *परभारें* १५ १८ अशी विशेषार्थद्योतक क्रि. वि. प्रमाणतः कमी. प्रबंधाचा विषय विशिष्ट तात्त्विक स्वरूपाचा असल्यामुळे असे झाले असावे.

त्यास हे चतुर्थ्यन्त सर्वनाम जुन्या गद्य भाषेत अव्ययासारखे वापरले जात असे; काहीसे उभयान्वयी व काहीसे क्रियाविशेषण. आज्ञापत्रातही हे अनेक ठिकाणी आलेले दिसते. आणखी, तेच विस्ताराने, त्यासंबंधी विशेष असा की, अशा प्रकारचा त्याचा संदर्भानुसार अर्थ होत असतो. १७, ७.२०, ४६ २० इ० स्थळे उदाहरणादाखल पाहावी.

धातुसाधिते. सध्याच्या भाषेतली सर्व प्रकारची धातुसाधिते आज्ञापत्रात येतात. सहाय क्रियापदासह येणारी वर्तमान-भूत-कालवाचक : *चालवीत जावें* १५.२९, *करीतच असावें* ४८.२, *साधला आहे* १५.४. ही अर्थात संयुक्त क्रियापदांचा भाग बनतात. याशिवाय तीन्ही काळांची दर्शक, विशेषणस्वरूपी अशीही आहेत; त्यांच्या बाबतीत जुनेपणाचे काही वैशिष्ट्य आहे. वर्तमानकालवाचक चधातु०

लिंगवचनानुसार बदलणाऱ्या विशेषणाप्रमाणे प्रयुक्त होते आणि त्याची पुं. अं. व. रूपेच जास्त दिसतात. *वर्तते, इंगितसंज्ञा जाणते* १६.१७, *त्यांचे होतसाते* ३४.११. भूतकालवाचक धातु० विशेषणें सध्या बहुधा दोन लकारांनी युक्त असतात: केलेला इ०. आज्ञापत्रात ती सर्वत्र एक-लकार-युक्तच आढळतात: *केले सेवेची* १४.१२, *पडले अंतरविषयी* २५.१४, *जाला अन्याय* २६.९, *उरल्या स्थळास* ४६.१४. भविष्यकालवाचक धातु० सध्या बदलणाऱ्या स्वरूपात वापरले जाते (जाणारा-रे-री इ०), आज्ञापत्रात ते अपरिवर्तनीय रूपात येते: *फिरणार* १५.१६, *आवाई खाणार* ४७.१७. ही धातु० क्रियापदांप्रमाणेही प्रयुक्त होतात: *जाणार...करणार* ४८.२२, २३; *होणार* ४०.१८.

धातु० वि० इतर वि० प्रमाणे नामासारखी प्रयुक्त होतात व त्यास विभक्ती-प्रत्यय वा शब्दयोगी लागतात: *गुंतलियाने...जालियाने* १७.१६, *जाहल्यावरी* ४८.२१, *आल्यावर* ४९.१०. त्यांची अप्रत्यय सामान्यरूपे अव्ययाप्रमाणे वापरली जातात: *असलिया* १६.१९, ४८.३ इ०. याशिवाय ठेवणें, करणें, मिळणें अशी धातुनामे; करितां, असतां, देतां इ० चालू-कालवाचक, काढून, पाहून, प्रवर्तोन, योजोन इ० पूर्वकालवाचक आणि होऊं, सांगू, कळों इ० प्रजोजनार्थक धातु० अव्यये सध्याच्याप्रमाणे आज्ञापत्रात प्रभूत प्रमाणात येतात.

ऊं ऊन या धातुसाधितांच्या प्रत्ययात ऊ च्या जागी जुन्या भाषेत ओ येत असे. मुळात ज्ञानेश्वरीच्या भाषेत औ (वैकल्पिक) होता, त्याचा ओ झाला. पण ऊ पहिल्यापासून होताच आणि त्याचेच बाहुल्य आज्ञापत्रात आढळते. सुमारे ६ पानातील ऊन प्रत्ययान्तांची समग्र गणना केली, त्यात एकूण ऊन प्रत्ययान्ते ५४ भरली; पैकी १० मध्ये ओ आढळला (*पावोन, योजोन, फिरोन* इ०), बाकीची ४४ ऊ (*करून, आणून* इ०) लागून बनलेली. तत्कालीन पत्रव्यव-हारात करुनु, घेऊनु अशी उकारान्त रूपे येतात; कवितेत करूनि, करूनिया अशी येतात. आज्ञापत्राच्या उपलब्ध ह. लि. मध्ये हे दोन्ही प्रकार दिसत नाहीत. लेखक-नकलकाराकडून आधुनिकीकरण झाले असेल.

## शब्द

आज्ञापत्राची भाषा संस्कृतशब्दप्रचुर आहे. वेचक शब्द अत्यंत मार्मिक व यथोचित रीतीने योजणे यात आज्ञापत्रकर्त्यांचा हातखंडा आहे. *इंगित संज्ञा*

१६.१७ छद्म ३२.९, *दस्युभाव* ४१.१, *दुर्ग*, *देवतायतन* १५.१७, *प्रगल्भ (पण)* २४.३, *स्फुटवक्ता* ३०.६, *चित्तप्रशस्तता* ३१.७ असे किती तरी संस्कृत शब्द फार सुंदर रीतीने योजून भाषेचे अर्थसामर्थ्य वाढविलेले इथे दृष्टीस पडतें. (उ. ५६, ५७ पहा.) संस्कृत शब्द प्रचलित झाला की मराठीला साजेसा त्याच्यात बदल करून त्याला 'आपणासारिखा' करून सोडण्याची आज्ञापत्रकर्त्यांची लकब वर्णनीय आहे. *अनकूल*, *अनरूप*, *सहिष्ण* २६.९, *युक्तजन्य* ३७.९ यात इतर स्वरांना आकारादेश केला आहे. (प्रस्तुत आवृत्तीत असे शब्द मूळ संस्कृता-प्रमाणे केले आहेत.) *सार्वकाळ*, *प्रमाणिक*, *मोहोत्सव* इ० ठिकाणी स्वरांत बदल केला आहे, *रोहपोह*, *दुरापराध* ४९.१९, *उद्वस* ४५.२ असे काही चमत्कारिक बनावटीचे शब्द क्वचित योजिलेले दिसतात.

संस्कृत शब्दांचीं इथे समृद्धी असली, तरी आरबी फारसी शब्दांचा त्याग करण्याची प्रवृत्ती दिसत नाही. प्रसंगोचित आणि विषयास अनुरूप असेच शब्द तो चपखलपणे वापरतो, मग ते फारसी, आरबी वा पोर्तुगीज असोत. त्या काळात राजकीय व्यवहारात प्रचलित असलेले बहुत आरबी फारसी शब्द या लेखकाने सहजगत्या वापरले आहेत. संस्कृत शब्द उद्दिष्ट अर्थाला अनुरूप असे शोधून आणण्याची चातुरी त्याने दाखविली आहे, तसे मात्र या परकी शब्दांच्या बाबतीत नाही. त्या काळात प्रचलित असलेले आरबी फारसी शब्दच तो वापरतो. प्रतिपाद्य आशयाला अनुरूप अशी शब्दयोजना करण्याचे तंत्र त्याला कसे बेमालूम साधले आहे हे हिशेबी पद्धतीने पटविता येईल. १४.१ ते १५.२५ या राजधर्मविषयक मजकुरातील विषय धार्मिक व आध्यात्मिक स्वरूपाचा आहे. या ३९ ओळीत आरबी फारसी शब्द फक्त २ आले आहेत. प्र. ८ मध्ये ४८.५ ते ४९.२० या ४० ओळींच्या मजकुरात विषय व्यावहारिक, किल्ल्यांच्या बंदोबस्ताचा आहे. येथं आरबी फारसी शब्द मोजले असता ते एकूण ५४ भरतात. गणनेने मिळालेले हे प्रमाण लेखकाच्या अभिजात शब्दयोजनकौशल्याचे द्योतक आहे. शब्दयोजनेच्या या तारतम्यामुळे प्र. ३, १४.१ ते १५.२५ या खंडाला प्रसन्न प्रशांत गांभीर्य प्राप्त झाले आहे, तर प्र. ८, ४८.५ ते ४९.२० हा मजकूर रोखठोकपणा, करडेपणा या गुणांनी विलसत आहे.

आरबी ( फारसीच्या द्वारा आलेले ) व फारसी शब्द *अमीन, उमेद, उस्तवारी, इशारत, हशम, लस्कर, वाजवी, मामला, यखतियार, मेहमानी, दहशत, जबरदस्त,* असे किती तरी वापरलेले आढळतील. त्यापैकी *आमदरफ्ती, मोईन, हशुन, आसकारा, कसाला, कस्त, जकेरिया, नामाकूल, सर्फराजी, सरेखोर, मुस्तैद, मुर्द* असे पुष्कळसे शब्द आता प्रचारातून गेले आहेत, पण ते त्या काळी प्रचारात होते हे लक्षात ठेवले पाहिजे. या परकी शब्दांना मागे किंवा पुढे उपकरण लागून बनलेले शब्दही प्रसंगोपात्त येतात : *आमदरफ्ती, बिलाकुसूर, कबीलदार, सरेखोर, दगाबाज, बेमुलाहिजा, बदअमली, शराबी, उस्तवारी,* इ० परकी आणि संस्कृतोत्पन्न शब्द एकत्र जोडून केलेले गंगाजमनी शब्दही क्वचित आढळतात : *बदलामी, चौगिर्द, परमुलूक* इ०.

तद्भव, म्हणजे संस्कृतातून प्राकृतांच्या द्वारा बदल होऊन आलेले शब्दही आढळतात; क्रियापदे अव्यये याखेरीज असे शब्द एकंदरीने थोडे : *भ्याड, सवे, ठेव, माणूस, हात, घर* असे अगदी मामुली शब्द या प्रकारातले दिसतील.

## समास

उचित स्थळी समर्पक रीतीने समासाची योजना करून भाषेची अर्थघनता वाढविणे हा आज्ञापत्राच्या शैलीचा एक लक्षणीय विशेष आहे. *धर्मपथप्रवर्तक, राज्यमदारूढ, धर्माचरण...साधनें, सकलकल्याणप्राप्ति, राज्यादिवंशाभिवृद्धि, तेजोविशेषानुरूप, जीवनोपाय* हे १४, १५ या दोन पानातील समास पहा. तसेच *स्वदत्तापहरणदोष* ४०.२१, *यवोदरप्रमाण* ४१.१५, *लीलाप्रसंगेंकडून* ४२.१७, *कचकलागत* ४९.१ असे इतरत्र प्रसंगोचित रीतीने येणारे समास पाहावेत.

## प्रयोग

कर्ता किंवा कर्म आणि क्रियापद यांच्यामध्ये परस्परानुरूपत्व असले पाहिजे हा जो सर्वसाधारण नियम तो बखरी वगैरे जुन्या गद्य वाङ्मयात पुष्कळ ठिकाणी पाळलेला दिसत नाही. आज्ञापत्राच्या भाषेला हे विधान सामान्यतः लागू पडत नाही. पण अनुरूपत्वाला बाध आणणारी अशी स्थळे अगदीच नाहीत,

असे मात्र नाही. ते *निवांत असिजे* १५.२४ (इथे असती असे कर्तरि क्रियापद तरी पाहिजे किंवा त्यांनी अशी तृतीया पाहिजे.) विशेषतः विध्यर्थी प्रयोगात हे अनुरूपत्व बऱ्याच ठिकाणी राखलेले दिसत नाही. *प्रयोजनाची वस्तुजात...संग्रह करून ठेवावेंच लागतें* ५६·१६,१७; *त्यांस काढून आणावे* ४९.३; *त्यासहि मारवावा* ५०·१९ इ० इ०. ऐसे लक्षणीं होत असतां १६.१७ येथील धातुसाधिताचा प्रयोग जरा मजेदार विलक्षण वाटतो. अशा गोष्टी विरळ, हे मात्र खरे.






